# काँग्रेस सुवर्ण ज्युबिली

# नागपूर प्रांताचा इतिहास

## (१८८५ ते १९२५)



(अधिकृत)

मुद्रक—

देशसेवक प्रेस—भाग १ ला, भाग ५ वा, परिशिष्ट १ लें, प्रस्तावना, आधार पुस्तकांची यादी

नारायण मुद्रणालय—भाग २ रा पृष्ठ १ ते १६ व ४१ ते ६७, भाग ४ था, परिशिष्ट (अ) पृष्ठे १ ते ८ व १३ ते २०

हरिहरेश्वर प्रेस—भाग २ रा पृष्ठे १७ ते ४०

श्रीराम प्रेस—भाग ३ रा

मारवाडी प्रेस—परिशिष्ट (अ) पृष्ठें ९ ते १२, २१ ते १४० व परिशिष्ट (ब) पृष्ठें ४० ते ४८

सुधाकर प्रेस—परिशिष्ट (ब) पृष्ठें १ ते ४०

प्रकाशक—भा. ज. कानेटकर,
सेक्रेटरी, इतिहास विभाग
ना. प्रां. कां. सुवर्णमहोत्सव मंडळ, नागपूर.

# अनुक्रमणिका

पुरस्कार

प्रस्तावना

आधार पुस्तकांची यादी

भाग १ ला : प्रास्ताविक व १९२० पर्यंतची माहिती — १ ते ६५

भाग २ रा : १९२० पासून १९३० पर्यंतची हकीकत — १ ते ६७

भाग ३ रा : कायदेभंग युग — १ ते ४८

भाग ४ था : कांग्रेस चळवळीचा तहसीलवार इतिहास — १ ते ६८

भाग ५ वा — १ ते ३५

१ कांग्रेसची पन्नास वर्षांतील उत्क्रांति ... १

२ राष्ट्रीय शिक्षण ... ८

३ प्रांतांतील खादीप्रचार ... १९

४ वर्ध्याचा सत्याग्रहाश्रम ... २३

५ प्रांतातील हरिजन चळवळ ... २७

६ प्रांतातील हिंदू मुसलमानांचे परस्पर संबंध ... ३४

परिशिष्ट १ लें — १ ते १०

परिशिष्ट अ — १ ते १४०

परिशिष्ट ब — १ ते ४८

# पुरस्कार

इतिहास, विशेषतः राजकीय इतिहास म्हटला म्हणजे हिंदुस्थानांत त्याचा अर्थ 'एका राजानें दुसऱ्या राजावर किंवा त्याच्या अमलाखालील प्रांतावर केलेल्या आक्रमणाची हकीकत' असा होतो. ब्रिटिशांच्या आगमनापूर्वी येथील राजे एतद्देशीयच होते. मुसलमानी स्वाऱ्या हिंदुस्थानावर होऊं लागल्यानंतर थोडक्याच शतकांत मुसलमानी राजांनी हिंदुस्थानचीही आपली मायभूमि करून दिल्लीस व इतर ठिकाणीं आपलें कायमचें वसतिस्थान केलें त्यामुळें मुसलमानी बादशहा, नबाब वगैरे राज्याधिकारी त्यांचा परकीयपणा जाऊन सर्वतोपरी एतद्देशीयच बनले. राजे एतद्देशीय असल्यामुळें त्यांच्या राज्यांतील प्रजेचे व राजाचे आर्थिक हितसंबंधांत विरोध उत्पन्न झाला नाहीं. प्रजेची सर्वांगीण भरभराट म्हणजे राज्याची उन्नति असा प्रकार असल्यामुळें राजे, महाराजे, बादशहा, नबाब यांचेकडून शिक्षण, व्यापार, उद्योगधंदे यांस प्रोत्साहन व मदत मिळत असे. निदान शिक्षण, व्यापार व उद्योगधंदे यांस राज्याधिकाऱ्याकडून कधींही आडकाठी उत्पन्न करण्यांत आली नाहीं. शिक्षण, व्यापार व उद्योगधंदे यांचें नियंत्रण प्रजेच्या हातीं असे. त्यांत राजेलोक ढवळाढवळ करीत नसत. उलटपक्षीं परचक्रापासून संरक्षण, राज्यांतील शांतता व इतर राजव्यवस्था हीं राजा व त्याचें प्रधानमंडळ चालवीत. त्यांत सामान्य प्रजा ढवळाढवळ करीत नसे किंवा लक्षही घालीत नसे. राज्यव्यवस्थेंत 'राजा बोले व दळ हाले' असा प्रकार होता. त्यामुळें राज्यव्यवस्थाही व्यक्तिप्रधान असे.

इंग्रजलोक प्रथम हिंदुस्थानांत व्यापारी म्हणून आले व तेही व्यक्तिरूपानें नसून संघटित सामुदायिक स्वरूपानें म्हणजे कंपनी तयार करून आले व कांहीं कालानंतर येथील देशस्थितीचा फायदा घेऊन राज्या-

धिकारीच पुढे राजे बनले. परंतु मुसलमानाप्रमाणें हिन्दुस्थानात कायमची वसती करून त्यानी या देशास आपली मातृभूमि केली नाहीं. या कारणानें आपल्या लोकाचा व देशाचा फायदा करून घेण्याची व्यापारी बुद्धि त्याच्यात अजून कायमच आहे. त्यामुळें साहजीकच राजा व प्रजा याचे हितसंबंध परस्परविरोधी होऊन बसले. या विरोधाची झळ हिंदी प्रजेस कंपनी सरकारच्या राज्याच्या सुरुवातीपासूनच लागूं लागली. हिंदुस्थानातील व विशेषत: बंगालमधील कापडाची उत्पत्ति व व्यापार राज्याधिकाराच्या जोरावर समूळ नाहींसा करण्यात आला. आरमार व नौकानयनाचे धदे साफ बुडाले. राज्यातील फौजेंत परकीयाची भरती होऊन शिपाईगिरीच्या नेतृत्वाच्या जागा परकीयाच्या हातीं गेल्या. कोणत्याही स्वतत्र देशात नसलेले शस्त्रप्रतिबंधाचे कायदे अमलात आणून प्रजा नि:शस्त्र बनविली गेली व राष्ट्रातील वीरवृत्तीचा समूळ उच्छेद करण्यात आला.

व्यक्तिप्रधान राज्ययंत्रात राजा व प्रजा याचे हितसंबंध एक असल्यानें प्रजेच्या तक्रारीची दाद राजा किंवा त्याचा मंत्री याचेकडे गेल्यानें लागत असे. परंतु कपनी सरकारचे राज्यात एक दृश्य असा सर्व सत्ताधारी राजा किंवा प्रधान नव्हता. तसेंच राजा व प्रजा याचे हितसंबंध,एक नव्हते. इंग्रज राजघराण्याचा अंमल सुरू झाला तरी हाच प्रकार चालू राहिला. त्यामुळें प्रजेच्या गान्हाण्याची दाद लागेनाशी झाली. इंग्रजलोकाचा देशाभिमान, स्वार्थत्याग, राज्ययंत्र चालविण्याची पद्धत, टापटीप व शिस्त इत्यादि गुणाच्या तेजानें जरी सुरुवातीस हिंदी डोळे दिपून गेले तरी लवकरच पहिली दीप निघून गेल्यावर इंग्रजी-राज्याचें खरें इंगित त्यास दिसून आलें. या सामुदायिक राज्याचें संकट सामुदायिक प्रयत्नाशिवाय टळणें शक्य नाहीं याची जाणीव हिंदी राष्ट्रास उत्पन्न होऊन १८५७ साली स्वातंत्र्यासाठी सशस्त्र प्रयत्न करण्यांत आला परंतु तो पूर्ण एकीच्या अभावामुळें फसला. तरी सुद्धा

त्यामुळें हिंदीलोकांचें गान्हाणें ब्रिटिश पार्लमेंट व राजघराणें यांच्यापर्यंत पोचून हिंदीप्रजेस ब्रिटिश प्रजाजनांच्या इतक्या समान हक्कानें वागविण्यात येईल असा जाहीरनामा इंग्रजी राणीस काढणें भाग पडलें. राजवचनावर निःसीम विश्वास ठेवण्याची संवय असलेली हिंदीप्रजा राणीच्या जाहीरनाम्यानें विश्वस्त होऊन देशांत पुन्हा शांतता नांदूं लागली व पुढचीं २५।३० वर्षे इंग्रजांची इग्लंडमधील राज्यपद्धती, त्यांचे रीतीरिवाज यांचें निरीक्षण व अध्ययन यात गेलीं. या कालांत हिंदीप्रजा बहुतेक निःशस्त्र करण्यात आली गेली. या अध्ययन निरीक्षणापासून हिन्दी जनतेस एक गोष्टी प्रामुख्यानें दिसून आली ती ही कीं, इंग्रज प्रजेनें सामुदायिक प्रयत्नानेंच इंग्रज राजाकडून आपले हक्क संरक्षण करून जिवंत राज्यपद्धती ( Constitution ) मिळविली, व तशा तऱ्हेचा सामुदायिक प्रयत्न केल्याशिवाय हिन्दुस्थानास आपल्या मनाजोगी राज्यपद्धती ( Constitution ) मिळणें कठीण आहे. केवळ राणीच्या जाहीरनाम्यावर विश्वास ठेवून हिन्दी प्रजेस तिचे स्वयंसिद्ध हक्क मिळणें कठीण आहे ह्या गोष्टीची जाणीव झाल्यानंतर स. १८८५ सालीं कांहीं इंग्रजांच्या मदतीनें राष्ट्रीयसभा स्थापन करण्यांत आली. व जरी पूर्ण स्वातंत्र्यप्राप्ती हें त्या वेळीं राष्ट्रीय सभेचें ध्येय नव्हतें तरी सनदशीर मार्गानें वसाहतींत असलेल्या तऱ्हेची राज्यपद्धती म्हणजे बऱ्याच उच्च दर्जाची राज्यपद्धती मिळविणें हें तिचें ध्येय होतें. कांहीं काळानंतर विनंत्या अर्ज या मार्गाच्या अनुभवावरून तें टाकाऊ ठरल्यानंतर प्रखर मार्गाचा व उच्चतर ध्येयाचा काँग्रेसनें अवलंब करण्यास सुरुवात केली. व ज्या प्रमाणात हे मार्ग व ध्येय उच्च व प्रखर होऊं लागले त्या प्रमाणांत सरकारी दडपशाही जास्त प्रखर होऊं लागली; काँग्रेसचा गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास म्हणजे सामुदायिक पद्धतीनें चालविलेल्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या झगड्याचा इतिहास होय. काँग्रेसनें प्रांतोप्रांतीं आपल्या शाखा स्थापन करून हरएक प्रांतांत हा लढा चालू ठेवला. काँग्रेसचें ध्येय सर्व

हिन्दवासीयांच्या स्वातंत्र्यार्थ असल्यामुळें तिच्या सभासदत्वास धार्मिक किंवा जातीय बंधन नाहीं. अशा तऱ्हेची अखिल हिन्दुस्थानांत हीच एकमेव संस्था आहे. स्वातंत्र्याचा लढा सतत अर्धशतक चालवून त्याची पाळेंमुळें खेडेगांवापर्यंत पोचविण्याची कामगिरी कांग्रेसनें केली आहे. व्यक्तिप्राधान्य राजकारणाला सामुदायिक व संघटनात्मक वळण लावण्याचें कार्य मोठ्या यशस्वी रीतीनें कांग्रेसनें केलें आहे. अर्धशतकाच्या अव्याहत कार्यानंतर त्याचें सिंहावलोकन करून मागील कार्याचा आढावा काढण्याची सुवर्ण वेळ या ज्युबिलीच्या प्रसंगीं आली आहे. कांग्रेसच्या या स्वातंत्र्याच्या लढ्यांत प्रत्येक प्रांतानें आपापल्या शक्त्यनुसार कामगिरी केली आहे व प्रस्तुत पुस्तकांत या स्वातंत्र्याच्या लढ्याचा या प्रांतातील इतिहास आहे.

गेल्या निःशस्त्र प्रतिकाराच्या "स्वातंत्र्य युद्धांत" या चिमुकल्या नागपूर प्रांताचा सबंध हिंदुस्थानांत तिसरा नंबर होता ही गोष्ट या प्रांताला अत्यंत भूषणावह नाहीं असें कोण म्हणेल? कांग्रेसच्या इतिहासांत आपल्या प्रांताचें नांव इतकें पुढें आणण्याचें श्रेय ज्या लोकांनीं मातृभूमीच्या स्वातंत्र्याकरतां तनमनधनानें व निःस्वार्थ बुद्धीनें कांग्रेसला मदत केली, व कष्ट आणि हालअपेष्टा सहन करून निःसीम स्वार्थत्याग केला अशा सर्व लोकांना आहे.

इतिहासाच्या साधनाची जुळवाजुळव करतांना, ज्यांनीं ती माहिती इतिहास कमिटीला पुरविली त्या सर्वांचे आभार मानणें अवश्य आहे. कित्येकांनीं अत्यंत उत्साहानें स्वतःचीं चरित्रें लिहून पाठविलीं. कांग्रेसचा इतिहास म्हणजे व्यक्तींचें आत्मचरित्र नव्हे म्हणून तीं सर्व या पुस्तकांत अंतर्भूत न झाल्याबद्दल इतिहास कमिटीला ते दोष देणार नाहींत अशी अपेक्षा चुकीची होणार नाहीं. लेखनाचे कामीं ज्या ज्या लोकांनीं मदत केली त्या सर्वांचा नामनिर्देश या ठिकाणीं करणें शक्य नाहीं तरी पण श्री. बाबासाहेब देशमुख, श्री. मा. ज. कानेटकर, श्री. प्रयाग दत्त शुक्ल

व श्री. रामभाऊ शौती यांचा उल्लेख करणें अवश्य आहे. यांनीं रात्रं-दिवस परिश्रम करून इतक्या थोड्या वेळांत इतिहासाची आखणी, जुळवाजुळव व लेखन करून टाकलें, म्हणूनच आगाऊ जाहीर केलेल्या तारखेस पुस्तक प्रसिद्ध होऊं शकलें. याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.तसेंच देशसेवक प्रेस, नारायण मुद्रणालय, श्रीराम प्रेस, हरिहरेश्वर प्रेस, मारवाडी प्रेस व सुधाकर छापखाना, या छापखान्यांच्या व्यवस्थापकांनीं तांतडीनें काम करून दिलें म्हणून त्यांचेही आभार मानणें अवश्य आहे.

कोणत्याही कार्याला पैशाची मदत लागतेच मग तें कार्य सुवर्णमहोत्सव असो किंवा सत्याग्रहसंग्राम असो. ज्या सद्‌गृहस्थांनीं आम्हांला या कार्यक्रमाकरितां पैशाची मदत केली त्या सर्वांचे या ठिकाणीं मी आभार मानतों. तसेंच सोन्याचांदीच्या ओळीनें आम्हांला वेळोवेळीं मदत केलीच आहे व याही वेळेस त्यांनीं राजबंदींचा गौरव करण्याकरतां पदकें देऊन हातभार लावला याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

शेवटीं सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं काँग्रेसनें देशाचें राजकारण सामान्य जनतेच्या हातांत आणण्याचें महनीय काम केलें आहे. हा पन्नास वर्षांचा इतिहास जनतेनेंच निर्माण केला आहे व तो जनतेच्याच चरणीं समर्पण करण्यांत मला अत्यंत आनंद होत आहे.

नागपूर<br>ता. २७-१२-३५

ना. भा. खरे.<br>अध्यक्ष, नागपूर प्रांतिक काँग्रेस कमिटी.

# प्रस्तावना.



इतिहासलेखन हें फुरसतीचें आणि आश्रयाच्या भरंवशावर होणारें काम आहे. पूर्वीच्या काळीं होशी राजे एखाद्या स्वतःच्या आश्रयाखालील लेखकाला मुद्दाम आपल्या कारकीर्दीचा इतिहास लिहावयास सांगत हें सर्वांना माहीत आहेच. ज्युबिली निमित्त हा जो प्रांताचा इतिहास लिहिला जात आहे त्याला २० नोव्हेंबर रोजीं लिहावयास सुरवात झाली हें लक्षांत घेतलें म्हणजे त्याच्या प्रकाशनाला फुरसतीचें किती साहाय्य होतें हें लक्षांत येईल. आश्रयाचें म्हणाल तर त्याची सर्व भिस्त काँग्रेसच्या इतर कोणत्याही कार्याप्रमाणें जनतेच्या प्रेमावरच काय ती आहे. अशा परिस्थितींत एकेका ग्रंथाच्या परिशीलनानें जेथें निव्वळ एखाद्या परिच्छेदाची प्राप्ती व्हावयाची असें कठीण काम थोड्याशा वेळांत उरकल्यामुळें या इतिहासांत किती दोष असतील याची जाणीव इतिहास संकलकांना पूर्णपणें आहे १९३२ सालीं नागपूरचें काँग्रेस दप्तर जप्त झालें व ठिकठिकाणच्या काँग्रेस कागदपत्रांची ठिकठिकाणीं पांगापांग झाली म्हणून संकलनाचें काम करतांना अपुऱ्या कागदपत्रांवरच निभावून न्यावें लागलें. त्यांच्यातर्फे इतकेंच सांगतां येईल कीं महत्वाची गोष्ट वगळायची नाहीं आणि विपर्यस्त हकीकत द्यायची नाहीं एवढ्या दोन गोष्टींवर मात्र त्यांनी प्रामाणिकपणें कटाक्ष ठेवला, आणि त्यांतही त्यांच्याकडे वगळण्याचा दोष आला तरी हरकत नाहीं पण विपर्यासाचा दोष जर त्यांचेकडे न आला तरी ते पूर्णपणें समाधान मानावयास तयार आहेत.

व्यक्तित्व आणि कार्य यांची गुंतागुंत करूं नये हे तत्वतः जरी खरें असलें तरी व्यक्ति आणि कार्य हीं अच्छेद्य आहेत म्हणून व्यवहारांत व्यक्तित्व आणि कार्य यांना वेगळें ठेवणें फार जड जातें आणि प्रत्येक कार्यावर त्या त्या कार्यकर्त्यांची छाप पडते. व्यक्तित्वाच्या औदार्यातून कार्यही विकृत होतें आणि कनिन् प्रसंगीं तर मुख्य कार्याला व्यक्तीत्व पूर्णपणें ग्रासून टाकतें असे प्रसंग जगांतल्या कोणत्याही देशाच्या इतिहासांत येतात मबब तसे ते काँग्रेसच्या इति-

छपाईचें काम ठरलेल्या मुदतींत व्हावें म्हणून पांच छापखान्यांमिळून पुस्तक छापवून घ्यावें लागलें; म्हणून टाइपाच्या बाबतींत कांटेकोरपणा करितां येईना, आणि परिणामतः भिन्न बॉडी टाइपांतून मजकूर छापवून घ्यावा लागला. सुदैवानें टाइपांची निवडही भागशः अगदीं बारीक, मध्यम आणि जाड अशीच झाली आहे आमची निकड भागवून आपलेपणानें वेळेवर छपाईचें काम देणाऱ्या देशसेवक, नारायण, हरिहरेश्वर, मारवाडी, श्रीराम आणि सुधाकर या छापखान्यांचें आभार मानावे तितके थोडेच आहेत.

प्रथम ब्लॉक्स देण्याचा विचार होता पण तो खर्चाच्या भीतीमुळें पण मुख्यतः नाराजीच्या भीतिमुळें सोडून यावा लागला. कारण स्वयंसेवकांची यादी अत्यंत कसोशीनें करूनही कोणाचें नांव वगळलें तर नाहींना ही भीति आम्हांला सतत वाटतच आहे. पण आमच्या अडचणींकडे लक्ष देऊन वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

या इतिहासलेखनाच्या आणि छपाईच्या कामांत कार्यकर्त्यांचें एक छोटेसें सैन्यच गुंतलें होतें तेव्हां आभार कोणाचे मानावे ? माहिती धाडणारे ठिकठिकाणचे कार्यकर्ते व गांवांत माहिती गोळा करून आपलेपणानें सहाय्य करणारी मंडळी यांची आम्हांला नांवें सुद्धां पूर्णपणें माहित नाहींत. कारण अनेक उत्साही मंडळींनी स्वयंस्फूर्तीनें मदत केली आहे. छापखान्यांवर देखरेख ठेवणें, प्रुफें तपासणें, मजकूर पोंचविणें ही जबाबदारी एका दुसऱ्या तुकडीनें पत्करली. असें असलें तरी कागदपत्र चाळून विषयाच्या मांडणीची तयारी करणारे श्री. रामभाऊ थोत्ते, १९०७ सालची हकीकत लिहिणारे श्री. नारायणराव अळेकर १९२०-३ पावेतोंचा इतिहास लिहिणारे श्री. नीळकंठराव ऊर्फ बाबासाहेब देशमुख, स्वराज्यपक्षाचा साद्यंत इतिहास लिहून देणारे श्री. गजाननराव ढवळे, १९३०-ते १९३५ सालचा गुंतागुंतीचा इतिहास लिहिणारे श्री. हरिभाऊ मोहोनी यांचा विशेष उल्लेख करणें अवश्य आहे.

या मुख्य भागांशिवाय कॉंग्रेसची उत्क्रांति व राष्ट्रीय शिक्षण हीं प्रकरणें श्री. शं. त्र्यं. धर्माधिकारी, खादीचा वृत्तांत श्री. रघुनाथराव धोत्रे, आश्रमचा

इतिहास श्री. गोपाळराव काळे, हरिजन चळवळीचा इतिहास श्री. स. वि. रानडे यांनीं लिहिला त्यांचेही आम्हीं फार आभारी आहोंत. प्रेसच्या कामावर नजर ठेवून प्रूफ तपासणें इत्यादि कामांत श्री. अण्णाजी वाचासुंदर, भय्याजी डोळके श्री. ना. रा. सोवनी, श्री. वा. ल. खटी यांचेही आभार मानले पाहिजेत. कागदपत्र चाळण्याचे कामीं विद्यार्थ्यांपैकीं श्री. भावे व श्री. पंडित यांचीहि नांवें उल्लेखनीय आहेत.

वरील नांवनिशींत चुकून जर कोणाचे आभार मानण्याचें राहिलें असेल तर त्यांनीं कृपा करून क्षमा करावी. श्री. रामभाऊ श्रोती हे येथें काम करीत असतांच १६ तारखेस त्यांना त्यांचे कुटुंब अत्यवस्थ असल्याची तार आली व ते तेथें पोंचण्यापूर्वीच त्यांचें कुटुंब वारलें. या आघातानंतरही ते पुनः ताबडतोब कामाला आले; यांतील त्यांच्या मनोधैर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. हें काम करीत असतांच ता. १० डिसेंबर रोजीं श्री. गणपतराव टिकेकर यांना देवाज्ञा झाली; व एकंदर ज्युबिली कार्यकर्त्यांत औदासिन्य पसरलें; पण कर्तव्य म्हणून सर्वांनीं आपापलीं कामें नेटानें पार पाडलीं म्हणूनच कांग्रेस ज्युबिलीपैकीं इतिहासाचा हा महत्वाचा भाग पुरा करतां आला. जनताजनार्दनाला ही सेवा मान्य होवो एवढी विनंती करून ही प्रस्तावना पुरी करतों.

नागपूर कांग्रेस ज्युबिली
ता० २८-११-३५.

गोपाळ अनंत ओगले, अध्यक्ष,
माधव जनार्दन कानेटकर,
प्रयागदत्त शुक्ल
इतिहास विभाग
} चिटणीस

नागपूर प्रांतिक कांग्रेस सुवर्ण ज्युबिली कमेटी

---

# आधार पुस्तकांची यादी.

(१) मध्यप्रान्त मरीचिका पं. प्रयागदत्त शुक्ल १९२०

(2) Stray thoughts on some incidents in my life By Sir B. K. Bose 1923

(३) नागपुरचा सत्याग्रह श्री. पुरुषोत्तम दिवाकर ढवळे १९२३

(४) लो० टिळक यांचे चरित्र ( खंड २—३ ) दे० नरसिंह चिंतामण केळकर १९२८

(5) How India wrought for freedom By Anne Besant 1917

(६) " भारत भाग्योदय " ( सन १८९१ चा कॉंग्रेसरिपोर्ट ) एक प्रतिनिधी १८९२

(७) कॉंग्रेस रिपोर्टस्.....................

(८) झेंडासत्याग्रह दे. नीलकण्ठराव देशमुखं पं. माखनलाल चतुर्वेदी ............

(9) The Indian Annual Register By Mitra From 1921 to 1935

(१०) महाराष्ट्राच्या जुन्या १९१४ पासूनच्या फाइली

(११) तरुण भारताची फाइल सन १९२६ पासून १९३० पर्यन्त.

(१२) निस्पृह ( अभ्यंकर अंक )

(१३) चित्रमयजगत ( कॉंग्रेस अंक )

(१३) Resolutions of the Congress from Sept. 1920 to Dec. 1933. 1924

(14) Resolutions of the C o n g r e s s By A. C. Muzumdar

(15) Civil Disobediance Inquiry Committee Report. 1922

(१६) भिन्न २ प्रान्तिक, जिल्हा आणि तालुका कॉंग्रेस कमेटीचे रिपोर्टस्

(१७) कांहीं सरकारी रिपोर्ट

(१८) India चें फाईल.

वरील पुस्तकांचा, वर्तमानपत्रांचे अंकाचा व रिपोर्टांच्या संकलकांस अतिशय

# भाग पहिला

## १९२० पावेतों

## प्रकरण पहिलें

### सामान्य भौगोलीक रूपरेषा

**मर्यादाः**—मराठी मध्यप्रांताच्या मर्यादा येणें प्रमाणें आहेत.

**उत्तरेसः**—बैतूल, छिंदवाडा, आणि बालाघाट जिल्हे.

**पूर्वेसः**—छत्तीसगड, पश्चिमेस—वर्धा नदी

**दक्षिणेसः**—निजामचें राज्य.

मराठी मध्यप्रांतात नागपूर, वर्धा, चांदा व भंडारा हे चार जिल्हे व एकंदर १६ तहासिल्या आहेत.

याचें एकंदर क्षेत्रफळ १९२०३ चौ. मैल असून एकंदर लोकसंख्या (१९३१ ची, शिरगणती) २६,१४,१६८ आहे. पुढील कोष्टकांत या प्रांतांचें क्षेत्रफळ व लोकसंख्या याबाबत तपशीलवार माहिती दिली आहे.

| जिल्ह्याचे नांव | क्षेत्रफळ (चौ. मै.) | १९२१ | १९३१ | खेड्यांची संख्या. |
|---|---|---|---|---|
| नागपूर— | ३८३४ | ७,७२,२९५ | ९४००४९ | १६४४ |
| वर्धा— | २४३२ | ४,६३,६९६ | ५१६,२६६ | ९३९ |
| चांदा— | ९३१२ | ६,६०,६३० | ७५९६९५ | २३८५ |
| भंडारा— | ३६२३ | ७,१७,७४७ | ८२४४९६ | १४९ |

| तहसिलीचे नांव. | लोक संख्या (१९३१) | मुख्य शहरें | लोकसंख्या (१९३१) |
|---|---|---|---|
| नागपुर | ३७७०३९ | नागपूर | २१५१६५ |
| | | कामठी | २०७८७ |
| रामटेक | १३४६६३ | रामटेक | ८९३९ |
| उमरेड | १५४०६५ | उमरेड | १७९१२ |
| काटोल | १४८५८८ | काटोल | १०९०० |
| | | कळमेश्वर | ४६६५ |
| सावनेर | १२५६९४ | सावनेर | ७९६९ |
| | | खापा | ८१९१ |
| वर्धा | २०५१०५ | वर्धा | १९५७१ |
| | | पुल्गांव | ७८४५ |
| | | देवळी | ६२०९ |
| हिंगणघाट | १७५२३८ | हिंगणघाट | २२६०१ |
| आर्वी | १३५९२३ | आर्वी | १६२९३ |
| चांदा | १८७५७९ | चांदा | २८३८१ |
| वरोरा | १७४०८६ | वरोरा | ९८११ |
| ब्रम्हपुरी | १५५२६२ | ब्रम्हपुरी | ५२१६ |
| सिरोंचा | ७२६७८ | | |
| गडचिरोली | १७००९० | | |
| भंडारा | ३५२३१५ | भंडारा | १६,७३८ |
| | | तुमसर | १०,०६१ |
| | | पौनी | १२,५३५ |
| गोंदिया | ३३८३४९ | गोंदिया | १४९५७ |
| साकोली | २३३८३२ | | |

**निसर्ग संपत्तिः**—या प्रांताच्या उत्तरेस व दक्षिणेस सातपुडा पर्वताच्या शाखा असून चांदा जिल्ह्यांत दाट जंगल आहे. या जंगलातच प्रसिद्ध आलापिली सागवन मुबलक सांपडतो. भंडाऱ्याच्या जंगलांत विडीचीं पानें विशेषतः मिळतात. तशीच लाखही पुष्कळ होते. पश्चिमेस वर्धा व पूर्वेस वैनगंगा अशा दोन मोठ्या नद्या या प्रांतातून जातात. आणि यांचे कांठचा प्रदेश सुपीक आहे. भंडारा व चांदा जिल्ह्यांत पाऊस अधिक पडतो. व तेथें विशेषेकरून तांदूळ उत्पन्न होतो. तुमसरचा तांदूळ प्रसिद्ध आहे. नागपूर व वर्धा जिल्ह्यांत पावसाचे प्रमाणे फक्त ४५ इंच इतकेच आहे. या भागांत कापूस हे प्रमुख पीक आहे. नागपूर व आसपासच्या भागांत जगप्रसिद्ध संत्रा होतो.

**खनिज संपत्तिः**—चांदा जिल्ह्यांत कोळशांच्या खाणी आहेत. वरोऱ्याची खाण १९०६ सालीं बंद झाली पण अलीकडे बल्लारशाह येथें बराच कोळसा उत्पन्न होतो. नागपूर व भंडारा जिल्ह्यांत मँगॅनीजच्या खाणी आहेत. महायुद्ध काळी चांद्याचा कोळसा आणि नागपूर भंडाऱ्याचें मँगॅनीज यांना भक्कम मागणी होती सध्या त्या मानानें दोन्ही धंदे आज उतारावर आहेत.

**प्रमुख नद्याः**—वर्धा, कन्हान व वैनगंगा ह्या प्रमुख होत. या शिवाय कन्हानला शेर, पेंच इ० नद्या आणि वर्धा नदीस पैनगंगा, वेणा इत्यादि नद्या मिळतात. चांद्याच्या दक्षिण सीमेवर वर्धा आणि वैनगंगा यांचा संगम होऊन त्यांस प्राणहिता असे नांव मिळतें व ही प्राणहिता पुढें गोदावरीस जाऊन मिळते.

**धर्मः**—हा प्रांत मध्यवर्ती असल्यामुळें येथे सर्व धर्मांचे लोक आहेत. त्यापैकीं प्रमुख धर्मीय लोकांची संख्या पुढें दिली आहे.

| जिल्ह्याचे नांव | हिंदू | मुसलमान | ख्रिस्ती |
|---|---|---|---|
| नागपूर | ८६२५१९ | ५३८०९ | ८५५८ |
| वर्धा | ४५२२८५ | २०९२८ | २७८ |
| चांदा | ६३०५१७ | १३५५६ | १२४३ |
| भंडारा | ६२७९५५ | १२९७६ | ४३० |

**भाषा**:—या प्रांताची प्रमुख भाषा मराठी आहे. त्या शिवाय अखिल हिंदुस्थानांतून जे लोक येथे वस्ती करण्यांस आले त्यांच्या भाषा आहेतच. स्थानिक भाषांच्या दृष्टीनें या प्रांतात कशी वांटणी आहे. हे पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| जिल्ह्याचे नांव | मराठी | हिंदी | गोंडी |
|---|---|---|---|
| नागपूर | ७,१२,५३३ | १,४२,९१६ | ५२,१३९ |
| भंडारा | ५,१२,२५९ | ११०८९० | ७२८२९ |
| वर्धा | ४००१३१ | ५२७६७ | ४८७१८ |
| चांदा | ५४८०११ | ४६४४१ | १,०९,८२२ |

## हिंदूंतील पोटजातींची जिल्हेवार संख्या.

| जातीचें नांव | नागपूर जि० | भंडारा जि० | वर्धा जि० | चांदा जि० |
|---|---|---|---|---|
| ब्राम्हण | ३७,८३८ | ८,५६१ | १५३३९ | ७,६१४ |
| रजपूत | १२०४८ | ८०,४५४ | ३९४८ | २२५६ |
| कुणबी | १,७६२७९ | १,०२,७२९ | ९३,१०७ | १२५,४७४ |
| माळी | ३४०७४ | २६,०५३ | २१,३६३ | ३८४३८ |
| वाणी | ६५९८ | ९८५ | ८७७८ | १४३२ |
| जैनवाणी | ३६२१ | १५६० | २८९९ | १००२ |
| मराठे | ९९५८ | ९८५ | ८७७८ | १४३४ |
| कोष्टी | ४७,१४९ | १८,७५२ | ७४८७ | १३५६६ |
| गोवारी | २१,९६० | ४३,९७८ | १७,५३९ | १०,९१३ |
| लोहार | १२,२५१ | १७००२ | ४०५४ | १२४०० |
| न्हावी | १५,१४७ | ५३७३ | ९४७९ | ५६२३ |
| तेली | ७९,९४२ | ५६४४८ | ५५,८२३ | ४३,१७४ |
| धोबी | ९०९२ | ५०२४ | ४९११ | ५६४१ |

| जातींचें नांव | नागपूर जिल्हा | भंडारा जिल्हा | वर्धा जिल्हा | चांदा जिल्हा |
|---|---|---|---|---|
| कुंभार | ४३३८ | ३३३१ | २५१४ | ३६८२ |
| गोंड (हिन्दू) | ४३,३४७ | ४१६८१ | ११,९८५ | २५,३०२ |
| गोंड (मूळ) | ९,६५५ | ३६०८ | ३१,२१० | ७०,०५६ |
| भोयर | ३८९५ | ६० | १४२३८ | ... |
| महार | १,६४,८३७ | १,५०५९५ | ८०,७८० | १,०४,७७४ |
| मांग | ९,१८२ | ३,२७४ | ७,३३७ | ९३५ |
| मेहतर | ४४८९ | १,०३३ | ९८० | ७५० |
| चांभार | १०,०५३ | ६७९० | ३५६९ | ३८५३ |
| यसोड | १५१२ | १४१० | ३७५ | २६०१ |

**उद्योगधंदे**—या प्रांतांतील शेंकडा ७४.२ लोक शेतीचें काम करतात. बाकीचे लोक निरनिराळ्या व्यवसायांत आहेत. मोठ्या शहरांतून मजूरी करणारे लोक पुष्कळ आहेत. खेड्यांतून कांहीं वर्षांपूर्वीपावेतों कोष्ट्यांचा धंदा प्रमुख असे व अजूनही तो रडत खडत चालला आहे. १८२७ सालीं रेसिडेंट मि. जेकिन्स यांनीं धाडलेल्या रिपोर्टांत कापडाच्या धंद्यांचा खास उल्लेख आहे. नागपूर, उमरेड, पौनी, भंडारा इ० कापडपेठा त्या काळीं फार प्रसिद्ध होत्या. धोतरजोडा दोन पासून २५ रुपयांपावेतो व पितांबर पांचशेंपावेतो विकत असे. चांदा व भंडारा जिल्ह्यांत पितळेचीं भांडीं तयार होतात.

# प्रकरण दुसरें



## प्राचीन इतिहास

मराठी मध्यप्रांताचा प्राचीन इतिहास लिहिण्यापूर्वी त्याचें प्राचीन वैभव चित्रित करणें आम्ही योग्य व जरूर समजतो. हा प्रांत वास्तविक आर्ययुगांत प्राचीन विदर्भ प्रांतात मोडत होता. अशोकाचे वेळीं ( इ. स. पूर्वी २७३ पासून २३२ वर्षेपर्यंत ) हा प्रांतहि बौद्धमतावलंबी होता. बौद्धाची स्मारकें ( जी भादक व राम टेक मध्यें आहेत ) ही त्याचें प्रमाण आहे. दक्षिणचे आंध्रवंशीय राजे हे अशोक राजाचे मांडलीक होते. हे लोक शातवाहन म्हणवीत होते हा लोकांची स्मारक व नाणीं हा वरून हें सिद्ध होतें की त्यांचे हि राज्य हा प्रांतावर होते.

चांदा जिल्ह्यांत राजा शातकर्णी याची नाणीं मिळाली आहेत.

सध्यांचें नागपूर शहर वसलें आहे, त्या प्रदेशात फार प्राचीन काळापासून वसाहत झालेली दिसते. नागपूरपासून तीन चार मैलांच्या अंतरावर ठिकठिकाणीं मोठमोठे दगड वर्तुलाकार वसविलेले आढळतात. हीं या प्रांतातील मूळ रहिवाशाची कबरस्थानें असावीत असा तर्क आहे.

कालिदासाच्या मालविकाग्निमित्रांत वर्धा नदीमुळें विदर्भाचे दोन भाग झाल्याचें दाखविलें आहे. पैकीं पूर्वेकडील भागांत नागपूर प्रांताचा समावेश होत असावा. नागपूरच्या वायव्येस सात मैलांवर माहुरझरी नांवाचें लहानसें खेडें आहे, तेथें अद्यापि फार प्राचीन काळच्या विटांचे ढीग दिसतात आणि निरनिराळ्या रंगाचे मणी व दगडांच्या मुद्रा वरचेवर सापडतात.

अशी एक मुद्रा गेल्या महिन्यांतच तेथें सांपडली आहे; व तिच्यावरील अक्षरवाटिकेवरुन ती इ. स. च्या दुसऱ्या शतकांतील असावी, असें वाटतें. नागपूरच्या ईशान्येस २४ मैलांवर रामटेक हें क्षेत्र अत्यंत प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. तेथें इ. स. च्या पांचव्या शतकांतील वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन

याचा एक ताम्रपट सांपडला आहे. याच राजाच्या मातेच्या दुसऱ्या एका ताम्रपटांत रामटेक वरील श्रीरामचंद्राच्या मंदिराचा उल्लेख आहे. कालिदासाच्या मेघदूतातील रामगिरी म्हणजे रामटेकच हें आतां निर्विवादपणें सिद्ध झालें आहे. या सर्व उल्लेखा-वरून या प्रदेशाची स्थिती शकाच्या आरंभीच्या शतकांत चांगलीच भरभराट झालेली असावी असें वाटतें.

नागपूरशहराजवळचा प्रदेश फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध असला तरी इ. स. च्या दहाव्या शतकाच्या मध्यापर्यंत खुद्द नागपूर शहराचा नामनिर्देश कोरीव लेखांत आढळत नाहीं. नागपूर, नन्दिवर्धन, नागवर्धन, (सध्यांचें रामटेक जवळचें नागर्धन) इत्यादि नांवांवरून हीं गावें नागवंशीय राजांनीं किंवा लोकांनीं स्थापिलीं असावींत, असें वाटतें. उत्तरेंत कुशाणवंशीय राजाचें साम्राज्य स्थापित झाल्यामुळें नागवंशीय राजांनी इ. स. ८० ते इ. स. १०५ या काळांत या प्रदेशांत येऊन वसति केली, असें प्रसिद्ध संशोधक कै. जयस्वाल यांचे मत आहे. या काळांतच येथें नागार्जुन हा प्रसिद्ध बौद्ध तत्वज्ञानी होऊन गेला.

पुढें वाकाटकाचें राज्य येथे स्थापन झाल्यावर नागवंशीय राजांनीं थोडें पूर्वेस सरून कोसल, (छत्तीसगड) प्रांतांत आपलीं राज्यें स्थापिलीं. नागपूर शहराचा प्रथम स्पष्ट उल्लेख राष्ट्रकूट नृपति तृतीय कृष्णराजा याच्या इ. स. ९४० च्या ताम्रपटात आढळतो या ताम्रपटात नागपूरपासून थोड्या अंतरावर वाहणाऱ्या कन्हान नदीचाही निर्देश आहे.

सन ७३९ मध्यें प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग भांदकचे राज्याचा पाहूणा होता. त्यानें त्यावेळीं त्या राज्याचें वर्णनही लिहिलें आहे. तेथूनच तो पुढें महा-राष्ट्रांत पुलकेशी राजाकडे गेला. ८ व्या शतकापर्यंत भांदक येथें प्रबळ राजे राज्य करीत होते. नंतर मालखेडच्या राष्ट्रकूट राज्यांनी आपलें आधिपत्य येथें स्थापन केलें.

फार प्राचीन काळापासून या भगांत अनेक राज्यें उदयास आलीं व कालांतरानें नाश पावलीं. त्याचें थोडक्यांत सिंहावलोकन करणें अप्रस्तुत होणार नाहीं. शुंगकाळीं (इ. स. पू. दुसरें शतक) येथें स्वतंत्र राज्य होतें. हें कालि-दासाच्या मालविकाग्निमित्रावरून दिसतें. त्यांच्यानंतर क्रमानें सातवाहन, आभीर वाकाटक यांच्या राज्यांत या प्रदेशाचा अंतर्भाव झालेला दिसतो.

वाकाटकांच्या राजवटींत या प्रांताची चांगलीच भरभराट झाली असावी. रामटेक जवळचें नागर्धन ही वाकाटकांची एका काळीं राजधानी होती असें कांहीं संशोधकांचे म्हणणें आहे.

वर उल्लेखिलेल्या माहुरझरी खेड्यांत वाकाटक कालीन मुद्रा सांपडली आहे. वाकाटकानंतर प्रथम कलचुरी व नंतर चालुक्य यांचें राज्य या प्रदेशावर स्थापित झालें. तथापि त्यांचे कोरीव लेख या प्रदेशात सांपडले नाहींत. नंतरच्या राष्ट्रकूट राजांचे मात्र कांहीं लेख या भागांत मिळाले आहेत. पैकी एकाचा उल्लेख वर केलाच आहे. राष्ट्रकूटानंतर उदयास आलेल्या उत्तर चालुक्यांच्या एका मांडलिकाचा लेख नागपूरच्या उपनगरांत सीताबर्डी येथें सांपडलेला प्रसिद्ध आहे.

यानंतर हा प्रदेश इ. स. च्या ११ व १२ व्या शतकांत धारच्या परमार राजांच्या राज्यांत मोडत होता. इ. स. ११०४ ची नागपूर येथें सांपडलेली परमार वंशीय नृपतींची सुंदर काव्यमय भाषेंत रचलेली प्रशस्ति प्रसिद्ध आहे. परमारांनंतर देवगिरीच्या यादव घराण्यानें हा प्रांत आपल्या राज्यास जोडला. रामचंद्र यादवाचा एक त्रुटित लेख रामटेकावरील लक्ष्मणाच्या देवळांत अद्यापि विद्यमान आहे.

## नागपूर शहर

प्राचीन म्हणून नागपूरची जी माहिती वर दिलेली आहे, ती नागपूर शहराची नसून, ज्या ठिकाणीं आज नागपूर शहर वसलें आहे त्या प्रदेशाची आहे, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. अठराव्या शतकांत गोंड राजाचे राज्य येथें असतांना त्यांचा जो किल्ला येथें होता, त्या समोंवतीं हळू हळू या शहराचा विस्तार झाला असावा, असा तर्क आहे. शहाजहान बादशहाच्या दहाव्या वर्षाच्या वर्णनांत ( इ. स. १६३७ ) अबदुल हमीद लोहारी यानें नागपूरचा उल्लेख केलेला आढळतो. त्यावेळीं नागपूर हा एक मोठा किल्ला असून त्या समोंवती मजबूत तटबंदी होती, असें वर्णन आहे.

## गोंड राजे

सोळाव्या शतकापासून नागपूर शहराच्या इतिहासास खरी सुरवात होते. या शतकाच्या शेवटीं गोंड राज्याची स्थापना करण्यांत आली. या राज्याची राजधानी

पूर्वी छिंदवाड्यापासून २४ मैलांवर असलेल्या देवगड गांवीं होती. बख्तबुलंद हा या घराण्याचा तिसरा किंवा चौथा पुरुष समजला जातो. त्यानें दिल्लीस जाऊन औरंगजेबाचे कारकिर्दीत मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. राजकारणांत हा कुशल असून त्यानें आपल्या राज्याला नवे प्रांत जोडले व राज्यही बरेंच वाढविलें. त्याच्या राज्यांत शान्तता व शिस्त असल्यामुळें राज्याची एकंदर भरभराट होत गेली. व्यापार, उद्योगधंदे आणि कला यांनाहि बरेंच उत्तेजन मिळालें. नागपूर शहराची पुनर्घटना करणारा हाच पुरुष होय. बख्तबुलंदाचा मुलगा चांद सुल्तान हाहि आपल्या बापासारखा पराक्रमी होता. त्यानें नागपूर हें आपल्या राजधानीचें शहर करून राज्यविस्तारही बराच केला. चांद सुल्तान १७३९ मध्यें मरण पावला व त्याचा पुत्र मीर बहादूर हा गादीवर बसला. परंतु थोडक्याच दिवसांत चांद सुल्तानाच्या वलीशहा नांवाच्या अनौरस पुत्रानें राजाचा खून करून गादी बळकाविली. चांद सुल्तानाची राणी रतनकुंवर हिला हें आवडलें नाहीं. म्हणून पेशव्यांकडून तिनें मदत मागितली. रघूजी भोंसले हे त्या वेळीं वऱ्हाडांत असल्या-मुळें त्यांनीं वलीशहाला पदच्युत करून ठार मारलें. व राणी रतनकुंवर हिच्या अकबरशहा व बुऱ्हानशहा या दोन पुत्रांपैकीं पहिल्यास गादीवर बसविलें या दोन बंधुमध्येंहि लौकरच कलह सुरू झाला; व पुनः १७४३ मध्यें तिनें रघुजीची मदत घेऊन अकबरशहास हांकून लावलें.

इकडे चांद्यांतहि प्रबळ गोंड राज्य होतें. ह्या राज्याची स्थापना सन १२४० मध्यें भीमबल्लाळनें वर्धा नदीचे कांठी केली. सन १७४८ पर्यंत तर चांद्याचें गोंड राज्यांचें हे स्वतंत्र राज्य कायम होतें. शेवटीं नागपूरचे रघोजी भोंसले ह्यांनीं राजा-नीळकंठ याजपासून हें राज्य हिसकून त्याला पेन्शन देऊन आपले राज्यांत जोडलें.

## नागपुरांत मराठे

या नंतर खरी राजसत्ता रघूजीनें आपल्याच हातीं ठेवल्यामुळें गोंड राजास केवळ नामधारी राजा म्हणून रहावें लागलें. तथापि, त्याच्या मानमरातबांत केव्हांहि कमी पडूं न देतां, रघूजीनें त्यांना मित्रत्वाच्या नात्यानें वागविलें. त्यांच्या या स्नेह-भावाचें एक उदाहरण असें देतां येईल कीं रघोजी बाहेर स्वारीवर जाताना आपलीं बायका मुलें गोंड राजाचे स्वाधीन करून जात असे. गोंड राजाला रघुजीनें तीन

लाखांचें वर्षासन करून देऊन शिवाय रहाण्याकरितां एक किल्लाही दिला होता. आजही गोंड राजाचे वंशज नागपुरांत राहात आहेत. मराठ्यांकडे नागपूरचा प्रांत आल्यानंतर या प्रांतांत मराठी भाषेचा विशेष प्रसार होऊं लागून, मराठी चाली रीतीहि जास्त रुढ होऊं लागल्या; व तेव्हांपासून या गोंडी प्रांतात नवीन व जास्त सुधारलेल्या संस्कृतीचा प्रसार होण्यास मदत झाली, असें म्हटलें तरी चालेल.

रघुजीनंतर त्याचा वडील मुलगा जानोजी हा गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दीत पेशवे व निझाम यांच्या स्वाऱ्या नागपूरवर होऊन नागपूरकरांचें वैभव वरेंच कमी झालें. जानोजी हा निपुत्रिक असल्यामुळें आपल्या भावाचा मुलगा दत्तक घेतल्यानंतर १७७२ मध्यें तो मरण पावला.

रघुजी हा गादीवर बसला त्यावेळीं तो अगदीं लहान म्हणजे १२ वर्षांचा असल्यामुळें त्याचा बाप मुधोजी व चुलता साबाजी यांच्यात राज्यकारभाराविषयीं तंटे सुरू झाले.

शेवटीं पांचगांवच्या लढाईत साबाजी मारला जाऊन मुधोजीच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं. दुसऱ्या रघूजीच्या कारकीर्दीत नागपूरची भरभराट होत गेली. आताचे मध्यप्रांत वऱ्हाड, ओरिसा व छोटा नागपूर हे त्या वेळी नागपूरच्या राज्यांत होते. यावरून या राज्याची सरहद्द बरीच पुढें जाऊन राज्याची भरभराट केवढी झाली होती, ही गोष्ट लक्षांत येते. रघुजीचें पुण्याच्या दरबारीं वरेंच वजन होतें व त्याची प्रजाही त्याच्यावर चांगलें प्रेम करीत असे. १८०३ पासून नागपूरच्या राज्याला उतरती कळा लागली. रघूजीनें शिंद्याशीं सख्य केल्यामुळें आडगांवच्या लढाईत त्याचें वरेंच नुकसान झालें. त्यामुळें नागपूरच्या राज्यांतील एक 'तृतीयांश असा अत्यंत संपन्न भाग जाऊन त्या भागाला त्याला कायमचें मुकावें लागलें. या नंतर इंग्रजाशीं झालेल्या तहाप्रमाणें माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन या इंग्रज रेसिडेंटाची नेमणूक नागपूर येथें करण्यांत आली. यानंतर नागपूरच्या तिजोरींत पैशाची भयंकर तूट पडल्यामुळें राज्यव्यवस्थाही नीट राखणें कठीण होऊं लागलें व पेंढारी लोकांना नागपुर शहर लुटणें कठीण गेलें नाहीं. १८१६ मध्यें रघूजी वारल्यानंतर त्याचा आंधळा मुलगा परसोजी गादीवर बसला. पण खरीं राज्यसूत्रें अप्पासाहेबांच्या हातीं देणें भाग होतें. अप्पासाहेबांनीं विषप्रयोग करून रघूजीला ठार मारलें असें म्हणतात.

परसोजीचा अगदीं जवळचा नातलग अप्पासाहेबच असल्यामुळे तेच गादीवर बसले. त्या पूर्वीच ब्रिटिशांशीं झालेल्या तहानें नागपूरला सीताबर्डीवर तैनाती फौजेचें ठाणें बसलें. आतां जेथें मॉरिस कॉलेज आहे, तेथें पूर्वी ब्रिटीश रेसिडेंट रहात असे. आप्पासाहेब गादीवर बसल्यानंतर ब्रिटिशांशीं त्यांचें पटेना; पेशव्यांशीं मात्र त्यांचा स्नेह होता. शिंद्यांशीं त्यांचें बरें होतें. इंग्रजांना या गोष्टी आवडत नसाव्या. या नंतर अप्पासाहेबांनीं सीताबर्डी येथील ब्रिटिश रेसिडेंसीवर हल्ला केला. (१८१७.)

या लढाईत अप्पासाहेबांना अपयश येऊन तोफखानाही ब्रिटिशांच्या स्वाधीन करावा लागला. या नंतर नागपूर शहर घेण्याकरितां ब्रिटिशांनीं दोन हल्ले केले. पण शहर घेणें त्यांना कठीण गेलें. कारण शुक्रवार दरवाजा व तुळशीबाग ही मान्याची मुख्य ठिकाणें विश्वासू अरब शिपायांनीं रोखलेलीं होतीं.

इंग्रजांनीं अरबांना बाहेर सुरक्षित जाऊं देण्याचें अभिवचन देऊन ते निघून गेल्यावर शहरांत प्रवेश केला.

असून भोंसले घराण्याच्या मूळच्या जहागिरीपैकीं तें आहे. सध्यां जानोजीच्या दोन मुलांपैकीं राजे रघुजीराव भोंसले यांना हे सरकारी पेन्शन मिळतें. यांचे धाकटे बंधु राजे लक्ष्मणराव हे गेल्या वर्षीच मरण पावले.

नागपूर वऱ्हाड हा प्रांत पूर्वी चीफ कमिशनरच्या ताब्यात असे. परंतु मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणा नंतर येथें गव्हर्नरची नेमणूक झाली.

---

# प्रकरण ३ रें



## लोक जागृतीचे पहिले किरणः कॉंग्रेसची स्थापना.

इंग्रजांनीं राज्य मिळविल्यानंतर शांतता प्रस्थापन करतांना प्रथम त्यांचा संबंध पराभव पावलेले राजे, सरदार व सेनापती यांच्याशी आला. पण पुढें राज्याचा जम बसून राज्यकारभार चालविण्याकरितां मदतनीस मिळावे म्हणून त्यांनीं इंग्रजी शिक्षणाचा प्रसार केला; तेव्हां साहजिकच सरदार व राजेरजवाडे इत्यादींचा संबंध कमी होऊन सुशिक्षित हिंदी लोकांचा संबंध वाढण्याप्रमाणावर येऊं लागला. कांहीं हिंदी विद्यार्थी त्यावेळींही विलायतेंत शिक्षण घेण्यास जात. त्यांना तेथें विशेष मोकळेपणीं आधुनिक राजकारणाचें आकलन करण्याची संधि मिळे आणि हिंदुस्थानांत परत आल्यावर त्यांना सार्वजनिक कार्य सुरू करावेंसें वाटे. वातावरणांतील हा बदल कलकत्त्यास प्रथम सुरू होऊन पुढें तो हळुहळू इतर प्रांतांतूनही होत राहिला.

१८५१ मध्यें कलकत्त्यास ब्रिटिश इंडिया असोसिएशन स्थापन होऊन १८५३ मध्यें मुंबईस व मद्रासलाही बाँबे व मद्रास असोसिएशन्स स्थापन झालीं. १८७० सालीं पुण्यास सार्वजनिक सभा स्थापन झाली. १८७६ मध्यें सुरेंद्रना

बानर्जींच्या परिश्रमानें कलकत्त्याचें इंडिअन असोसिएशन स्थापन झालें. १८८५ त मद्रासचें असोसिएशन नामशेष झालें त्याऐवजी तेथें महाजन सभा स्थापन झाली. याच सुमारास मुंबईचें असोसिएशन थंडावूं पहात होतें त्याला मि. बद्रुद्दीन तैय्यबजी, श्री. काशीनाथ त्र्यंबक तेलंग वगैरे मंडळींनी पुनः उर्जितावस्थेस आणलें. या सर्व संस्थांच्या स्थापनेवरून १८५१ ते १८८५ पावेतोंचा काळ एकंदर वातावरण बदलण्यांत आणि हिंदी जनतेंत आधुनिक प्रातिनिधीक संस्थांची आवड उत्पन्न करण्यांत कसा गेला हें लक्षात येईल. १८८५ सालापावेतों वातावरण इतकें बदललें होतें कीं कलकत्ता, मुंबई, मद्रास वगैरे ठिकाणीं अनेकांच्या मनांत हिंदुस्थानात एखादी अखिल भारतीय संस्था स्थापण्याचे विचार एक समयावच्छेदेंकरुन चालू होते. १८८४ च्या डिसेंबरांत अड्यार ( मद्रास ) येथें थिऑसॉफिकल सोसायटीच्या वार्षिक संमेलन प्रसंगीं अखिल हिंदुस्थानांतील जी प्रमुख मंडळी जमली होती त्यांचें संमेलनच १८८५ त स्थापन झालेल्या कॉंग्रेसचा खरा मूलारंभ होय. असें डॉ. बेझंट बाईंचें म्हणणें आहे. ह्यूम साहेबांनीं कॉंग्रेस स्थापन केली हें तर नमूदच आहे. ह्यूम साहेबांनीं कॉंग्रेसच्या स्थापनेला कां मदत केली याचें आज पुष्कळांना आश्चर्य वाटेल पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. १८५७ सालच्या बंडानंतर हिंदुस्थानांतील असंतोषाला सनदशीर मार्गाच्या चाकोरींत नेऊन सोडणें इंग्रजांच्या दृष्टीनें फार महत्वाचें आहे हें ज्यांना पटलें त्यांपैकी ह्यूम साहेब प्रमुख होत. याबाबतींत त्यांनी खुद्द लॉर्ड डफरीन साहेबांशीही चर्चा केली. इतकेंच नव्हे तर ह्यूम साहेबांना वाटे कीं प्रांतोप्रांतींच्या गव्हर्नरांना कॉंग्रेसचें अध्यक्ष बनवावें. पण लॉर्ड डफरीन म्हणाले कीं असें केल्यास हिंदी लोक मनमोकळेपणानें बोलणार नाहींत व आपला उद्देश विफल होईल म्हणून शेवटीं कॉंग्रेसला लोकांच्या स्वाधीन ठेवण्याचेंच ठरलें. या कल्पनेचा जनक मी आहे याची वाच्यता आपण हिंदुस्थानांत असेतों करूं नये असेंही डफरीन साहेबांनीं ह्यूम साहेबांना बजावलें होतें. ह्यूम साहेब एवढ्यावरच थांबले नाहींत तर मुद्दाम विलायतेस जाऊन त्यांनीं कॉंग्रेसकरिता अनुकूल लोकमतही तयार केलें. याबरोबरच कलकत्त्यास सुरेंद्रनाथ बॅनर्जी प्रभृतींच्या मनांत आणि मुंबईस न्यायमूर्ती तेलंग, बद्रुद्दीन तैयबजी यांच्या मनांतही असेच विचार चालू होते. अशा परिस्थितींत कॉंग्रेसच्या स्थापनेचें अगर कल्पनेचें संपूर्ण श्रेय कोणा एकालाच देणें अन्यायाचें होईल. अनेकांच्या मनांत निरनिराळ्या कारणांमुळें एकाच वेळीं जो विचार आला तो)

स्थापन करण्यांत आल्या व या सभेच्या वार्षिक संमेलनास अखिल हिंदुस्थानांतील मंडळी येत. मुंबई प्रांतांत या कामास मदत मिळविण्याकरितां जेव्हां येथून प्रचारक गेले तेव्हां त्यास भिवंडीचे वकील श्री. भास्करराव खरे ( डॉ. खरे यांचे वडील ) यांनीं प्रथम मदत केली. गोरक्षणकार्यांत प्रमुखत्वानें भाग घेणारे श्री. गोपाळराव भिडे यांचें मुंबई भागांतही त्यांच्या गांवीं पुष्कळ वजन असे; त्याचा त्यांनीं गोरक्षणास पुष्कळ उपयोग करून घेतला.

१८८७ च्या मद्रास कॉंग्रेसला आपल्या प्रांतांतून १३ डेलिगेट गेले. या कॉंग्रेस मध्यें प्रथम मंडप घालण्यात आला. तामील भाषेंत मंडपाला पेंडाल म्हणतात. तेव्हांपासून कॉंग्रेस मंडपाबद्दल व आतांतर परिषदांच्या मंडपांबद्दल वापरण्यांत येणारा पेंडाल शब्द प्रचारांत आला.

१८८८ च्या अलाहाबाद कॉंग्रेसच्या वेळेस सरकारनें प्रथम कॉंग्रेस विरोधाचें धोरण उघडपणें स्वीकारलें ज्या जागीं अलाहाबादेस कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्याचें ठरावें त्या जागेला सरकारनें हरकत घ्यावी असें झाल्यामुळें कॉंग्रेसला सात आठवडे उरले तरी बैठकीची जागा अनिश्चित राहिली. शेवटीं अलाहाबादमधील लौथर कॅसल नावाची एक जंगी इमारत दरभंग्याच्या महाराजांनीं विकत घेतली आणि ती कॉंग्रेस बैठकीच्या कामास दिली. या कॉंग्रेसमध्येंच एक स्वदेशी दुकान उघडण्यांत आलें होतें. अर्थात् प्रदर्शनाच्या कल्पनेचाही बीजरूपानें या कॉंग्रेसमध्येंच सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. या कॉंग्रेसमध्यें प्रतिनिधींच्या झोपड्या प्रांतवार बांधण्यांत आल्या होत्या. विषय नियामक कमिटी निवडण्याची प्रथाही येथेंच प्रथम सुरू करण्यांत आली. इतकेंच नव्हे तर राजा शिवप्रसाद नावाच्या गृहस्थांनीं डेलिगेट होऊन व्यवस्थितपणें कॉंग्रेसला उघडपणें खुल्या अधिवेशनांत विरोध करून हाही पायंडा येथेंच प्रथम पाडला अर्थात् याना गप बसविण्यांत आलें म्हणून त्यांच्या विरोधानें त्यावेळीं त्रास झाला नाहीं अगर ते एकटेच होते म्हणून एखादें रणही माजलें नाहीं

१८८९ च्या मुंबई कॉंग्रेसला आपल्या प्रांतांतून २१४ प्रतिनिधी गेले होते. नागपूरकरांनीं कॉंग्रेसच्या अधिवेशनात प्रथम उत्साहानें भाग घेतला तो मुंबईस. या बोर्डरचे प्रतिनिधी निवडण्याकरिता प्रांतभर हवानगी चळवळही झाली. लो. टिळक

प्रथम काँग्रेसला मुंबईच्या अधिवेशनास गेले. वरील २१४ प्रतिनिधींत आजच्या प्रांतिक कॉंग्रेस कार्यकर्त्यांपैकीं बऱ्याच मंडळीचे कुटुंबी गेले होते. सबब परिशिष्टांत दिलेली त्यांची यादी वाचकांना पुष्कळ मनोरंजक वाटेल.

१८९० च्या कलकत्ता कॉंग्रेसला वऱ्हाड मध्यप्रांत व सिकंदराबाद मिळून २१ प्रतिनिधी गेले होते. त्यावेळीं मि. ब्राडला यांनीं पार्लमेंटांत हिंदी कौंसिलांत सुधारणा करण्याबाबत एक बिल आणलें होतें. त्यांच्या बिलास पाठिंबा देणाऱ्या ठरावावर आपल्या प्रांतातर्फे बॅ. सी. व्ही. नायडू यांनीं भाषण केलें. या कॉंग्रेसमध्यें सरकारचा कॉंग्रेसविरोध विशेष स्पष्ट झाला. शिरस्त्याप्रमाणें गव्हर्नरसाहेबाकडे कॉंग्रेसचीं तिकिटें पाठविण्यांत आलीं. व तीं नाकारण्याबद्दल पुढें व्हाइसरायसाहेबांनीं खुलासाही केला. तरीपण सरकारी नोकरांवरील कॉंग्रेसमध्यें भाग न घेण्याची बंदी तशीच कायम राहिली. या कॉंग्रेसमध्यें सौ. कदंबिनी गंगूली यांचें भाषण झालें तें कॉंग्रेसच्या व्यास पीठावरील स्त्री प्रतिनिधीचें पहिलें भाषण होय. या कॉंग्रेसमध्यें पुढील कॉंग्रेस मद्रास अगर नागपूर येथें भरवावी असें ठरून नक्की कोठें भरवावी हें ठरविण्याचा अधिकार कॉंग्रेसच्या पदाधिकाऱ्यांना देण्यांत आला. शेवटीं नागपूरलाच कॉंग्रेस भरण्याचें ठरून पुढील १८९१ ची कॉंग्रेस नागपूरला झाली. तिचा सविस्तर वृत्तांत पुढील प्रकरणीं वाचावयास मिळेल.

---

# प्रकरण ४ थें

## १८९१ ची नागपूर काँग्रेस

त्यावेळचे नागपूरचे प्रसिद्ध बॅरिस्टर सी. नारायणस्वामी यांना स्वागताध्यक्ष निवडण्यांत येऊन त्यांना प्रो. भगीरथ प्रसाद, प्रो. कृष्णराव देशपांडे, रा. गोपाळराव भिडे, श्री. राजारामपंत दीक्षित, वऱ्हाडचे श्री. मुधोळकर, रा. सा. देवराव विनायक, श्री. जोशी इत्यादि मंडळी सहाय्य करण्यास होती. प्रो. भगीरथ प्रसाद व केशवराव जोशी हे स्वा. मं. चे चिटणीस होते. अखिल हिंदुस्थानांत निवडण्यांत आलेल्या १२४२ प्रतिनिधींपैकीं ८१२ प्रतिनिधी हजर राहिले.

श्रीमंत नवलोजीराव गुजर यांची लालबाग बॅ. सी. व्ही. नायडू यांजकडे भाड्यानें होती, ती श्री. नायडूंनी कॉंग्रेसच्या बैठकीस फुकट दिली. तेथें १६५ फूट लांब व ११० फूट रुंद असा मंडप उभारण्यांत येऊन प्रवेशद्वारावर "हिंदी राष्ट्रीय-सभा" अशी व आंतलेबाजूस "ईश्वर महाराणीस चिरायु करो" अशीं सुवर्णाक्षरें लाविलीं होती. प्रतिनिधींची व्यवस्था प्रांतवार केली होती. डेक्कन कॉंग्रेस स्टँडिंग कमिटीचे सेक्रेटरी श्री. बाळ गंगाधर टिळक यांच्या तैबूत विषयनियामक कमिटी नेमली गेली. लोकमान्यांचा व आपल्या प्रांतांचा अन्योन्य संबंध जणुंकाय ह्याहि घटनेंत दिसून आला.

## पहिला दिवसः सोमवार ता. २८ डिसेंबर १८९१

"दोन वाजतां भिन्न भिन्न ठिकाणांहून आलेल्या प्रतिनिधी व प्रेक्षक समूहानें सभामंडप फुलून आला होता. दक्षिणेकडील राव आणि पंत यांच्या विविध रंगाच्या पगड्या, मद्रासेकडील अय्यर आणि नायडू यांचे जरीकांठी रुमाल, वऱ्हाडांतील लोकांची चमत्कारिक पागोटीं, उत्तर प्रांतांतल्या मुसलमान लोकांच्या शुभ्र व रंगीत टोप्या, बंगाली बाबूंच्या वस्त्रहीन डोक्यांवरील कुरुंगरी कचभार आणि सिंधी लोकांच्या किनारेदार उंच टोप्या ह्या सर्वांची अप्रतीम शोभा दिसूं लागली."

स्वेच्छासेवकांचे गळ्यांतील हिरव्या, तांबड्या व सोनेरी अशा तीन रंगांचे कापडांचे पट्टे त्यांच्याबद्दल आदर भाव उत्पन्न करीत.

**स्वागताध्यक्षांचें भाषण:**—आभार प्रदर्शन व प्रास्ताविक झाल्यावर राष्ट्रीयसभा किती राजनिष्ठ आहे व तिचे कार्य किती पवित्र आहे तें स्पष्ट करून सांगतांना ते म्हणाले ' आम्हीं ग्रेट ब्रिटनची राजनिष्ठ प्रजा आहोंत. आणि हिंदुस्थान व इंग्लंड ह्यांचें चिरकाल ऐक्य असावें अशी आमची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे; तेव्हां हें ऐक्य कायम राहण्यास इंग्रजी राज्यपद्धतींतील दोष—निर्भिडपणें, योग्य व कायदेशीर मार्गानें—व्यक्त करणें अत्यंत अवश्यक असून त्यांत दोन्ही देशांचें हित केल्याप्रमाणें होणार आहे. हे दोष नाहींसे करून योग्य सुधारणा करण्याबद्दल तनमनधनें करून झटणारी अशी राष्ट्रीयसभा ही संस्था आहे. तिच्यायोगानें राज्यकर्त्यास चांगली मदत होत आहे; एवढेंच नव्हे तर राष्ट्रीय सभेचें म्हणणें ते अति शांतपणानें ऐकूं लागले आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. हिंदुस्थानचे प्रस्तुतचे व्हॉइसराय लॉर्ड लॅन्सडाऊन ह्यांनीं राष्ट्रीय सभेचा कायदेशीरपणा मान्य करून सरकारी नोकराशिवाय पाहिजे त्यास तिचे सभासद होण्याची पूर्ण मोकळीक आहे अशा अर्थाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला ही गोष्ट निःसंशय समाधानकारक आहे.

आपलीं दुःखें व आपल्यापैकीं एक षष्ठमांश लोकांची अत्यंत शोचनीय स्थिती विलायतेंतील सर्वांस समजावून देऊन त्यांचें साहाय्य आपण घेतलें पाहिजे. पार्लमेन्टकडून आपलें दुःख विमोचन करविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपण चांगल्या राज्य पद्धतीस पात्र आहोंत व खरे आर्यपुत्र आहोंत हें सिद्ध करून दाखविलें पाहिजे.

शेवटीं मध्यप्रांताचे चीफ कमिशनर मॅकडोनल्ड व वऱ्हाडचे कमिशनर कर्नल केनेथ मॅकेंझी ह्यांनी कोणत्याही प्रकारें सभेच्या कामास अडथळा न आणतां उलट लेखन द्वारें व भाषण द्वारें, सरकारी कामदारांनीं खुशाल राष्ट्रीय सभेस जावें असें उघडपणें प्रसिद्ध करून राष्ट्रीय सभेबद्दल आपली पूज्य बुद्धि व स्वतःचें मानसिक औदार्य प्रदर्शित केलें ह्याबद्दल त्यांचें आभार मानून अशा प्रकारचे कामदार जर सर्व हिंदुस्थानभर असतील तर मग राष्ट्रीय सभेची अवश्यकताच राहणार नाहीं असें सांगून आपलें भाषण संपविलें.

भिन्न जातींच्या योगानें अगदीं विभागून गेलें होतें तें एकत्र होणें म्हणजे केवळ स्वप्नवत् वाटत असे; पण हें स्वप्न माझ्या आयुष्यांत अगदीं खरें होत चाललें आहे.' नंतर तिसऱ्या मद्रासच्या सभेनें " हिंदुस्थानचा एक भाग अगदीं अंधःकारांत आहे " हा कलंक नाहींसा करून टाकला. त्यावेळीं सर्व जातींचे व सर्व धर्मांचे लोक आले होते इतकेंच नव्हे तर मुसलमानांची संख्या दुप्पट झाली होती. त्या सभेनें जो अभेद्य पाया घालून दिला त्याच्याच आधारावर सभेचा यशचंद्र शुक्लेंदुवत् वृद्धि पावून तो उत्तम प्रकारें प्रकाशित झाला.

आजपर्यंत धर्म, भाषा व स्थलभिन्नत्वामुळें आपल्यांत असलेला परकी भाव राष्ट्रीय सभेच्या बहुमोल कामगिरीमुळें हळूं हळूं नष्ट पावत असून आज आपण सर्व एकाच कुटुंबांतील माणसें आहोंत असें मानूं लागलों आहोंत ही खरोखरच अभिमानाची गोष्ट आहे आणि राष्ट्रीय सभेच्या पुण्याईनें आज मी सांगतों कीं अल्पकाळांतच आपलें बंधुत्वाचें नातें दृढ होत जाऊन आपण सर्व अत्यंत बळकट अशा आपुलकीच्या भावनेनें बांधले जावूं.

बांधवहो ! हा जसा आपणांस अदृश्य लाभ झाला आहे; त्याप्रमाणेंच कांहीं दृश्य फायदेही झाले आहेत. मुंबई येथें आपण प्रथम एकत्र जमलों त्यावेळीं हिंदुस्थान सरकारनें आपणांस ' एक वजनदार आणि विद्वान लोकांची मंडळी ' असें संबोधिलें. आणि गेल्या वर्षाच्या कलकत्ता येथील अधिवेशनाच्या वेळीं व्हाइसरॉय साहेबांनीं ' ही मंडळी सर्वसंमत कायदेशीर मार्गांनीं कायदेशीर काम सर्वमान्य नियमांप्रमाणें करणारी आहे ' असें उघड बोलून दाखविलें. त्याचप्रमाणें एतद्देशीयांचा सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरकाव, वायव्य प्रान्ताकरितां स्वतंत्र कौन्सिल, हीं सर्व आपल्या प्रयत्नांचीं दृश्य फळें होत व त्याबद्दल आपण अभिमान बाळगला पाहिजे.

मिळत नाहीं; कारण तो अधिकार ' हाउस ऑफ कामन्स ' ह्या सभेचा आहे व ती एकतर हयगय करते किंवा मुळींच नाकारते. अलाहाबाद येथील राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मि. यूल यांनीं त्यावेळीं असें सांगितलें कीं हिंदुस्थानची खरी परिस्थिति पार्लमेंटच्या सभासदांना माहीत नसते व त्यामुळें त्यांचेसमोर जाणाऱ्या प्रश्नांचा योग्य निकाल लागत नाहीं, ही अडचण दूर करण्यासाठींच ' ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी ' नांवाची एक लंडन येथें उदार व कळकळीच्या गृहस्थांची मंडळी स्थापन झाली असून तिचे चिटणीस मि. डिग्बी हे एकनिष्ठतेनें व अत्यंत कळकळीनें हें काम करीत आहेत. ह्यासाठीं डिग्बी साहेब व ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीचे सभासद यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून असेच सत्कार्यप्रवर्तक लोक आपणांस लाभोत अशी परमेश्वराची प्रार्थना करतों.

पार्लमेंटमध्यें ' इंडियनपार्टी ' स्थापन झाली आहे. तिचें दिव्य शिरोरत्न चार्लस ब्राडलॉ हे होते. परंतु निर्दय काळानें त्यांना आपल्यांतून हिरावून नेलें. त्यांची रिकामी झालेली जागा भरून काढणें व ती संस्था मजबूत करणें आतां आपलें एक महत्वाचें कार्य झालें आहे.

' ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीचा असा उपदेश आहे कीं आपलें आदिस्थान लंडन येथेंच ठेवावें. तेव्हां ह्या सर्व गोष्टींवरून हें सिद्ध होतें कीं आपल्या उद्देशाचें आंग्लजनांस पूर्ण स्पष्टीकरण करून देण्यास आपण राष्ट्रीय पताका खांद्यावर घेऊन विलायतेची यात्रा करावी म्हणजे त्यायोगें आमचे निंदक ' राजद्रोही ' ' आंग्लद्वेष्टे ' म्हणून आमच्यावर दुःशब्दांचा वर्षाव करतात तसल्या दुर्गुणांचा गंधही आमचें अंगीं नाहीं हें सिद्ध होईल.

लंडन येथें राष्ट्रीय सभा भरविण्याचा विचार बंद ठेवून किंवा लांबणीवर टाकून उपयोग नाहीं. याकरितां माझी अशी सविनय विनंती आहे कीं जें योग्य दिसेल मोठ्या बाण्यानें सिद्धीस नेण्याचा प्रयत्न करा. ह्यासंबंधानें दुसऱ्या कांहीं महत्वाच्या अडचणी नाहींत असें माझें म्हणणें नाहीं. ह्यात जातिबहिष्काराची एक मोठीच अडचण आहे व ती नुसत्या वाक्पांडित्यानें दूर होणारी नाहीं. तिच्याबद्दल आपणांस चांगलाच विचार केला पाहिजे. जगामध्यें राहून ज्या गृहस्थाश्रमी मनुष्यास

राजकीय व सामाजिक सुधारणा करण्याबद्दल प्रयत्न करणें अवश्य आहे त्यास स्मृतींची आज्ञा सर्वथैव पाळणें दुरापास्त आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचारकरून योग्य दिसेल तें करतांना आपल्यास बहिष्कृत केलें तरी हरकत नाही. आपलें कार्य अत्यंत न्याय्य व पवित्र आहे. त्यामुळे कालांतरानें आमचे शत्रू देखील मित्र बनतील व आपले बांधव समाजिक हक्क पुन: परत देतील असा माझा विश्वास आहे; तथापि अनिष्ट परिणाम झाल्यास राष्ट्रसभासत्ताचें पावेन असा एक वेगळी जातच निर्माण होईल व ह्या बहिष्कारामुळे त्या जातीस जास्त दक्षता येऊन ती हितकारक होईल.

लंडन येथें सभा भरविण्यांत यश येऊन कायदे कौन्सिलांमध्यें लोकनियुक्त सभासद घेण्याची योजना झाली तर त्या योगानें खऱ्या सुधारणांस अप्रत्यक्ष रीतीनें चांगली मदत होणार आहे. कारण अशा सभासदांस लोकांचे मताप्रमाणे वागावेंच लागेल व साहजिकच कोणत्याही कायद्यासंबंधानें लोकमत अनुकूल वा प्रतिकूल हे सिद्ध होऊन सरकारास बहुमतसंमत कायदे करण्यास ठीक पडेल व तें या योगानें लोकांच्या दोषारोपातून मुक्त होईल.

लंडन येथें काँग्रेस भरविण्याचा विचार कसाही होवो. परंतु हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत राष्ट्रीय सभेची माहिती पूर्ण ठसविली पाहिजे. अद्यापि आपणांस पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत. राष्ट्रीय सभेचे सर्व प्रयत्न वरकरणी असतात असें लोकांचे प्रचलित मत आहे. ह्याकरितां लोकांतील अज्ञानांधकार काढून त्यांना राष्ट्रीय सभेचे निस्सीम भक्त बनविलें पाहिजे. इंग्रज सरकारचे राज्य हें आतां परक्या लोकांचे नसून पूर्वीचे क्षत्रिय तेच ब्रिटिश सरकार होय हें लोकांना सांगणें आपलें अत्यंत पवित्र असें कर्तव्य आहे. ( टाळ्या )

असो. आपण राजकीय प्रश्नांचा विचार करावयास लागलो म्हणून पुष्कळसे लोक आपल्यास व्यर्थ काथ्याकूट करतात म्हणून दोष देतील. पण तिकडे आपण बिलकुल लक्ष देऊं नये. कारण इंग्लंडची प्रजा ह्या नात्यानें आपला जो योग्य हक्क असेल तो आपण संपादन करणें आणि आपल्या देशबांधवांना महाभारतांत वर्णिलेल्या हक्कांचा लाभ करून देणें हें आपलें कर्तव्यच आहे.

इतकें भाषण झाल्यावर आपलें भाषण शांत चित्तानें ऐकिल्याबद्दल सभासदांचे

तऱ्हेनें काम करीत असल्याचें नुकतेंच प्रसिद्ध करून हिंदी लोक स्थानिक स्वराज्याच्या हक्काला पूर्णपणें लायक आहेत असा अभिप्राय दिला आहे.

गेल्या विजयादशमीसच म्हैसूर संस्थानात एक प्रतिनिधी मंडळ जमलें होतें. म्हैसूर सारख्या नेटिव्ह संस्थानांतदेखील प्रतिनिधी मंडळें असूं शकतात पण आपल्या ब्रिटिश प्रजेला मात्र तो हक्क असूं नये ही विचित्र विधिघटनाच समजली पाहिजे! विलायतेंतील राष्ट्रीय सभेच्या कामाबद्दल बोलताना सुरेंद्रबाबु पुढें म्हणाले:– "कौंसिल बिलसंबंधानें प्रधानमंडळ आपल्याशीं लपंडाव खेळत आहे. सन १८९० साली ज्यावेळीं मी व रा. मुधोळकर विलायतेस गेलों होतों त्यावेळीं मि. ब्राडलॉ साहेबांच्या बिलाला मी संमती देईन असें मि. ग्लॅड्स्टन ह्यांनीं आश्वासन दिलें होतें, पण हें पार्लमेंटपुढें येऊन परत घेण्यांत आलें. आपण ठावांत असें म्हणालों आहोंत कीं कौंसिलें लोकनियुक्त तत्वाची असल्याशिवाय हिन्दुस्थानचा राज्य कारभार चांगला चालणार नाहीं; पण तो आजदेखील चांगला तर मुळींच चालत नाहीं. याचा दोष कामदाराकडे नसून हा राज्यपद्धतीचा दोष आहे. हा चालला आहे इतपत तरी कारभार चालतो याचें श्रेय वर्तमानपत्रें व स्वातंत्र्यप्रिय उदार मतवादी आंग्लबांधव ह्यांनाच आहे.

बंगाल्यांतील रेव्हरंड रामचंद्र बोस नामक एक गृहस्थ त्यांच्या ठरावास अनुमोदन देण्यास उठले व त्यांनीं आपल्या गंभीर व मधुर वाणीनें त्या ठरावाच्या समर्थनार्थ उत्कृष्ट भाषण केलें.

बोस ह्यांचें भाषण झाल्यावर तो ठराव मतासाठीं टाकला व सर्वानुमतें कायम झाला. इतक्यांत कलकत्त्याचे मि. प्रिंगल केनेडी हे तिसरा ठराव घेऊन व्यास पीठावर आले. त्या ठरावाचा सारांश असा:—"हिंदुस्थानांतील ५ पांच कोटी प्रजा दिवसेंदिवस कंगाल होत जाऊन अन्नावांचून मृत्युमुखीं पडत आहे. ह्या दुर्धर स्थितीस पुढील गोष्टी कारणीभूत आहेत. (अ) हिंदी लोकांचें राज्यकारभारांत मुळींच अंग नसणें, आणि देशाच्या जमाखर्चावर एतद्देशीयांना कांहींच दाब नसणें, (ब) लष्करी व सिव्हिल खात्याचा बेसुमार खर्च आणि (क) जो देश हे शेतकी प्रधान आहे तेथील शेतसारा वसूलीची पाशवी वृत्ति. तेव्हां ह्या गोष्टींचा बंदोबस्त करण्यास प्रथम राज्यकारभारांतील अवाढव्य खर्चाची सदरें रद्द केली पाहिजेत. बादशाही फौजेतील ब्रिटिश शिपाई अल्प मुदतींच्या ऐवजीं लांब मुदतीचे असावेत व हल्लींच्या सैन्यांतून २०,००० शिपायांना रजा द्यावी कामिसारियेट व स्टोअर खात्यांचाही खर्च कमी करावा. यांबरोबरच ३० वर्षांपूर्वी दिलेल्या कायम सारा करण्याचे वचन ब्रिटिश सरकारनें पूर्ण करावें आणि शेतकऱ्यासाठीं पेढ्या स्थापन कराव्यात; ह्या करितां राष्ट्रीय सभेची ही विनंती सरकारनें मान्य करून हजारों लोकांचे प्राण वांचवावे." वरील ठरावाच्या समर्थनपर केनेडी यांचें मनोहर भाषण झाल्यावर वऱ्हाडचे सुप्रसिद्ध वकील रा. मुधोळकर यांनीं तिसऱ्या ठरावास अनुमोदन दिलें. रा. मुधोळकर यांचें भाषण झाल्यानंतर अंबाला येथील लाला मुरलीधर यांनीं हिंदीमध्यें विनोदपूर्ण भाषण केलें. त्यांनीं विशेषतः शेतकऱ्यांच्या दारिद्र्यावस्थेचें व हिंदुस्थानच्या राज्य कारभारांतील बेबंदशाही खर्चाचें जें वर्णन केलें तें इतकें चटकदार होतें कीं त्यांच्या प्रत्येक वाक्यास सर्व श्रोतृवृंदांकडून आनंद प्रदर्शक टाळ्यांची संमति मिळत असे.

लाला मुरलीधर यांचें भाषण झाल्यावर मुंबईचे पार्शी गृहस्थ मि. दिनशा एदलजी वाच्छा हे त्या ठरावास अनुमोदन देण्यास उठले. ते आपल्या भाषणांत म्हणालेः—"आपल्या दारिद्र्यावस्थेचें मुख्य कारण जमिनीवरील सारा व

स्थिरता येईल. इतकें भाषण केल्यानंतर त्यांनीं डॉ. पोलन नामक एका गृहस्थानें ' रशिया ' रावधानें इंग्लंडास उपदेशपर केलेली कविता वाचून दाखविली व भाषण संपविलें.

मि. वाच्छा यांचें भाषण झाल्यानंतर पं. मालवीय हे तिसऱ्या ठरावास संमति देण्याकरितां उभे राहिले. त्यांच्या शांत व मनोरम भाषणानें सर्व रसिक- वृंदांचीं अंतःकरणें हलवून सोडलीं.

पंडित मालवीयांचें भाषण झाल्यानंतर (नागपूर) येथील रा. देशपांडे व रा. गोपाळराव भिडे ह्यादोघां सन्मान्य गृहस्थांचीं भाषणें झालीं. दोघांनीं मध्यप्रांतातील शेती व शेतसारा आणि जमाबंदी ह्याविषयीं फार चांगलीं भाषणें केलीं. नंतर मद्रासचे सभापति मुदलियार यांनीं शेतसाऱ्याविषयीं लहानसे भाषण करून ठरावास अनुमोदन दिलें. बंगालचे प्रसिद्ध वक्ते रेव्हरंड कालीचरण बॅनर्जी यांनीं फारच चटकदार भाषण केलें. त्यांनीं आपल्या भाषणाचा सारांश चार शब्दांत सांगितला. ते शब्द 'मरण टाळून जगावें कसें ? (From death unto life) हे होत. ते म्हणाले, "आमची जगण्याची इच्छा शेवटास नेण्याकरितां आम्ही कृपाळू सरकारची विनंती करीत आहोंत. सरकारला आम्हीं सर्वस्व अर्पण केलेंच आहे. हिंदुप्रजेची सरकारनें सेवा मान्य करून खर्च कमी करावा. खर्च कमी झाला म्हणजे शेतकरी जगण्याच्या पंथास लागेल; करितां, सरकारनें राष्ट्रीय सभेच्या मागण्या मंजूर करून हिंदु प्रजेस जीवदान द्यावें. रेव्ह० कालीचरण बॅनर्जी ह्यांचें वरीलप्रमाणें भाषण होऊन तिसरा ठराव मतास टाकतां तो सर्वानुमतें पास झाला.

नंतर पुण्याचे प्रतिनिधी ( लोकमान्य ) टिळक हे चवथ्या ठरावावर भाषण करण्यास व्यास पीठावर आले. त्यांनीं पुढील ठराव मांडला:— ' मागील राष्ट्रीय सभांनीं केलेल्या ठरावाप्रमाणें ह्या सभेचें असें मत आहे कीं देशाचें पक्कें संरक्षण होण्यास सरकारनें प्रथम हिंदुस्थानांतील लोकमतास मान देऊन हिंदुप्रजेस आत्म- रक्षण व स्वराज्यसंरक्षण करण्यास उत्तेजन द्यावें व पात्र करावें. त्यासाठीं सरकारनें

पुढील गोष्टी केल्या पाहिजेतः— ( अ ) हिंदुस्थानांतील सर्व जातीस हत्यारें वापरण्याचे कायमचे परवाने द्यावेत व मनुष्यांची, जनावरांची आणि शेतांची नासाडी करणाऱ्या हिंस्र जनावरांना मारण्याचे सढळ हातानें परवाने द्यावेत व जर कोणी हत्यारांचा दुरुपयोग करील तर त्याचा परवाना रद्द करावा. ( ब ) हिंदुस्थानांतील लोकास लष्करी शिक्षण देण्यासाठीं शाळा स्थापाव्यात व त्यांत कमिशण्ड व नॉन कमिशण्ड असे दोन वर्ग करून योग्यतेप्रमाणें शिक्षण द्यावें. ( क ) हिंदुस्थानांतील शूर जातीस मिलिशिया सर्व्हिस ( लढाईच्या वेळेपुरती फौज ) मध्ये घ्यावें. ( ड ) ग्रेटब्रिटनप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर स्वयंसेवक तयार करण्याची पद्धती सुरूं करावी.'' हा ठराव सभेपुढें मांडतांना हिंदुस्थानचे लोक शूर व इमानी आहेत; सबब, त्यांनां लष्करी शिक्षण देणें कसें अत्यावश्यक आहे हें रा. टिळकांनीं सभेच्या मनांत पूर्णपणें बिंबविलें.

लो. टिळक यांचें भाषण संपल्यानंतर मुंबईचे मुसल्मान गृहस्थ अलीमहमद भिमजी ह्यांनीं त्या ठरावास अनुमोदन दिलें; व रामचंद्र पिले, सी. व्ही. नायडू वगैरेंनीं आपली अनुकूलता प्रदर्शित केली व तो ठराव सर्वानुमतें पास झाला.

नंतर कलकत्त्याचे प्रतिनिधि पं. प्राणनाथ सरस्वती यांनीं सभेपुढें पांचव्या ठरावाची सूचना आणली:—तिचा सारांश असाः—'' हिंदुस्थानच्या लोकांचा राज्यकारभारांत शिरकाव व्हावा म्हणून सिव्हिल सर्व्हिसच्या सर्व परिक्षा विलायतेंत न होतां त्या येथेंच घेण्याची सरकारनें कृपा करावी. पंडित प्राणनाथ सरस्वती हे पहिल्या प्रतीचे वक्ते व त्यांच्याच योग्यतेचा विषय; त्यामुळें भाषण ऐकतांना सर्व सभा मंत्रमुग्ध झाली होती. त्यांनीं आपल्या भाषणांत ईस्ट इंडिया कंपनीपासून तो राणीच्या जाहीरनाम्यापर्यंत समान रीतीनें वागविण्याची दिलेलीं अभिवचनें ब्रिटिश सरकारकडून पूर्णपणें पाळलीं गेलीं नाहींत ही गोष्ट स्पष्ट करून सांगितली. त्यांच्या ठरावास मि. एस्. सुबाराव यांनीं अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें पास करण्यांत आला.

पांचवा ठराव पास झाल्यानंतर नामदार पंडित अयोध्यानाथ यांनीं आपल्या आवेशयुक्त व रसाळ वाणीनें सहावा ठराव सभेपुढें मांडला. त्यामध्यें मित्रवर्गील घर

कमी करण्याबद्दल, प्रांतीवरील कर निदान रु. १००० उत्पन्नापर्यंत न घेण्याबद्दल आणि सन १८९० चा हिंदुस्थान सरकारचा अबकारी ठराव स्थानिक सरकारांनी अवश्य अंमलांत आणण्याबद्दल, वगैरे योग्य सूचना केल्या होत्या. पंडित अयोध्यानाथ आपल्या भाषणांत म्हणाले, " मिठावरील कर लहानथोरांस सारखा असल्यामुळें त्याचें कोणावरच ओझें पडत नाहीं हें सरकारचें म्हणणें असत्य आहे. कोट्यावधि लोक अन्नावांचून दिवस कंठीत आहेत आणि त्यांतून अत्यावश्यक असें जें मीठ तें देखील महागल्यामुळें त्यांचे तर फारच हाल होत आहेत. ही गोष्ट सरकार लक्षांत घेत नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. त्याचप्रमाणें प्रांतीवरील कराची गोष्ट ! ह्यासंबंधीं तर फारच शोचनीय प्रकार घडत आहेत. जो अधिकारी आपल्या प्रांतांतून जास्त कर जमा करून देईल त्यास सरकारकडून बढती मिळते व जो कमी वसुली देईल त्याला नाकदुऱ्या काढण्याची पाळी येते ! मि. वुइल्सन ह्यांच्या कारकीर्दींत एका डेप्युटी कलेक्टरनें सरकारला याबाबतींत पुष्कळ फायदा करून दिला म्हणून त्याची बढती करण्याबद्दल शिफारस करण्यांत आली होती ! ! ( सरकारास हें लांछनास्पद आहे असे उद्गार ) शेवटीं पंडितजींनीं ठरावाचा शेवटचा भाग गरीबांच्या कल्याणाचा आहे. पण वायव्यप्रांतसरकार त्याकडे दुर्लक्ष करीत आहे असें सांगितलें. सहाव्या ठरावास उमरावतीचे प्रसिद्ध वकील रा. रा. मोरोपंत जोशी ह्यांनीं अनुमोदन दिलें आणि मुनशी शेख हुसेन बल्लद शेख चांद यांनीं उर्दू भाषेंत आपली संमति दिली व तो ठराव सर्वानुमतें पसंत झाला.

नंतर पूर्णेंदु नारायणसिंग यांनीं सातवा ठराव सभेपुढें मांडला. तो ठराव असा " न्याय खातें व मुलकी खातें वेगळीं करून त्यांचे कारभारीही वेगळे असावेत. ज्यूरींची पद्धत सर्वत्र सुरू करून सन १८७२ सालीं हायकोर्टास मिळालेला ज्यूरींचा निकाल रद्द करण्याचा अधिकार रद्द करावा. वारंटानें खटले आरोपीच्या इच्छेप्रमाणें म्याजिस्ट्रेट पुढे न चालतां एकदम ' सेशन ' जज्जापुढें चालतील असा क्रिमिनल प्रोसिजर कोडमध्यें फेरफार करावा. पोलिसांची संख्या डेप्युटी इन्स्पेक्टर जनरल, सुपरिंटेंडेंट, असि. सुपरिंटेंडेंट ह्या हुद्यांच्या जागीं नेटिवांची निवड व्हावी. " ह्या ठरावाला मि. आश्चर्यचंद दास ह्यांची संमति मिळाली. नंतर त्या ठरावावर अध्यक्षांचे भाषण होऊन ठराव पास करण्यांत आला.

बाबू सुरेंद्रनाथांच्याच तोडीचे भाषणपटु बाबू हरेंबचंद मित्र यांनीं आठवा ठराव सभेपुढें मांडला. "पूर्वीच्या राष्ट्रीयसभाप्रमाणें ह्याही सभेचें असें मत आहे कीं सरकारनें शिक्षाखात्याचा खर्च कमी करण्याचा विचार सोडून द्यावा व उलट शिक्षणखातें अधिक कार्यक्षम बनविण्याचाच प्रयत्न करावा. विशेषतः धंदे शिक्षणास उत्तेजन देऊन त्यासाठीं माहिती गोळाकरण्यास एक कमेटी नेमावी" ह्या ठरावावर हेरंबचंद्रानीं फारच सुरस भाषण केलें. त्यांच्या भाषणाचा सारांश त्यांनीं फारच शब्दांत सांगितला 'From darkness unto light' विद्येच्या प्रसाराची जरूरी व महत्व समजावून सांगतांना ते म्हणाले कीं जर इंग्रज सरकारला आपलें राज्य सुरक्षित रहावें असें वाटत असलें तर त्यांनीं प्रजेस सज्ञान करावें व त्यांनीं नियुक्त केलेल्या कायदे कौन्सिलांच्या माध्यानें आपला कारभार चालवावा तरच त्यांचा डंका यावचंद्रदिवाकरी गाजत राहील. ह्या ठरावास पुण्याचे श्री. गोपाल कृष्ण गोखले यांनीं अनुमोदन दिल्यावर ठराव पसंत झाला व सभेचें दुसऱ्या दिवशीचें काम पांच वाजतां संपलें.

## तिसरा दिवस

आज ११ वाजल्या पासूनच सभामंडप खेंचून भरला होता. ह्यूम साहेब आज शेवटचेच दिसतील ह्या विचारानें सर्व वातावरण उदास व गंभीर झाले होतें. बंगालमधील प्रसिद्ध देशभक्त राधारमण बाबू यांनी ह्यूम साहेबांचे फोटो भेट म्हणून वाटले व "राष्ट्रीय सभेच्या जनकास आशिर्वाद" म्हणून संस्कृत कवितांचें एक छापील पत्रक प्रतिनिधींना वाटण्यांत आलें व सभेच्या कामास सुरवात झाली.

प्रथमतः ह्यूम साहेबांनीं कमांडर जनरल ब्रूथ साहेबांकडून आलेली अभिनंदनपर तार वांचून दाखविली. तींत ब्रूथ साहेबांनीं, गरीब हिंदू प्रजेकरितां विशेष खटपट करावी अशी कळकळीची विनंती केली होती. त्या तारेचा ब्रूथ साहेबांना आभार प्रदर्शक संदेश तावडतोब पाठविण्यांत आला.

नंतर कलकत्त्याचे प्रसिद्ध राष्ट्रभक्त मि. डब्ल्यू. सी. बानर्जी यांनी पहिल्या दिवशीं 'राष्ट्रीय सभा बंद ठेवावी कीं काय ?' ह्याचा विचार करण्याकरितां नेम-

लेल्या कमिटीचा " राष्ट्रीय सभेची विलायतेंतील बैठक होईपर्यंत ती दरवर्षी भरवीत जावी " हा निकाल सांगितला व त्यांच्या ह्या सूचनेस पं. अयोध्यानाथ यांनीं अनुमोदन दिल्यावर हा सभेचा **पहिला** ठराव सर्वानुमतें पसंत झाला.

या महत्वाच्या कामाचा निकाल लागल्यानंतर टिनेवेलीचे मुखत्यार पिटर पाल पिल्ले, यांनीं सभेपुढें नवव्या ठरावाची सूचना आपली कीं दक्षिण हिंदुस्थानांत जंगलच्या कायद्यामुळें लोक अत्यंत त्रस्त झाले आहेत करितां ही सभा सरकारला अशी विनंती करते कीं त्यांनीं ह्याकडे लक्ष पुरवून लोकांचा त्रास कमी होईल अशी व्यवस्था करावी. ( ही सूचना येण्यापूर्वी अध्यक्षांनीं असें सांगितलें कीं जंगलचा कायदा आम्हाला मान्य आहे परंतु त्याची अंमल बजावणी संबंधींचीच आमची तकार आहे असें कोणी समजूं नये ) हा ठराव मांडतांना पिटर पाल पिल्ले म्हणाले कीं " ह्या जुलुमी कायद्यामुळें गुरांना चारा मिळत नाहीं; शेतकरी वेळोवेळीं नाडले जातात व गरीबांचे हाल किती होतात याची तर मोजदादच नाहीं. त्यांच्यानंतर साताऱ्याचे रा. सा. रघुनाथराव करंदीकर हे अनुमोदन देण्यास उठले, त्यांनीं भाषण करण्यापूर्वी प्रजेवर कसकसे अनर्थ गुदरत आहेत हे प्रत्यक्ष दाखविण्यासाठीं घरादारास मुकलेल्या ९ नऊ शेतकऱ्यांची हुबेहुब तसबीर सभेपुढें सादर केली. रावसाहेबांनीं जंगलच्या कायद्यासंबंधींचे सर थिओडोर होप यांचे उद्गार सभेस सादर केले. सर साहेबांचें म्हणणें कीं " जंगलचा कायदा मुख्यत: शेतीवांचून राहिलेल्या जमीनीचें रक्षण करण्यासाठीं अवश्यक आहे. परंतु आजची त्याची अमलबजावणी लक्षांत घेतां परमावधीचें दु:ख होतें. सालेम जिल्ह्यांत जळाऊ लांकडांवरचा कर म्हणजे प्रत्यक्ष अन्नावर कर बसविल्यासारखेंच आहे. सरकारनें ह्या सर्व गोष्टींकडे लक्ष पुरवून आपल्या वचनाप्रमाणें प्रजेस संतुष्ट करावें अशी कळकळीची विनंती करून रावसाहेबांनीं आपलें भाषण आटोपलें.

रावसाहेब करंदीकरांचें भाषण झाल्यावर बंगालचे मि. के. बी. मलिक यांनीं ठरावांत कांहीं फेरफार सुचविले होते, पण ते अनावश्यक वाटल्यामुळें त्यांनीं आपली सूचना परत घेतली.

नंतर ठरावावर भाषण करण्यास मद्रासचे प्रतिनिधी मि. वीर राघव चारियर

हे उठले. आपल्या भाषणांत ते म्हणाले, "सन १८७९ साली हा कायदा सुरू करण्याचे वेळीं सरकारनें असें स्पष्ट सांगितलें होतें कीं जंगला-पासून देशाचें कल्याण व्हावें एवढाच ह्या कायद्याचा उद्देश आहे ह्यांत तिजोरी भरण्याचा आमचा मुळींच मानस नाहीं ! परंतु हें अभिवचन जागच्याजागीच राहून सरकारनें आपली तिजोरी भरण्याचाच सपाट्या चालविला आहे. जंगलचें उत्पन्न मद्रास इलाख्यांत कसें वाढत गेलें हें राघव चारियरनीं आंकडे देऊन सिद्धकरून दाखविलें. " १८७८ साली जें उत्पन्न ६॥। लक्ष रुपये होतें तें १८८८ साली १३ लक्षांवर गेलें आहे येवढेंच लक्षांत घेतल्यास आपली पूर्ण खात्री होईल." इतकें बोलून रावसाहेब स्थानापन्न झाले. त्यांच्यानंतर बेळगांवचे मि. माटे वकील व नासिकचे रा. लिंबकर यांचीं भाषणें झाल्यावर तो ठराव सर्वानुमतें पसंत झाला.

यानंतर पुण्याचे वकील रा. सा. काशीनाथपंत नातू ह्यांनीं दहावा ठराव मांडला. तो ठराव असा " गेल्यावर्षी विलायतेंतील कांग्रेस कमेटीनें व सर वुल्यम्-वेडरबर्न यांनीं हिंदुस्थानास जी मदत केली तिजबद्दल ही सभा अत्यंत ऋणी आहे व त्यांनीं अशीच मदत यापुढेंही उदारपणें करावी अशी त्यांना कळ-कळीची विनंती आहे. ह्याला रा. जोगेंद्र चौधरी ह्यांनीं अनुमोदन दिल्यावर ठराव पास झाला.

नंतर मुंबईचे ब्यारिस्टर फेरोज शहा मेथा हे मि. ब्राडलॉ संबंधी दुखवट्या चा ठराव मांडण्यास व्यासपीठावर आले. ' महात्मा ब्राडला साहेबांच्याबद्दल आम्हाला अत्यंत आदर आहे व त्यांच्या अकालीन मृत्युमुळें आमचें फार नुक-सान झालें आहे व आपल्यावर ओढवलेल्या ह्या आपत्तींत ही राष्ट्रीय सभा समभागी आहे ' अशा अर्थाचें एक पत्र मिसेस ब्राडला बोनर यांनां पाठवावें ह्या आशयाचा तो ठराव होता. ह्या ठरावास मं. काव्य विशारद व मुनशी बदरुद्दीन यांनीं अनुमोदन दिल्यावर ठराव कायम करण्यांत आला.

डब्ल्यू. सी. बानर्जी हे बाराव्या ठरावावर भाषण करण्यास उठले ' दादाभाई नवरोजीसारख्या राष्ट्रकार्यधुरंधराची जर सेंट्रल फिन्सबरीतर्फे पार्लमेंटमध्यें निवडणूक झाली तर ही सभा तेथील लोकांची अत्यंत ऋणी होईल ' असा तो ठराव होता. तो सर्वांनीं पसंत केला.

नंतर नागपूरचे सी. नारायणस्वामी नायडू यांनीं, इंग्लंडांत पुढील वर्षी निवडणुकीची धामधूम असल्यामुळें सन १८९० सालीं कलकत्याच्या सभेंत ठरल्याप्रमाणें १०० प्रतिनिधींची राष्ट्रीय सभा तेथें इलेक्शन संपेपर्यंत भरवूं नये, अशा आशयाचा तेरावा ठराव सभेपुढें मांडला. त्यास पार्थसारथी नायडू ह्यांनीं अनुमोदन दिल्यावर तो ठराव कायम झाला. नंतर कलकत्याचे मि. जे. घोसल यांनीं "इंग्लंड मधील राष्ट्रीय सभेचे कामास ४०,००० रुपये व तेथील कचेरी करितां ६००० रु. मंजूर करावेत असा चौदावा ठराव मांडला. त्याला वीर राघव चारियर यांनीं अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें पास करण्यांत आला.

नंतर डब्ल्यू. सी. बॅनर्जी ह्यांनीं मि. ह्यूम साहेब व पं. अयोध्यानाथ यांची पुढील वर्षाकरितां राष्ट्रीय सभेचे अनुक्रमें जनरल सेक्रेटरी व जाइन्ट सेक्रेटरीचें जागीं नेमणूक व्हावी अशी सूचना मांडली. मि. ह्यूमसाहेब हे जरी हिंदुस्थानचा निरोप घेऊन स्वदेशी परत जाणार होते तरी त्यांनां लोकांच्या कळकळीच्या विनंतीचा अव्हेर करणें अशक्य झालें व त्यांनी सद्गदित कंठानें सर्वांचे आभार मानून राष्ट्रीय सभेची आज्ञा म्हणून आपण तें काम मोठ्या खुषीनें करूं असें आश्वासन दिलें. व मला हिंदुस्थानांत येणें जरी शक्य झालें नाहीं तरी इंग्लंड येथें राहून मी शक्य ती राष्ट्रीय सभेची सेवा करीन व पुढील वर्षाची सभा इतकी धडाक्यानें करा कीं "राष्ट्रीय सभा म्हणजे ह्यूम" हा लोकांचा झालेला गैरसमज दूर होईल. असें छोटेंसें भाषण करून ते आपल्या जागीं बसले. ह्यूम साहेबांचें भाषण झाल्यानंतर पं. अयोध्यानाथ ह्यांनीं पुढील वर्षाच्या सभेसाठीं अलाहाबाद येथें येण्याचें प्रतिनिधींना आमंत्रण दिलें. नंतर डब्ल्यू सी. बॅनर्जी यांनी सातव्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष राय बहादूर पी. आनंदाचार्लू ह्यांचें सर्वांच्यावतीनें आभार मानले. नंतर अध्यक्षांनींही सभेचें काम शांतपणें पार पाडण्यास मदत केल्याबद्दल सर्वांचे आभार मानून सभेचें काम संपलें असें जाहीर केलें.

नंतर सर्व सभाजन उभे राहून त्यांनीं महाराणी व्हिक्टोरिया यांचे पवित्र नांवाचा त्रिवार जयजयकार केला व अधिवेशन विसर्जन पावलें.

---

# प्रकरण पांचवें.



## (१८९१ ते १८९९).

१८९१ च्या कॉंग्रेसनंतर या प्रांतांत एक नवचैतन्याचा काळ सुरू झाला. ऐतिहासिक महत्वांत भर पडावी असा नागपूरचा जणूं योगायोग असावा असें दिसतें. १८९१, व १९२० या नागपुरास झालेल्या कॉंग्रेसबैठकी युगप्रवर्तक तर ठरल्याच पण १९०७ ची संकल्पित कॉंग्रेससुद्धां परिणामाच्या दृष्टीनें युगप्रवर्तकच झाली हें पुढील हकीगतीवरून दिसून येईलच. १८९१ च्या नागपूरच्या बैठकींत "ब्रिटिश इंडिया कॉंग्रेसचें विलायतेंत अधिवेशन होईपावेतों कॉंग्रेस अधिवेशन पुढें तहकूब ठेवावें की काय?" या महत्वाच्या प्रश्नाचा खल झाला आणि कॉंग्रेस चालू रहावी असें ठरलें. तसें न ठरतें तर तात्पुरती कां होईना कॉंग्रेसची इतिश्री होऊं शकली असती. या दृष्टीनें १८९१ मध्यें कॉंग्रेसवरील एक गंडांतर टळलें असेंच म्हणावें लागेल आणि म्हणूनच नागपूरची ती बैठक युगप्रवर्तक म्हणायची. आज जसा कॉंग्रेसवर आरोप करण्यांत येतो तसा त्याकाळींही 'कॉंग्रेस हें फक्त ह्यूम साहेबाचें सोंग आहे; असें पुष्कळ लोक म्हणत आणि या आरोपाला उत्तर द्यावें म्हणून त्याकाळीं विलायतेंत कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्याचा विचार जोरानें चालू होता. बाबू सुरेंद्रनाथांच्या अत्यंत प्रभावशाली भाषणानें कॉंग्रेसवरील गंडांतर टळण्यास पुष्कळच मदत केली.

विश्वास असल्यामुळें त्यांनीं सरकारशी संबंध असणाऱ्यांनी कॉंग्रेसमध्यें भाग घेतल्यास हरकत घेतली नाहीं. सर बिपिनबाबू आणि श्री. केशवराव जोशी हे कॉंग्रेसमध्यें भाग घेत यावरून हें स्पष्ट होईल.

या प्रांतांत १८९० ते ९९ पावेतों जी जागृती झाली ती सर्वांगीण होती. त्याकाळीं विधायक कार्याकडे लोकांचा विशेष कल होता आणि तें फार स्वाभाविक होतें. यापैकीं औद्योगिक कार्यक्रमावर विशेषच जोर देण्यांत आला. १८९१ची कॉंग्रेस होण्यापूर्वीच श्री. कृष्णराव फाटकांच्या खटपटीनें पुलगांव मिल व त्याहीपूर्वी रा. सा. केशवराव भवाळकर यांच्या खटपटीनें हिंगणघाटास गिरणी सुरू झाली होती. हात मागावर सुधारणा करून कोष्ट्याच्या धंद्याला उत्तेजन देण्याकरितां व स्थानिक लोहारांच्या धंद्यात सुधारणा करून चाकूकाऱ्यांचा धंदा वाढविण्याकरितां एक स्वदेशी वस्तु प्रचारिणी सभा स्थापन करण्यांत आली होती. खुद्द १८९१ ची कॉंग्रेस बैठक चालू असतां नागपूरच्या स्वदेशी मिलची मुहूर्तमेढ रोवण्यांत आली.

औद्योगिक सुधारणेबरोबरच सामाजिक चळवळीलाही जोर येऊं लागला नंदन मिश्र समाज व सनातन धर्म सभा या संस्था स्थापन होऊन त्या अनुक्रमें सुधारक व सनातनी मताचा प्रचार करूं लागल्या. त्याबरोबरच शेतकऱ्यांची चळवळही सुरू झाली. त्या काळीं एका मागून एक दुष्काळाचीं वर्षे झाल्यामुळें विधायक कार्यक्रमात शेतकऱ्यांच्या परिस्थितीबद्दलचा विचार होणें फार स्वाभाविक होतें. याकरितां ठिकठिकाणीं मालगुजारी सभा स्थापन होऊन त्या शेतकऱ्याच्या वतीनें काम करूं लागल्या. १८९७ आणि १८९९–१९०० सालचे दुष्काळ लोकांना फारच जाणवले आणि शेतकऱ्यांच्या चळवळीला विशेष जोर व महत्व प्राप्त झालें. या चळवळीचा परिणाम होऊन शेतकऱ्यांना कांहीं सवलती मिळाल्या आणि सरकारनें ठिकठिकाणीं दुष्काळ निवारणाची कामें सुरू केलीं.

स्वदेशीचा मंत्र प्रथम पुण्याचे श्री. गणेश वासुदेव जोशी उर्फ सार्वजनिक काका यांनी आचरणात व प्रचारांत आणला. त्यांचे एक शिष्य श्री. त्र्यंबकराव त्रवे यांनीं नागपूरच्या लोकसभेतर्फे स्वदेशी प्रचाराचें काम सुरू केलें होतें. त्यांनीं व श्री. कृष्णराव फाटकांनीं स्वदेशी प्रचाराचें काम विशेष उत्साहानें केलें.

१८९२ साली अलाहाबादच्या कॉंग्रेस बैठकींत महाव्या ठरावांत पब्लिक सर्व्हि-सेस कमिशनच्या रिपोर्टाचा निषेध करण्यांत आला. त्यावर आपल्या प्रांतातर्फे श्री. केशवराव जोशी यांनी भाषण केलें. या सुमारास बंगालच्या कायम जमाबंदींत आणि मद्रासच्या जमीनदारांच्या बाबतींत सरकारनें ढवळाढवळ करण्यास सुरुवात केली होती, त्याचा १८९३ च्या लाहोर कॉंग्रेसनें दहाव्या ठरावांत निषेध केला. त्या ठरावावरही श्री. केशवराव जोशी यांनी भाषण केलें होतें. या भाषणांत त्यांनी मध्यप्रांतांतील शेतकऱ्यांच्या हलाखीच्या स्थितीचें यथार्थ वर्णन करून ते मोहाच्या फुलांवर कशी उपजीविका करीत हें सांगितलें. १८९२ मध्यें एक इंडिआ कौंसिल आक्ट पास झाला होता. त्यांत सुधारणा मागणारा एक ठरावही या कॉंग्रेसमध्यें पास झाला. यावेळपावेतों इंडिया कौंसिलमध्यें या प्रांताचा एकही प्रतिनिधी नसे. ता. १९।४।९३ रोजी नागपूरला रा. ब. नारायण स्वामी नायडू यांचे अध्यक्षतेखालीं एक सभा भरून प्रतिनिधीची मागणी करणारा एक ठराव पास करण्यांत आला, आणि लवकरच ही मागणी मान्य होऊन आपल्या प्रांतातर्फे सर गंगाधरराव चिटणवीस हे आपले पहिले प्रतिनिधी म्हणून व्हाइसरायच्या कौंसिलांत गेले.

१८९४ च्या मद्रास कॉंग्रेसमध्यें हिंदुस्थानांतील व्हाइसराय आणि विलायतें-तील स्टेट सेक्रेटरी यांची भेट घेऊन त्यांना आपल्या अडचणी कळविण्याचें ठरलें. याकरितां जें शिष्ट मंडळ नेमण्यांत आलें त्यांत आपल्या प्रांतातर्फे सर गंगाधरराव आणि श्री. सी. व्ही. नायडू यांना निवडण्यांत आलें होतें. १८९५ साली पुण्याच्या कॉंग्रेसमध्यें लीगल प्रॅक्टीशनर्स आक्ट संबंधी एक ठराव आला "टाउट्स" वर नियंत्रण करण्याकरितां जे नियम केले त्यांत वकीलाची सनद रद्द करण्याचा अधिकारही डिस्ट्रिक्ट जज्जाला देण्यांत आला. या विरुद्ध हा ठराव होता. या ठरावावर आपल्या प्रांतातर्फे लाला भगीरथ प्रसाद यांनी भाषण केलें. या कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनी स्वतःप्रमाणें छापील भाषण न वाचतां दोन दिवस ( अडीच तास असखलित भाषण केलें त्यांत त्यांनी कॉंग्रेसच्या व्यास पीठावर जातिभेद व पक्षभेद विसरून एकत्र होण्याचें महत्व पटवून सांगितलें.)

१८९६ साली कॉंग्रेस कलकत्त्याला भरली. त्या कॉंग्रेसला ३१ डेलीगेटस् गेले होते. त्यानंतर १८९७ सालची कॉंग्रेस उमरावतीस भरली. त्यावर्षीचा दुष्काळ

कल्पनातीत झाला. दुष्काळासंबंधीं जो ठराव झाला त्यावर आपल्या प्रांतातर्फे श्री. अच्युत सीताराम साठे बोलले. ते त्यावेळीं प्रोफेसर होते. त्यापूर्वी थोडेच दिवस रँड आणि आयर्स्ट साहेबांचे खून झाल्यामुळें वातावरण क्षुब्ध झालें होतें व काँग्रेसचें अधिवेशन होतें कीं नाहीं अशी काळजी वाटली. तसें झालें नाहीं तरी प्रतिनिधींच्या संख्येवर त्याचा अनिष्ट परिणाम झालाच. या काँग्रेसमध्ये लो. टिळकांना झालेल्या शिक्षेबद्दल सहानुभूति व्यक्त करण्यांत आली आणि एका अर्थानें भावी जहाल पक्षाचा अंकूर या कॉंग्रेसमध्येच फुटला असें म्हणण्यास हरकत नाहीं असें डॉ. बिझंट बाईचें मत आहे.

१८९८ मध्यें मद्रासला काँग्रेस झाली तेव्हां देशांतील वातावरण फारच गंभीर होतें. क्रांतिकारक चळवळ आणि सरकारचें दडपशाहीचें धोरण दोन्ही जोरांत होतीं. आयर्लंडचे जसे पार्लमेंटात प्रतिनिधी होते तसे हिंदुस्थानलाही असावेत असा ध्वनी अध्यक्ष श्री. आनंदमोहन बोस यांनी काढला पण तो फार वाढला नाहीं. महात्मा गांधींच्या आफ्रिकेंतील कामगिरीचा या कॉंग्रेसमध्यें प्रथम गौरवपूर्वक उल्लेख करण्यांत आला.

१८९९ ची लखनौ कॉंग्रेस एका दृष्टीनें महत्वाची झाली; कारण त्या बैठकीत कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. रमेशचंद्र दत्त यांनी घटनेंत दुरुस्ती करणारा ठराव मांडला. या ठरावान्वयें इंडियन काँग्रेस कमिटीवर ( आजची ऑ. इं. कॉ. क. ) प्रांतांना प्रमाणशीर प्रतिनिधी देण्यांत आले. त्यांत वऱ्हाड व मध्यप्रांताला प्रत्येकी तीन प्रतिनिधी देण्यांत आले. आपल्या प्रांतातर्फे श्री. बापूरावदादा, लाला भगीरथप्रसाद आणि वर्ध्याचे श्री. एच्. व्ही. केळकर यांना निवडण्यांत आलें होते.

---

# प्रकरण सहावें.



## १९०० ते १९०६

१८९९ च्या नव्या घटनेनुसार १९०० च्या श्री. ना. रा. चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या लाहोर काँग्रेसला मध्यप्रांत सिकंदराबादतर्फे तीन प्रतिनिधी गेले होते. पांचव्या ठरावाप्रमाणे इंडिया कॉं. क. वर जे प्रतिनिधी निवडण्यांत आले त्यात आपल्या प्रांतातर्फे श्री. बापुरावदादा, श्री. कृष्णराव फाटक आणि श्री. रावजी गोविंद यांना नेमण्यांत आले. शिक्षण कमिटिवर श्री. श्रीधर बळवंत गोखले व औद्योगिक कमिटिवर श्री. रावजी गोविंद यांना नेमलें.

या सुमारास देशांतील राष्ट्रीय विचाराच्या लोकांत प्रगतीच्या दृष्टीनें विचारक्रांति सुरू झाली. एकीकडे सरकारला काँग्रेसचें वाढतें महत्व त्रासदायक वाटूं लागलें तर दुसरीकडे काँग्रेसचाही सरकारला दिलेली वस्तू पाळण्याबद्दलच्या वृत्तीबद्दलचा संशय दृगाव्यानें वाढूं लागला. यांत त्यावेळचे अधिकारप्रिय अरेराव व्हायसराय लॉर्ड कर्झन यांना बऱ्याच प्रमाणांत जबाबदार मानण्यास हरकत नाहीं. विश्वविद्यालयें आणि शिक्षणखातें यांवर सरकारचा विशेष अधिकार असावा असें वाटून सरकारने या धोरणानें आपली कारवाई सुरू केली आणि परिणामी १९०४ चा विश्वविद्यालयाचा ॲक्ट पास झाला. लॉर्ड कर्झन यांनी एकेप्रसंगीं कलकत्ता विश्वविद्यालयाचे कुलपती या नात्यानें भाषण करतांना हिंदी संस्कृतीवर फारच कडक हल्ला केला व हिंदी जनतेची मनें फारच दुखावलीं। यालाच जोडून त्यांनी बंगालची फाळणीही केली आणि आसाम व पूर्वबंगाल मिळून होणाऱ्या प्रांतांत मुसलमानांना विशेष हक्क मिळण्याचा संभव राहील असा आभास उत्पन्न करून बंगालच्या फाळणीद्वारा बंगाली जनतेच्या राष्ट्रीयत्वावर व कलकत्त्याच्या राष्ट्रीय महत्वावर आघात करण्याचा प्रयत्न केला या परिस्थितीची प्रतिक्रिया म्हणून होणारा परिणाम १९०० ते १९०५ पावेतों झालेल्या काँग्रेसच्या ठरावांत पहावयास सांपडतो.

१९०१ च्या कलकत्ता कॉंग्रेसमध्यें पांचव्या ठरावांत न्यायखातें व अधिकार-खातें यांना विलग करावें अशी मागणी करण्यांत आली. त्याला आपल्या प्रांतातर्फे डॉ. गौर यांनीं दुजोरा दिला. तिसऱ्या ठरावांत देशाच्या दारिद्र्यावर इलाज सुचविण्यांत येऊन, अकराव्या ठरावात शेतकऱ्यांच्या दैन्यावस्थेचें वर्णन करण्यांत आले होतें. दक्षिण आफ्रिकेंतील एक लाख हिंदी बांधवातर्फेचा एक अर्जदार या नात्यानें म. गांधी कलकत्त्यास कॉंग्रेसला प्रथम हजर राहिले व द. आफ्रिकेंतील हिंदी बांधवाबद्दल सहानुभूति दर्शविणारा सहावा ठराव त्यांनी मांडला. याच सुमारास कॉंग्रेसचें देशांतील उद्योग धंद्याकडे लक्ष वेधलें जाऊन कलकत्यास कॉंग्रेसला जोडून असें पहिलें प्रदर्शन झालें. १९०२ मध्यें अमदाबादला कांग्रेस झाली. या कांग्रेसमध्यें आपल्या प्रांतांतील श्री. म. कृ. पाध्ये पोलीस कमिशन वरील हिंदी प्रतिनिधी अपुरे असल्याबद्दलच्या ठरावावर बोलले. या कांग्रेसमध्येंही औद्योगिक प्रदर्शन झालें व त्याचा उद्घाटन समारंभ खुद्द श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या हस्तें करण्यांत आला.

या काळीं आपल्या प्रांताच्या दृष्टीने महत्वाची व अभिमानाची घटना म्हणजे लो. टिळक नागपूरला प्रथम येऊन श्री. म. कृ. पाध्ये यांच्याकडे राहिले. त्यावेळीं राजाराम थिएटरात गुरुवर्य केशवरावजी ताम्हन यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन लोकमान्यांनी त्याना अभिप्रेत असलेला गीतेचा कर्म-योगपर अर्थ येथें प्रथम सांगितला. या त्यांच्या आगमनापासून लोकमान्य आपल्या प्रांतास राष्ट्रगुरु वाटूं लागले व योगायोग असा कीं त्या राष्ट्रगुरुनें, ज्ञानी मनुष्यानें ज्ञानोत्तरही लोककल्याणाकरिता अहंता व फलाशारहित निष्कामकर्म कसें करीत रहावें या राष्ट्रधर्माची शिकवण त्याच व्याख्यानाचे वेळीं त्यांनीं प्रथम येथें दिली.

लोकजागृतीचें महत्व लोकांना पटून विशेषेंकरुन विलायतेंतील कांग्रेस कमिटी आणि इंडिया पत्र चालविण्याची गरज सर्वांना इतकी वाटे कीं, १९०२ च्या कांग्रेसच्या विसाव्या ठरावान्वये विलायती प्रचाराला मदत करण्याची जबाबदारी प्रांतांना वांटून देण्यांत आली होती. वऱ्हाडमध्यप्रांत मिळून इंडिया पत्राचे साडेचारशें अंक घेण्याचे व अंकामागें ८ रुपये वार्षिक वर्गणी मिळवून धाडण्याची

जबाबदारी श्री. रा. ब. मुधोळकर यांचेवर टाकण्यांत आली होती. दोन हप्त्यांत पैसे आगाऊ भरावे असा करार होता. विलायतेंत इतका प्रचार होऊनच लोक संतुष्ट नव्हते तर या सुमारास इंग्लंडांत होणाऱ्या भावी पार्लमेंटच्या निवडणुकींत महर्षि दादाभाई नौरोजी आणि श्री. व्योमेशचंद्र बानर्जी यांना तेथील मंडळींनी पार्लमेंटांत आपल्यातर्फे निवडून द्यावें अशी शिफारस १९०२ च्या मद्रास काँग्रेसमध्यें एक ठराव पास करून करण्यांत आली. या काँग्रेसमधील प्रदर्शन म्हैसूरच्या महाराजांनीं उघडलें होते.

१९०४ च्या मुंबई काँग्रेसमध्यें सरकारच्या शिक्षणविषयक धोरणावर टीका करणारा जो दुसरा ठराव करण्यांत आला, त्यावर डॉ. गौर यांनीं भाषण केलें. सातव्या ठरावांत स्टेट सेक्रेटरीच्या कचेरीचा १४ लाख रु. खर्च हिंदुस्थानवर लादण्यांत येऊं नये; कॉलोनीच्या सेक्रेटरीच्या आफिसाबाबत त्यांना जसा खर्च सोसावा लागत नाहीं तशी सूट हिंदुस्थानलाही असावी असें त्यांत म्हटलें होतें. त्यावर आपल्या प्रांतातर्फे श्री. म. कृ. पाध्ये बोलले. या काँग्रेसमध्यें प्रथम राष्ट्रगीत म्हणण्यांत आलें. याच काँग्रेसला बॅ. मोरोपंत अभ्यंकर व बॅ. गोविंद राव देशमुख हे कॉलेज विद्यार्थी असतांना प्रथम गेले. पोलिस रिफॉर्मसंबंधी या काँग्रेसमध्यें एक ठराव ( ११ वा ) मांडण्यांत आला त्यावर श्री. वासुदेवराव जोशी आपल्या प्रांतातर्फे बोलले.

कडकच झालें. हें संबंध वर्ष अत्यंत दडपशाहीचें गेलें. सर्व लोक हवालदिल होते आणि खुद्द गोखल्यांनी लोककल्याणाचें काम करीत असतांना सरकारशीं सहकार्य करण्याची आशा आतां खुंटली असें अध्यक्षीय भाषणांत त्यांनी सांगितलें. या सर्व परिस्थितीमुळें बनारस कॉंग्रेसपासून जहाल विचारसरणीला विशेष जोर मिळाला व राष्ट्रीय विचाराच्या पक्षांत जहाल व मवाळ असे दोन तट पडण्याचा रंग दिसूं लागला. आणि भावी जहालांना थोपवितांना मवाळ पुढाऱ्यांना महाप्रयास पडले. बनारसच्या कॉंग्रेसमध्येंच पांचव्या ठरावांत आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या कठीण परिस्थितीचें वर्णन केलें होतें त्यावर डॉ मुंजे यांनीं भाषण करून हिंदी लोकांना राज्यकर्ते देशांत कसें दडपतात व बाहेर तुच्छतेनें कसें वागविण्यांत येतें याचें वर्णन केलें.

या परिस्थितीचा परिणाम म्हणूनच कीं काय बंगालांत स्वदेशी आणि बहिष्काराच्या चळवळीनें फारच जोर धरला. बारीसालच्या श्री. अश्विनीकुमार यांच्या प्रभावामुळें विलायती कापडाच्या बहिष्काराची चळवळ इतकी यशस्वी झाली कीं कलकत्त्यांतील विद्यार्थ्यांनीं पिकेटींग सुरू केलें व दुर्गापूजेच्या मुहूर्तानें मँचेस्टरला लाखों रुपयांच्या कापडाची आर्डर जायची ती एक पैचीही गेली नाहीं.

आपल्या प्रांतांतही या जागृतीचा प्रतिध्वनि उमटल्यावांचून राहिला नाहीं. बंगालप्रमाणें नागपूरलाही स्वदेशी व बहिष्कारचें वारें प्रथम विद्यार्थ्यांत शिरलें. निरनिराळ्या सभा, मंडळें व क्लब स्थापन झाले. कै.भाऊसाहेब दुराणी, श्री. भवानी शंकर नियोगी, श्री. जयकृष्णपंत उपाध्ये यांचा श्रीसमर्थ शिवराय समाज, आष्टीकडील अगस्ती वगैरे विद्यार्थ्यांचा ज्ञानाभिलाषी समाज, आर्वीकडील श्री. रामभाऊ श्रोती, भंडाऱ्याचे बापट वकील, पांढरीपांडे, पंढरपूरकर वगैरे विद्यार्थ्यांचे सन्मार्ग प्रवर्तक मंडळ व बर्डीवर श्री. विश्वनाथ श्रीपत पटवर्धन शंकरराव जोशी यांनीं काढलेलें स्वदेशभक्त मंडळ हीं मुख्य असत. अमेरिकेंत असलेले निर्वासित देशभक्त श्री. पांडुरंगपंत खानखोजे हे त्यावेळीं विद्यार्थी दशेंतच होते. पण त्यांनीं विद्यार्थ्यांत नवचैतन्य उत्पन्न केल्यामुळें त्यावेळींही त्यांना इतर विद्यार्थी गुरुजी म्हणत असत. त्यांच्या प्रयत्नानें आर्यवीथिका

नांवाचे एक स्वदेशी मालाचे दुकान केळीबागेजवळ काढण्यांत आलें होतें व विद्यार्थ्यांकडून स्वदेशीच्या शपथपत्रिका घेतल्या जात. त्याचवेळीच श्री गणपती व श्रीशिवाजी उत्सव नागपूरला सुरू झाले. वऱ्हा चौतीस मंडळाचे संमेलन एकदां श्री. भवानी शंकर नियोगी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. १९०३-४ मध्यें वऱ्हाड मध्यप्रांताला जोडला गेल्यामुळें वऱ्हाड व मध्यप्रांताचे हितसंबंध अधिक निगडित झाले व दोन्ही भागांतील पुढाऱ्यांचे दळणवळण अधिक झाले व असें ठरलें कीं राजकीय बाबींचा विचार करण्याकरितां एक मध्यव... संस्था निर्माण करावी व त्याप्रमाणें १९०५ मध्यें नागपूर येथें श्री. दादासाहेब खापर्डे ह्यांचे अध्यक्षत्वाखालीं पहिली मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांतिक राजकीय परिषद झाली. ह्या परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. गंगाधरराव चिटणीस होते व हें अधिवेशन नागपूरचे टाऊनहॉलमध्यें मोठ्या थाटानें पार पडलें.

सारांश त्यावेळीं विद्यार्थी व इतर जनतेंत राजकीय चैतन्य सर्वत्र सुरू झालें होतें.

नागपूरचे राजकीय इतिहासांत भर पडण्याकरितां कीं काय, कौण जाणे त्यावर्षी बी. के. बोस वगैरे मंडळींच्या खास निमंत्रणावरून नामदार गोखले कलकत्त्यावरून येथें उतरले. पुढारी मंडळीच्या भेटींत व चर्चेत संन्याशी लोकांप्रमाणें केवळ देशासाठीच झटणाऱ्या निस्वार्थी, शिस्तवान व विद्वान लोकांची एक संस्था निर्माण करण्याचा स्वतःचा हेतु असल्याबद्दल नामदार गोखल्यांनीं सांगितलें व चर्चेनंतर तो विचार निश्चित होऊन पुढें लवकरच सर्व्हंटस् ऑफ इंडिया ही संस्था नामदार गोखल्यांनीं स्थापन केली ही गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे.

---

# प्रकरण सातवें

## स्वराज्याची घोषणा
### ( १९०६–१९०७ )

१९०६ सालीं लोकमान्य टिळकांना कलकत्ता कांग्रेसचें अध्यक्ष करावें असा पालबाबूंचा, व लाला लजपतराय यांना तें स्थान द्यावें असा श्री. खापर्ड्यांचा विचार व प्रचार चालू होता. पण मवाळांना या दोन्हीही गोष्टी परकरणं अशक्य होतें. १९०५ सालीं बनारसला मवाळांना जहाल विचारसरणीचा सुगावा लागल्यामुळे त्यांना जहालांपासून कांग्रेसचा बचाव करावयाचा होता म्हणून नामदार मेथाप्रभृती मवाळांचा महर्षि दादाभाईंवर विश्वास असल्यामुळें व त्यांच्या अध्यक्षपदाला टिळक, लजपतराय किंवा कोणीही विरोध करणें शक्य नव्हतें म्हणून महर्षिदादाभाईंचें नांव मवाळांकडूनच सुचविण्यांत आलें. पण इंग्लंडांतील वातावरणाचा दादाभाईंवर इष्ट परिणाम झाल्याचा पुरावा त्यावेळीं लो. टिळकांजवळ उपलब्ध होता. आम्स्टर्डाम ( हॉलंड ) येथें १९०५ सालीं भरलेल्या सोशालीस्ट परिषदेंत, "मला शक्य असतें तर मी इंग्रजांविरुद्ध बंड केलें असतें" असे स्पष्टोद्गार दादाभाईंनीं काढले असून त्यासंबंधीं लो. टिळकांनीं स्वतः केसरींत एक अग्रलेखही लिहिला होता. यामुळें लो. टिळकांनीं स्वतःच्या अनुयायांस दादाभाईंना पाठिंबा देण्याचा सल्ला दिला. लोकमान्यांचा अंदाज मुळींच चुकला नाहीं हें १९०६ च्या काँग्रेसच्या हकीकतीवरून कोणाच्याही लक्षांत येईल.

वरील कांग्रेसला आपल्या प्रांतांतून ९० प्रतिनिधी गेले होते त्यापैकीं श्री. गोपाळराव ओगले प्रथमच कांग्रेसला गेले. त्यावेळच्या ठरावांपैकीं दहावा ठराव शिक्षणासंबंधीं होता त्यावर आमच्या प्रांतातर्फे श्री. म. कृ. पाध्ये बोलले. एकंदर प्रतिनिधी सुमारें दोन हजार असून दररोज प्रेक्षक सुमारें दहा हजारापावेतों जमत. या काँग्रेसमध्यें स्वदेशी, बहिष्कार, स्वराज्य व राष्ट्रीय शिक्षण ही चतुःसूत्री मान्य करण्यांत येऊन दादाभाईंचें त्यावेळचें भाषण हें काँग्रेसच्या अध्यक्षानें केलेलें पहिलें सडेतोड भाषण मानण्यास हरकत नाहीं, तसें म्हटलें तर दादाभाई मवाळांना जवळचे वाटत म्हणूनच दादाभाईंच्या अध्यक्ष

सभासदांची ही सभा अनधिकृत रीतीनें बोलाविण्यांत आली होती आणि ती तशी कां बोलविण्यांत आली यासंबंधी खुलासा करण्याविषयीं राष्ट्रीयपक्षाच्या डॉक्टर मुंजे वगैरे मंडळींनी आग्रह धरला. मलमलतीच मंडळी समोर येऊन खुलासा देण्याची खटपट करूं लागली. परंतु कै. सर गंगाधरराव चिटनवीस यांनी सभा बोलाविली असल्यामुळें त्याचा खुलासा सर्वांना पाहिजे होता आणि सभा गैरकायदेशीर रीतीनें बोलाविण्यांत आली आहे अशी त्यांची खात्री असल्यामुळें ते समोर येऊन खुलासा देण्यास धजत ना ! सवालजबाबांतच कितीतरी वेळ निघून गेला, दरम्यान श्री. अनंतराव परांजपे अध्यक्षाच्या खुर्चीवर जाऊन बसले. शेजारी सूचित अध्यक्ष दादाभाई उभे होते आणि सर्वत्र गोंगाट चालू होता. अखेरीस सभा अनधिकृत रीतीनें बोलविण्यांत आली हा कै. सर गंगाधरराव चिटणवीस यांची खात्री असल्यामुळें त्यांनी तसें जाहीर करून सभा विसर्जन केली.

इकडे नगरभवनाच्या बाहेर लोकांची तुफान गर्दी जमली होती आणि लोकांच्या तोंडातून नेमस्तांच्या कारवाईबद्दल असंतुष्टता व्यक्त होत होती. किरकोळ रेटारेटीही झाली. टाऊनहॉलमधील सभेचें विसर्जन होऊन राष्ट्रीय पक्षाची मंडळी बाहेर येतांच त्यांनी लोकांचा जमाव पाहून तो येथें राहणें इष्ट न वाटल्यानें नीलहॉम पार्कमध्यें सभा आहे तेव्हां सर्वांनी तेथें जावें असें सांगून सर्वांना तिकडे नेलें आणि टाऊनहॉल समोरील गर्दी नाहींशी केली.

यानंतर समेटाचे अनेक प्रयत्न झाले. पण त्यांना यश आलें नाहीं. मध्यप्रांताचें नांव बद्द होऊं नये आणि कांग्रेस नागपुरास भरावी यासाठीं राष्ट्रीयपक्षानें स्वागत कमिटीच्या कार्यकारी मंडळांतून निघून जाण्याची देखील कबूली दिली. डॉक्टर मुंजे आणि कै. नीळकंठराव उधोजी यांनी मुंबईस जाऊन तेथें कै. सर फेरोजशहा मेथा वगैरे नेमस्त पुढाऱ्यांशीं विचारविनिमय केला परंतु ते रिक्त हस्तानें नागपूरास परत आले. पुढें नागपूरांतून कॉंग्रेसची उचलबांगडी करण्यासाठीं मुंबईस कै. सर फेरोजशहा मेथा यांचे बंगल्यावर ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक बोलविण्यांत आली. नागपूरहून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभादांना वेळोवेळीं माहिती पुरविण्यासाठीं डॉ. मुंजे, रा. नारायणराव अळेकर

आणि कै. केशवराव गोखले मुंबईस गेले. परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सुरतेची मंडळी आधींच सर फेरोजशहांच्या बंगल्यावर येऊन राहिली होती. त्यांच्या पदरांत सर फेरोजशहांनीं कॉंग्रेसला टाकलें. डॉ. मुंजे, श्री. अळेकर, श्री. गोखले यांनीं कॉंग्रेस नागपूरहून उचलली जाऊं नये यासाठीं पराकाष्ठा केली. खर्च सोसण्याची तयारी व पात्रता सिद्ध करण्याकरितां ( संशय प्रकट करण्यांत आल्यावरून ) दहा हजार रुपयांच्या नोटा सर दिनशा एदलजी वाच्छा यांच्या स्वाधीन करण्यांत आल्या. पण कलकत्त्यास आपला मानभंग झाला या कल्पनेनें रागावलेल्या मेथांनीं कशालाही दाद दिली नाहीं.

अशा प्रकारें नागपूरकरांचा विरस करून सुरक्षितपणाकरितां सुरतेस नेलेली कॉंग्रेस शेवटीं मरली असें म्हणण्याऐवजी मोडली असेंच म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. आपापल्या पक्षाचा प्रचार करण्याकरितां कॉंग्रेस भरण्याच्या बरेच दिवस आधीं नेमस्त पक्षानें दि. ब. अंबालाल साकरलाल देसाई व अलीमहमद भीमजी यांना व लो. टिळकांनीं श्री. दादासाहेब खापर्डे यांना पाठविलें. २३ तारखेस टिळक सुरतेस जाऊन पोहोंचले. मवाळांच्या सभा खासगी रीतीनें होत तर राष्ट्रीय पक्षाचा प्रचार उघड रीतीनें होत असे. तसें म्हटलें तर दोन्हीही पक्ष भांडण करण्याची आमची इच्छा नाहीं असें जाहीर करीत होते पण थेट कॉंग्रेसला सुरुवात होईपावेतों समेटाची भाषा सुरूच होती. शेवटीं समेट न झाला तर अध्यक्षाच्या सूचने बाबत उपसूचना आणावयाची असें ठरवून सर्व मंडळी मंडपांत हजर राहिली. कॉंग्रेसमध्यें कांहींतरी विशेष होणार अशी सर्वांची भावना होती. शेवटीं समेट झाला नाहीं व डॉ. राशबिहारी यांचें नांव घाईनें सुचविण्यांत आलें व तावडतोब दुसरी सूचना करण्यास लो. टिळक व्यासपीठावर चढले. मी रीतसर अध्यक्ष निवडलों गेलों असें म्हणून घोषबाबू बसूं लागले पण लो. टिळक म्हणाले कीं ही सूचना पास झाली नसून मी याच बाबतींत उपसूचना मांडण्यास पुढें आलों आहें. मवाळ प्रतिनिधी टिळकांवर गरम झाले व कांहींनीं त्यांचेवर खुर्च्या उगारल्या. हा प्रसंग पाहून नागपूरचे श्री. धुंडिराजपंत ठेंगडी, डॉ. गोरे, पंजाबचे बॅ. भगत वगैरे मंडळी लो. टिळकांचा बचाव करण्यास व्यासपीठावर चढून गेली. यानंतर मंडपांत गोंधळ माजून शेवटीं पोलिसांनीं मंडपाचा ताबा घेतला व

अधिवेशन मोडलें. नागपूरच्या केशवराव गोखले वकिलांस कांहीं वेळ अटक करून सोडून देण्यांत आलें. झाला हा प्रकार वाईट झाला असेंच सर्वांना वाटलें आणि जो तो आपापल्या वृत्तीनुसार कोणी टिळकांना तर कोणी फेरोजशहांना दोष देऊं लागला. यानंतर मवाळांनीं जहालपक्षाला वगळून एक कन्व्हेंशन भरविण्याचें ठरविलें व टिळकपक्षानें एक कॉंग्रेस कंटिन्युएशन कमिटी कायम करण्याचें ठरविलें. अशा प्रकारें मतभेदाचा स्फोट होऊन सुरतेस जहाल व मवाळ यांचे मार्ग स्पष्टपणें परस्परांपासून भिन्न झाले.

१९०८ च्या थेट नोव्हेंबरपावेतों पुनः संयुक्त कांग्रेस करवितां येईल की काय याचे अनेक प्रयत्न झाले पण ते सर्व फसले. दरम्यान टिळकांवर खटला होऊन त्यांना जुलै अखेर सहा वर्षांची शिक्षा झाली. शेवटीं २८।११।०८ रोजीं मुंबईस राष्ट्रमत कचेरीत कांग्रेस कंटिन्युएशन कमिटीची सभा होऊन स्वतंत्र कांग्रेस करावी असें बहुमतानें ठरलें. नागपूरचें पूर्वीचें आमंत्रण होतेंच. सर्व प्रांतांतून या कांग्रेसकरिता प्रतिनिधी निवडावयास सुरवात झाली. नागपूरच्या मंडळींनीं स्वागताच्या व्यवस्थेची सुरवात केली आणि लेंडन्यास (सध्यांची रामदास पेठ) कांग्रेसच्या बैठकीची योजना करण्याचें ठरलें. पण योगायोग निराळाच होता. ता. ११।१२।०८ रोजीं नागपूरच्या डि. मॅजिस्ट्रेटनें १४४ कलमाखालीं या कांग्रेसला बंदी करणारा हुकूम बजावला. यावर खटपट झाली पण १६।१२ ला डि. मॅ. नें आपला पहिला हुकूमच कायम केला आणि स्वागत मंडळाला कांग्रेस नागपूरला होत नाहीं असें सर्वांना कळविणें भाग पडलें.

---

# प्रकरण ८ वें



" १९०८ ते १९१४ पर्यंत, काँग्रेसच्या चळवळीचा इतिहास फारसा गडबडीचा नाही. या सहा वर्षांत मोर्लेमिंटो सुधारणा व महायुद्ध यांचे दोन महत्त्वाच्या गोष्टी झाल्या. मोर्लेनी सुधारणांच्या बाबतीत हिंदुस्थानच्या तोंडाला पानेंच पुसली. महायुद्धांत हिंदुस्थान पडलें व त्याचा शेवट काय झाला हेंही सर्वांस ठाऊक आहेच. सुरत काँग्रेसनंतर राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार यासंबंधाने ठराव ( १९१४ पावेतों ) काँग्रेसपुढें आलेच नाहीत. स्वराज्याचा व स्वदेशीचा ठराव मधूनमधून येई.........( या काळांत ) काँग्रेसविषयीं सरकारला भीती न उरल्यामुळें सरकारही काँग्रेसकडे सहानुभूतीनें पाहूं लागलें. काँग्रेसनेंही राजनिष्ठेचे व कृतज्ञतेचे ठराव वेळोवेळीं पास करून आपण सदनशीर मार्गाचे भुकेले आहोत असें दाखविलें. अशा प्रकारें सरकार व जनता दोघांनाही खूष ठेवण्याचा प्रयत्न काँग्रेसनें या काळांत केला." ( चित्रमयजगत् १९३५ जानेवारी )

वरील परिस्थितीचें प्रतिबिंब या प्रांतांत उमटावें हें साहजिक दातें १९०७ नंतर १९१६ मध्यें लखनौस जहालाचा पुनः काँग्रेसमध्यें समावेश होईपावेतों जहाल वृत्तीच्या राष्ट्रीयांना स्वतंत्रपणें काम करणें भाग होतें व या परिस्थितींतून तोड काढण्याकरितांच नागपूरला १९०७ च्या सुरवातीस लो. टिळकांना नागपूर काँग्रेसचे अध्यक्ष बनविण्याची खटपट करण्याच्या निमित्तानें निघालेलें राष्ट्रमंडळ स्वभावतःच अधिकाधिक कार्यक्षम बनूं लागलें. सुरवातीस या मंडळांत नरमगरम मिळून सुमारें १०० मंडळी होती पण १९०९ च्या ग्रीव्हलंडशाहीनंतर नरम मंडळीनें काढता पाय घेतल्यामुळें मूळ राष्ट्रीय मंडळांत मोजकी मंडळीच उरली. मि. ग्रीव्हलंड हे सी. आय. डी. चे प्रमुख स्पेशल ऑफिसर नेमण्यांत आले होते. त्या वेळचा कठीण काळ लक्षांत घेतां राष्ट्रीय मंडळानें राष्ट्रीय वृत्तींची ज्योत तेवत ठेवण्याचें जें खडतर कार्य त्या काळीं केलें तें राष्ट्रीय इतिहासांत नेहमीकरितां नमूद व्हावें अशा योग्यतेचें आहे.

एकदां निव्वळ लो. टिळकांची तसबीर या मंडळाच्या गणेशोत्सवांत होती एवढ्या सबबीवरून अधिकाऱ्यांचा रोष होऊन विसर्जन २॥ महिने लांबणीवर पडलें. १९१२ च्या सुमारास या मंडळानें म्युनिसिपालिटींतील मवाळांच्य मिरासदारीवरही निकाराचा हल्ला चढवला होता. खुद्द लोकमान्यांना लखनौच कांग्रेसमध्यें शिरतांना ज्या लोकांच्या पाठिंब्याचा भरंवसा वाटला असेल त्यांत नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाचें प्रमुख स्थान होतें असें म्हणण्यांत चूक होते असें वाटत नाहीं. राष्ट्रीय मंडळाच्या अनेकविध कार्यांत राष्ट्रीय वृत्तपत्राचा समावेश होता. हें काम त्या वेळीं श्री. अच्युतराव कोल्हटकर यांनीं देशसेवकद्वारें फारच तडफेनें केलें, आणि अशी वृत्तपत्रीय सेवा करीत असतांनाच ता. १६ व ता. ३१ मे रोजीं अनुक्रमें पं. माधवराव सप्रे आणि श्री. अच्युतराव कोल्हटकर यांजवर हिंदी केसरी व देशसेवक यांतील लिखाणांबद्दल खटले झाले. पैकी पं. सप्रे यांनीं माफी मागितली व श्री. अच्युतराव कोल्हटकरांना १॥ व. स. म. ची शिक्षा झाली. त्या वेळीं त्यांना जेलमध्यें फारच त्रास झाला.

१८ जुलैला दिल्लीचे मि. हैदर रेझा टिळक जयंतीनिमित्त मुद्दाम नागपूरला आले होते व चिटणीस पार्कमध्यें पहिली फारच मोठी सभा झाली. आपल्या भाषणांत मि. रेझा यांनीं लोकमान्य माझे राजकारणांतील गुरू होत असें सांगून हिंदु मुस्लीम ऐक्याचें महत्त्व पटवून दिलें.

या भाषणानंतर लवकरच लो. टिळकांना राजद्रोहाकरितां सहा वर्षांची शिक्षा झाली व सर्वांचे मनावर कठोर आघात झाला. त्यामुळेंच विद्यार्थ्यांतही खळबळ माजून हरताळ पडणें, विद्यार्थ्यांचे संप इत्यादि गोष्टी घडून येऊन याची प्रतिक्रिया म्हणून सरकारनेंही लोकांच्या हालचालींवर कडक नजर ठेवण्यास सुरुवात केली. पुढें डिसेंबरचे १२ तारखेस नागपूरचें प्रदर्शन सर रेजिनाल्ड क्रॅडॉक साहेबांनीं उघडलें. त्याच रात्रीं महाराजबागेंतील व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याला कोणी बाँबर फासल्यामुळें गांवांत बरीच खळबळ उडाली. त्या वेळचे ॲग्रिकल्चरल कॉलेज बोर्डिंगचे सुपरिंटेंडेंट श्री. नारायणराव परांजपे यांवर तोहमत येऊन त्यांची नोकरी गेली; कांहीं विद्यार्थ्यांनाही पकडण्यांत आले होतें. पण शेवटीं एक खेरीज करून सर्व सुटले. त्यापूर्वीं रायपुरास श्री. रा. ब. मुधोळकर

यांच्या अध्यक्षतेखाली रायपूरला प्रांतिक परिषदेचें अयशस्वी अधिवेशन होऊन त्यांत जहाल व मवाळ असे स्पष्ट दोन तट पडून चुकले होतेच.

डिसेंबर अखेर मद्रासला कन्व्हेन्शनच्या स्वरूपांत कांग्रेस भरली. सुरतला कांग्रेस झालीच नाही म्हणून मद्रास कांग्रेसला तेविसावी कांग्रेसच म्हणण्यांत आलें व अध्यक्षही डॉ. राशबिहारी घोष यांनाच केलें. येथें ६२६ प्रतिनिधी गेले पकीं मध्यप्रांतांतून फक्त १८ च गेले. कलकत्त्यास ही संख्या अनुक्रमें १६६३ व ९० अशी होती. यावरून मद्रासला कांग्रेस किती रोडावली होती हें लक्षांत येईल

१९०९ सालीं लाहोरास पं. मदन मोहन माळवीय यांच्या अध्यक्षतेखालीं कांग्रेस झाली. ही तर इतकी रोडावली कीं तिला मंडपाची गरज न भासतां ती ब्रॅडलॉ हॉलमध्येंच झाली. एकंदर २४३ प्रतिनिधींपैकीं मध्यप्रांतांतून ६ गेले होते. या वर्षी बॅ. अभ्यंकर व बॅ. गोविंदराव देशमुख हे येथील राष्ट्रीय मंडळांत सामील झाले. या वर्षी येथील देशसेवकवर पुनः खटला झाला. श्री. शंभुराव गाडगीळ यांच्या ' पदव्याची खैरात ' या लेखाबद्दल तो खटला होता. १९०७ पासून १९१० पावेतों नागपुरांतील वर्तमानपत्रांवर जे खटले झाले ते सर्व श्री. केशवराव गोखले यांनीच निस्वार्थ बुद्धिनें चालविले. श्री. शंभुरावांचा बचाव करीत असतांच कचेरींत त्यांना ताप आला व तो प्लेगचा ठरून त्यातच त्यांचा अंत झाला व राष्ट्रीय मंडळ अव्वल दर्जाच्या पुढाऱ्याला आंचवलें.

१९१० सालीं अलाहाबाद येथें मि. वेडरबर्न यांच्या अध्यक्षतेखालीं कांग्रेस झाली. एकंदर ६३६ प्रतिनिधींपैकीं १६ मध्यप्रांताचे होते. या कांग्रेस-मध्यें मध्यप्रांत व वऱ्हाड यांना प्रतिनिधित्वाचे दृष्टीनें वेगळे करण्यात आलें. कांग्रेसच्या घटनेंत व ध्येयांतही बदल झाला. १८ व्या ठरावांत मध्यप्रांत व वऱ्हाडतर्फे कायदेमंडळाची मागणी करण्यांत आली. असाच एक ठराव १९०९ च्या लाहोर कांग्रेसमध्यें पास करण्यात आला होता.

३० डिसेंबरला नागपुरास मि. सय्यद नबीयुल्ला बॅरिस्टर यांच्या अध्यक्षतेखाली मुस्लीम लीगचें दुसरें अधिवेशन झालें. त्याचे स्वागताध्यक्ष

नागपुरास येऊन एक तास थांबले होते. विंग्जचे आणि टेकडीवरील एक खांब ही त्यांच्या भेटींचीं स्मारकें होत.

१९१३ सालीं नबाब सय्यद बहादुर यांच्या अध्यक्षतेखालीं कराचीस कॉंग्रेस भरली. तिला आमच्या प्रांतातर्फे कोणीही गेले नाहीं. या कॉंग्रेसमध्येंही हिंदु मुस्लीम ऐक्यावर विशेष जोर देण्यांत आला होता.

८-११-१३ रोजीं मध्यप्रांत कायदे कौंसिल सुरू करण्याबद्दलचा अधिकृत जाहिरनामा प्रसिद्ध झाला.

या कॉंग्रेसमध्यें श्री भूपेंद्रनाथ बसूंनीं प्रेस ॲक्ट रद्द व्हावा अशी मागणी करणाऱ्या ठरावावर फारच जोरदार भाषण केलें.

१९१४ सालीं मद्रासला श्री. भूपेंद्रनाथ बसूंच्या अध्यक्षतेखालीं जी कॉंग्रेस झाली ती कमालीची सरकाराभिमुख होती असें म्हणावयास हरकत नाहीं. तिला खुद्द मद्रासचे गव्हर्नर हजर होते. प्रतिनिधी ८६६ होते. पण त्यांतले ७४८ खास मद्रासचेच होते. मध्यप्रांत वऱ्हाडतर्फे मद्रासला दोघेजण गेले होते. या कॉंग्रेसमध्यें राजनिष्ठेचा ठराव पास झाला त्यांत कांहींच नवल नाहीं.

या वर्षी जानेवारींत येथील प्रसिद्ध महाराष्ट्र पत्र सुरू झालें. १७ जूनला लो. टिळकांची सुटका झाली व सर्वत्र देशांत आनंदीआनंद झाला. १७ ऑगस्टला मध्यप्रांत कौन्सिलची पहिली बैठक झाली. या सुमारासच जागतीक महायुद्धाच्या वणव्यासही आरंभ झाला. नागपूरच्या राजकारणांत या वर्षअखेर जहालमवाळां मध्यें समेटाचा प्रयत्न झाला. त्यांत जहालां तर्फे दादासाहेब उधोजी, दादासाहेब रापर्डे व डॉ. मुंजे व मवाळांतर्फे सर बिपिनबाबू, सर गंगाधरराव चिटणीस आणि डॉ. गौर यांनीं प्रयत्न केला. याचीच परिणती होऊन पुढील वर्षी मध्यप्रांत वऱ्हाडनी संयुक्त प्रांतिक परिषद झाली. नुकत्याच सुरू झालेल्या कौन्सिलला हरदाच्या श्री. लक्ष्मैया ह्या कॉंग्रेस सभासदांनीं शेतकऱ्यांच्या दशेचें वर्णन करणारा एक खलिता पाठविला. हेंही त्या काळच्या मानानें विशेषच समजलें पाहिजे.

या वर्षी २ मार्चला प्रां. कां. कमिटीचे प्रमुख सभासद व आपल्या प्रांतांतील कॉंग्रेसचे आद्य प्रतिनिधी श्री. बापूरावदादा किनखेडे हे वारले.

१९१५ सालीं मुंबईस सर सत्येंद्र प्रसन्न सिंह (पुढें लॉर्ड) यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या इतमामानें कॉंग्रेसचें अधिवेशन झालें. त्याच पेंडालमध्यें मुस्लीम लीगचेंही अधिवेशन झालें. एकंदर २२५९ प्रतिनिधी गेले होते. लो. टिळकांनी या कॉंग्रेसला यावें असा प्रयत्न केला गेला पण ते गेले नाहींत. जाहीर सभांतूनच प्रतिनिधींची निवड केली जावी असें लोकमान्यांना वाटे. सारांशतः हें तत्व मान्य झाल्यावरच पुढें लोकमान्य लखनौ कॉंग्रेसला गेले. या कॉंग्रेसमध्यें राजनिष्ठेला जणुं पूर आला होता. तरी महायुद्धाच्या मोबदल्यांत हिंदुस्थानला भरीव हक्क देणें हें सरकारचें कर्तव्य आहे या मुद्दयावर अध्यक्षांचें फारच सडेतोड भाषण झालें. कॉंग्रेसमध्यें गोखले, मेहेता, हेन्री कॉटन यांच्या निधनाबद्दल शोकप्रदर्शक ठराव पास झाले. म. गांधी या वेळीं हिंदुस्थानात कायमपरत आले होते. ना. शास्त्र्यांनी मुदतबंद मजूरांबद्दल ठराव आणला, त्यावर श्री. पाध्यांनी भाषण केलें.

या वर्षी १९ फेब्रुवारीस गोपाळ कृष्ण गोखले यांचा देहांत झाला व नागपुरास त्यांचें स्मारक म्हणून गो. मे. लायब्ररी सुरु झाली. नुकत्याच राजकारणात पडलेल्या बेझंट बाई याच वर्षी नागपुरास आल्या व चिटणीस पार्कात सर बिपिन बोस यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचें फार दणदणीत व्याख्यान झालें. १६–१७–१८ नोव्हेंबर रोजीं नागपुरास जहालमवाळ्यांची श्री. बिशनदत्त शुक्ल यांच्या अध्यक्षतेखालीं परिषद झाली. या परिषदेनें डोमिनियन स्टेटस् असें आपलें ध्येय जाहीर केलें. या परिषदेनें नागपूरकरितां चीफ कोर्ट व विश्वविद्यालयाची मागणी केली व स्वदेशीला पाठिंबा दिला.

---

# प्रकरण ९ वें

## १९१६ ते १९२० सप्टेंबर

### मतैक्याचा काल.

लोकमान्य सुटून आल्यापासून कॉंग्रेससंबंधीं राष्ट्रीयपक्षाचें काय धोरण असावें याचा एकसारखा विचार चालू होता. या प्रश्नाला २९ एप्रिल १९१६ ला बेळगांवच्या प्रांतिक परिषदेंत जोरानें तोंड फुटलें. टिळकांचे बरेच अनुयायी आपले प्रांतांतील डॉ. मुंजे आदि पुढाऱ्यांसह स्वतंत्र कॉंग्रेस स्थापन करण्याच्या अगर होमरूललीग मार्फत राष्ट्रीय चळवळ करण्याच्या मताचे होते पण लोकमान्य टिळकांच्या मनांत क्रीडवर सही करूनहि कॉंग्रेसमध्यें रहावें व तिचे मार्फत राष्ट्रकार्य करीत असावें असें असल्यामुळें सर्वांनीं १९१६ च्या लखनौ कॉंग्रेसला जावयाचें ठरविलें. या सुमारास लोकमान्यांनीं स्थापलेल्या महाराष्ट्र होमरूललीगची नागपुरास श्री. दादासाहेब खापर्डे ढधोजी यांच्या अध्यक्षतेखालीं एक शाखा स्थापन करण्यांत आली होती. नोव्हेंबरमध्यें अमरावतीस डॉ. गौर यांच्या अध्यक्षतेखालीं प्रांतिक परिषद झाली तिला डॉ. अनी बेझंटबाई येणार होत्या पण दरम्यान त्यांना नजरबंद केल्यामुळें त्या येऊं शकल्या नाहींत. डॉ. बेझंटबाईचीहि एक स्वतंत्र होमरूल लीग ३।९।१९१६ ला स्थापन झाली होती त्यासंबंधांत त्यांना स्थानबद्ध करण्यांत आलें होतें. अमरावतीच्या कॉन्फरंसमध्यें प्रांतांत कार्यकारी मंडळ असावें, कौंसिलांत बिनसरकारी सभासदांचें बहुमत असलेले लोकप्रतिनिधी असावेत व प्रेस ॲक्ट रद्द व्हावा इत्यादि ठराव पास झाले. यासंबंधीं सर बेंजामिन राबर्टसन यांची भेट घ्यावयास शिष्टमंडळ धाडण्याचेंहि ठरलें.

१९१६ च्या लखनौ कॉंग्रेसमध्यें एकीचें वारें फारच जोरानें वहात होतें व मुसलमानांच्या पुष्कळांना अधिक वाटणाऱ्या मागण्यासुद्धां पत्करून त्यांचें पूर्ण सहकार्य मिळविण्यांत आलें. लॉर्ड व लेडी मेस्टन उभयतां कांहीं वेळ कॉंग्रेसला

हजर राहिले. या काँग्रेसमध्यें म० गांधी आफ्रिकेंतील मुदतबंद मजूरांच्या ठरावावर हिंदींत प्रथम बोलले. यावेळीं अलीबंधु छिंदवाड्यास नजरकैदेंत होते. त्यांच्या संबंधींही सहानुभूतिपर ठराव पास झाला.

या कॉंग्रेसहून परततांना लोकमान्य नागपुरास उतरले ६–१–१७ रोजीं त्यांचें सर विपिन घोस यांच्या अध्यक्षतेखालीं चिटणीसपार्कांत व्याख्यान झालें. त्यांत होमरूललीगची कल्पना विशद केल्यामुळें अवघ्या दहा दिवसांत नागपूर जिल्ह्यांत होमरूललीगला ४३६ सभासद मिळून २८–४–१७ ला लीगच्या वार्षिकदिवसापावेतों एकंदर दीडहजार सभासद झाले होते. यापूर्वीपासून येथें एक प्रॉव्हिंशियल असोसिएशन स्थापण्यांत आलें. त्याचे सेक्रेटरी डॉ. मुंजे होते. श्री. नारायणराव वैद्य प्रांतिक होमरूल लीगचे सेक्रेटरी होते. महाराष्ट्रांत यावेळीं मुदतबंद मजुरांबद्दल एक लेख आला त्याबद्दल त्यांचेकडून दीडहजार रुपयांचा पुनः जामीन मागण्यांत आला. विद्यार्थी राजकारणांत पुनः वाढता भाग जोमानें घेऊं लागल्यामुळें रिस्ले सर्क्युलर निघून शाळा कॉलेजात खळबळ माजली. कॉलेजें कांहीं दिवस बंद पडलीं व परिणामतः अनेक विद्यार्थ्यांना एक दोन वर्षांकरितां बडतर्फ करण्यांत आलें. मार्च १७ ला महायुद्धामध्यें सैन्य भरती करण्यास मदत करण्याकरितां एक रिक्रूटिंग कमिटी होमरूललीग मार्फत स्थापन झाली. श्री. खापर्डे हिचे अध्यक्ष व डॉ. मुंजे सेक्रेटरी होते कारण लोकमान्य ह्या संधीचा राष्ट्रहिताकरितां फायदा करून घ्यावा हें जोरानें प्रतिपादीत होते.

या वर्षीच्या कौंसिल निवडणुकींत लोकनियुक्त ७ सभासदांत श्री. श्री. म. तांबे, श्री. वाय्. जी. देशपांडे ( उमरावती ) व रायसाहेब ठक्कर ( रायपूर ) हे तीन होमरूल सभासद निवडून आले. २६ आगष्ट रोजीं व्यंकटेश थिएटरांत स्पेशल प्रांतिक परिषद रा. सा. ठक्कर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली व तिच्यात ' मुस्लिमलीग व कॉंग्रेस यांच्या मागणीपेक्षा कमीवर हिंदुस्थान संतुष्ट होणार नाहीं असा ठराव करण्यांत आला.

२०।८।१७ ला मि. मॉंटेग्यूनीं पार्लमेंटांत आपला हिंदुस्थानविषयक प्रसिद्ध जाहिरनामा वाचला आणि त्यानंतर ते कांहीं दिवसांनीं स्वतः हिंदुस्थानांतही आले

१७ सप्टेंबरला डॉ. बेझंटबाईंची मुक्तता झाली होती आणि मॉंटेग्यू हिंदुस्थानांत आल्यावर ते बेझंटबाई व लोकमान्य टिळक या दोघांनाही भेटले. आपल्या प्रांतांतील सर गंगाधरराव चिटणवीस, डॉ. गौर, सर एम्. व्ही. जोशी, बिशनदत्त शुक्ल, मुधोळकर व प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांतर्फे श्री. खापर्डे, रा. ब. नारायणराव केळकर व रा. सा. ठक्कर, इत्यादींना भेटले व सुधारणेबाबत चर्चा केली. या वर्षीच नोव्हेंबरांत नामदार खापर्डे व सर माणेकजी दादाभाई यांचा व्हाइसरायच्या कौंसिल निवडणुकींत ( प्रांतिक कौंसिल तर्फे )सामना होऊन राष्ट्रीय पक्षाचे उमेदवार दादासाहेब खापर्डे बहुमतानें निवडून आले.

या वर्षीची कॉंग्रेस कलकत्त्यास डॉ. बेझंटबाईंच्या अध्यक्षतेखाली भरली. ४९६७ प्रतिनिधी हजर होते. विलायतेस शिष्टमंडळ धाडण्याचें ठरून टिळकांच्या होमरूललीगतर्फे बॅ. बॅप्टिस्टा आणि बेझंटबाईंच्या लीगतर्फे बॅरिस्टर अय्यर यांना धाडण्यांतही आलें. या कॉंग्रेसमध्यें अस्पृश्यतानिवारणासंबंधी प्रथमच जो ठराव झाला तो महात्मा गांधींमुळें आला असण्याचा संभव आहे. या वर्षी कॉंग्रेसच्या आधारस्तंभांपैकी महर्षि दादाभाई दिवंगत झाले होते. त्यांच्या बद्दल कलकत्ता कॉंग्रेसनें शोकप्रदर्शक ठराव पास केला.

कलकत्ता कॉंग्रेसहून परततांना लोकमान्य पुनः नागपुरास उतरले. कीर्तनकारांनी राष्ट्रीय वृत्तीनें कीर्तनांतून प्रचार करावा या हेतूनें श्री. पाध्ये यांच्या धंतोलीवरील आवारांत लो. टिळक यांच्या अध्यक्षतेखाली कीर्तनसंमेलन झालें. पुनः फेब्रुआरींत लोकमान्य होमरूलच्या प्रचारार्थ परत आले व या प्रांतांत त्यांनीं होमरूललीगकरितां दौरा केला. ठिकठिकाणीं परिषदा भरल्या आणि नागपूर-चन्द्रानें एक लाख दहा हजार रुपये दिले. त्या वेळीं होमरूलचे नागपूर, वर्धा, चांदा व भंडारा येथें अनुक्रमें १४०७, ८३६, ४४४ व ५१ सभासद झाले.

मे महिन्याच्या सुरुवातीस नागपूरच्या कौंसिलहॉलमध्यें नागपूर व छत्तीसगड विभागाचा जोड दरबार भरून सर बेंजामिन यांनीं बादशहांचा लोकांनी

-महायुद्धांत मदत करण्याबद्दलचा जाहिरनामा वाचून दाखविला. दिल्लीलाही युद्ध-परिषद भरविण्यांत येऊन हिंदुस्थानच्या पाठिंब्याची मागणी करण्यांत आली.

यानंतर होमरूललीगचा प्रांतांत जोराने प्रचार सुरू झाला व दमोहच्या एका भाषणाबद्दल श्री. नारायणराव वैद्य यांजवर ५ जुलैला खटला भरण्यांत आला. त्याची दमोहला सुनावणी होऊन श्री. वैद्यांना १॥ व. स. म. ची शिक्षा झाली. पुढें त्यांचें अपील दे. बं. दास यांनी नागपुरास चालविलें व अखेर श्री. नारायणराव वैद्य ६।११।१८ ला सुटले. या खटल्यांत बॅ. अभ्यंकरांनीं बॅ. दास यांचे मदतनीस म्हणून काम केलें व त्यामुळें या दोघांचा घनिष्ठ संबंध येऊन परस्परांबद्दल एकमेकांना आदर वाटूं लागला. वरोड्याचे हो. रू. लो. चे अध्यक्ष श्री. विष्णुपंत काणे व ब्रह्मपुरीचे श्री. आत्मारामपंत महाजन यांच्यावर सैन्यभरतीस विरोध केल्याबद्दल खटले झाले पण पुढें ते सुटले.

या वर्षी रौलट कमिशनची नेमणूक व मॉटफर्ड रिपोर्टाची प्रसिद्धी अशा परस्परविरोधी गोष्टी घडल्या व या सुधारणांवर मत प्रदर्शित करण्यास मुंबईला ऑगस्ट अखेर बॅ. हसन इमाम यांचे अध्यक्षतेखाली कॉंग्रेसची खास बैठक झाली. दे. भ. विठ्ठलभाई पटेल स्वागताध्यक्ष होते. या कॉंग्रेसला ४९६८ प्रतिनिधी येऊन त्यांपैकी ९५ हरिजन होते. दे. चित्तरंजन दास यांनीं रौलट रिपोर्टाचा निषेध करणारा ठराव मांडला. लोकमान्य टिळकांना पंजाबाबाहेर भाषणबंदी होती परंतु कॉंग्रेसमध्ये ५ मिनिटें सुधारणेच्या ठरावावरच बोलण्याची परवानगी मिळाली. कॉंग्रेस ह्या सुधारणा धिःकारणार (Reject) असल्यामुळें आपण आपली नरमांनी परिषद भरवावी असें नेमस्तांना वाटलें व त्याप्रमाणें बरेच नेमस्त पुढारी गैरहजर होते. त्यांनी आपल्या परिषदेची तारीख ऑक्टोबरांत ठरविली होती.

दिल्लीच्या कॉंग्रेसचे लो. टिळकच अध्यक्ष निवडले गेले पण ते आधींच चिरोल केस व कॉंग्रेसचे कामाकरितां विलायतेस गेल्यामुळें पं. मालवीयांच्या अध्यक्षतेखाली दिल्ली कॉंग्रेस झाली. एकंदर प्रतिनिधी ४८६९ होते. लढाई बंद झाल्याबद्दल अभिनंदनपर ठराव पास झाला. पं. मालवीयांनी रौलट रिपोर्टाचा धिःकार केला. मुख्य ठराव स्वराज्य व प्रांतिक स्वायत्ततेचा होता. विदेशांना कॉंग्रेसची मागणी

फार वाटे. ती शक्य तितकी कमी व गोड शब्दांत मांडण्याचा कटाक्ष नेमस्तांचा होता म्हणूनच नेमस्त पुढारी मुंबईला गैरहजर होते. त्यांची परिषद होऊन गेली होती. हा ठराव बी. चक्रवर्ती यांनीं मांडला. ना. शास्त्री यांची 'असमाधानकारक व निराशाजनक' हे शब्द काढून टाकण्याची उपसूचना नापास झाली व पाल, दास, सत्यमूर्ती, बिझांट प्रभृतींचीं जोरदार भाषणे झाल्यावर मूळ ठराव पास झाला. शांततापरिषदेकरितां लो. टिळक, म. गांधी व सय्यद हसन इमाम हे कॉंग्रेसचे प्रतिनिधी आहेत व त्यांना सरकारनें मान्यता द्यावी हा दे. बं. दासांचा ठरावहि पास झाला.

१९१९ सालीं रौलट बिलामुळें देशांत पुष्कळच खळबळ माजली. महायुद्धांत मदत केल्याबद्दल कांहींतरी आपल्या पदरांत पडेल अशा भरंवशांत असणाऱ्या देशाच्या डोक्यावर ह्या बिलाचा प्रहार पडला. १० मार्च रोजीं डॉ. मुंजे यांनीं प्रांतिक असोसिएशनतर्फे दहा कौंसिलरांच्या सह्यांनिशीं रौलट बिलाविरुद्ध पत्रक प्रसिद्ध केलें. २० मार्चला खांडव्यास दादासाहेब खापर्ड्यांच्या अध्यक्षतेखालीं मध्यप्रांत परिषद झाली तिच्यांतही इतर अनेक ठरावांबरोबर रौलट बिलाच्या निषेधपर ठराव पास करण्यात आला. या परिस्थितीमुळेंच १३ ते १६ डिसेंबर पावेतों सरकारतर्फे शांततादिन पाळल्याबद्दल जी योजना झाली तिच्याविरुद्ध एक पत्रक काढण्यांत आलें होतें. स्थानिक होमरूललीगला या वर्षी वर्तमानपत्राची गरज वाटूं लागल्यामुळें डॉ. मुंजे यांनीं संकल्प वर्तमानपत्र काढलें त्याला हो. रू. लीगकडून दोन हजार रुपये देण्यांत आले; श्री. प्रयागदत्त शुक्ल संपादक व शंकरराव खोत मुद्रक होते. पत्राकडून एक हजाराचा जामीन मागण्यांत आला होता.

या वर्षी एप्रिल ६ तारखेस महात्मा गांधींनीं रौलट बिलाविरुद्ध आपला प्रसिद्ध सत्याग्रह सुरू केला व १३ तारखेस पंजाबांतील प्रसिद्ध जलियांवाला बाग प्रकरण झालें, हाच आपण सध्यां प्रतिवर्षी पाळतों तो राष्ट्रीय आठवडा होय. अशा क्षुब्ध वातावरणांत सबंध वर्ष गेल्यामुळें अमृतसरला पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं झालेली कॉंग्रेस फार महत्त्वाची झाली.

स्वामी श्रद्धानंद या कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष होते. या कॉंग्रेसला जात असतां गंगापूर स्टेशनवर लो. टिळकांना ३० डिसेंबर रोजीं बादशहाच्या राजबंदींना मुक्त

करणारा जाहीरनामा वाचण्यास मिळाला आणि त्याचें उत्तर म्हणून लो. टिळकांनीं जी तार केली त्यांत पुढें रूढ झालेला " प्रतियोगी सहकारिता " हा शब्द लोकमान्यांनीं प्रथम वापरला. या कॉंग्रेसमध्यें डॉ. मुंजांनीं पुढील कॉंग्रेसला नागपूरतर्फे आमंत्रण दिलें व पुनः टिळकांना अध्यक्ष बनविण्याचा मनाशीं संकल्प केला पण लोकमान्य १९२० सालच्या कॉंग्रेसपूर्वीच दिवंगत झाले.

" युद्धकालीन कॉंग्रेसच्या बैठका परिस्थितीच्या अनुकूलतेमुळें व (लोकांच्या) वाढत्या आकांक्षांमुळें सरस ठरल्या. १९१६ ते १९१९ च्या बैठका जोरदार, तेजस्वी व कार्यक्षम दिसतात. त्या काळांत वातावरण सारखें हादरूं लागलें होतें.... ......२० आगस्टचा जाहीरनामा, मॉंटफोर्ड सुधारणा, स्वयंनिर्णयाचें तत्व, रौलट ॲक्ट या सरकारच्या दृष्टीनें चार संस्मरणीय गोष्टी झाल्या. आमच्या दृष्टीनें लष्करांत प्रवेश, होमरूल चळवळ, विलायतेंतील शिष्टाई या गोष्टी महत्त्वाच्या होत. सर सुब्रम्हण्यम अय्यर यांनीं प्रे. विलसनला एका दूतामार्फत पत्र पाठविलें व त्या पत्रामुळें बेसंटबाईची सुटका होऊन व २० आगस्टचा जाहीरनामा बाहेर पडला असें म्हणतात..........अशा प्रकारें हा चार वर्षांचा काळ अनेक दृष्टींनीं संस्मरणीय आहे. पुढील चळवळीचीं बीजें याच काळांत रुजलीं गेलीं." —चित्रमयजगत् जानेवारी १९३५.

ता० २४-१२-१९१९ ला बादशहांनीं घोषित केल्याप्रमाणें हा प्रांत ' Regulated ' रेग्युलेटेड करण्यांत येऊन गव्हर्नरचे अमलाखालीं आला. वरील प्रकारच्या शासनपद्धतींत झालेल्या फरकाबरोबरच प्रांतातील अंतरंग राजकारणांतहि फरक झाला. आक्टोबर १९१८ ला मुंबईला भरलेल्या नेमस्तांच्या स्वतंत्र निराळ्या परिषदेकरतां जात असतां, श्री. बाबु सुरेन्द्रनाथ बानर्जी नागपूरला उतरले व त्यांचेशीं विचारविनिमय झाल्यावर नागपूर वऱ्हाड प्रांतांतूनहि नेमस्तांनीं स्वतंत्रपणें भरलेल्या संस्थेबद्दल संमतीच्या ६० तारा पाठविल्या व १९१९ मध्यें कलकत्त्याला भरलेल्या दुसऱ्या परिषदेला तर सर गंगाधरराव चिटणीस व बरेच नेमस्त हजर राहिले व लगेच आपल्या प्रांतांत " मध्यप्रांत न्याशनल लिबरल असोसिएशन" स्थापन करण्यांत आलें व त्या संस्थेमार्फत नेमस्त आपलें राजकारण करूं लागले. १८८६ सालापासून आपल्या प्रांतातील ज्या अनेक पुढाऱ्यांनीं राजकीय जीवन

# भाग दुसरा

## १९२० सालची कॉंग्रेस



१९१९ साली अमृतसर काँग्रेसमध्यें पुढील वर्षाकरिता काँग्रेसला नागपूरतर्फे आमंत्रण द्यावयाचें ठरलें. या कामी हिंदी व मराठी मध्य-प्रांतातील प्रमुख कार्यकर्त्यांची पूर्ण संमति होती. पण पुढें हिंदी मध्य प्रांताचें मुख्य ठिकाण जबलपूर येथें हें अधिवेशन भरवावें की नागपूर येथें भरवावें हा वाद उपस्थित झाला आणि त्यात जवळ जवळ सहा महिने निघून गेले. नंतर ऑल इंडिआ काँग्रेस कमिटीनें काँग्रेस नागपूर-लाच भरवावी असा आपला निर्णय दिला. तोंपावेतों स्वागतमंडळाच्या निधींत एका पैलाही ठिकाण नव्हता. पुढें निदान कामाला तरी सुरु-वात करण्यास पुरावा म्हणून दहाहजार रुपयांचा निधी आपापसातच आगाऊ फंड गोळा करून निर्माण करण्यात आला. या सुमारास राष्ट्रीय पक्षाचे पंचप्राण लोकमान्य टिळक यांना १ आगष्ट १९२० रोजीं देवा-ज्ञा झाली आणि सर्वत्र निराशेचा गडद काळोख पसरला. पण कार्यक-र्त्यांची श्रद्धा विलक्षण होती. वऱ्हाडनेंही सहकार्य करण्याचें कबूल केलें आणि नागपूरची काँग्रेस मध्यप्रांत वऱ्हाडतर्फे व्हावी असें ठरलें. त्या बरोबर हिंदीमध्यप्रांतालाही स्फूर्ती होऊन त्यानेंही सहकार्य द्यावयाचें ठरविलें.

नागपूर अधिवेशनापूर्वी कलकत्यास १९२० च्या सप्तेंबर महिन्यांत कलकत्यास के. लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखालीं कांग्रेसचें खास अधिवेशन झालें, हें वाचकांच्या लक्षांत आहेच. १९०६ सालीं कलकत्यानें चतुःसूत्रीचा अंतर्भाव करून जसें परिवर्तन केलें तसेंच १९२० सालीं कलकत्यानें पुनः अहिंसात्मक असहयोगाची मुहूर्तमेढ रोवून आपलें परिवर्तनशालित्व सिद्ध केलें. या ठरावाला वऱ्हाड-मध्य-प्रांतानें विरोध केला होता पण एकदां ठराव पास झाला म्हणजे त्याच्या पालनांत माघार घ्यावयाची नाहीं असा या प्रांताचा विशेष आहे. सप्तेंबर ते डिसेंबर १९२० पावेतों या प्रांतानें मोठ्या चुरशीनें असहयोगाच्या कार्यक्रमाला हात घातला. कायदे कौंसिल बहिष्काराच्या बाबतींत आमचा प्रांत अग्रदीं पहिला होता. त्या सालच्या पहिल्या निवडणुकींत ९ जागांना उमेदवार न मिळाल्यामुळें त्या रिकाम्या राहिल्या आणि १५ जागांसाठीं निव्वळ एकच उमेदवार उभा होता; व हाही कांग्रेसचा नव्हता ! मतें दिलेल्या मतदारांची संख्याही फार कमी होती. या दृष्टीनें विचार करतां १९२० सालचे परिवर्तनशाली कांग्रेस अधिवेशन भरविण्याचा मान योगायोगानें नागपूरला मिळावा हें योग्यच होतें.

कलकत्याच्या बैठकींत बहुमताची मान्यता मिळालेल्या असहयोग कार्यक्रमाला सर्वसाधारण अधिवेशनाची मान्यता मिळणार नाहीं असा पुष्कळांना समज होता. पण सप्तेंबर पावेतों अहिंसात्मक असहयोगार्थ प्रणेते म. गांधी यांनीं प्रांतभर कसारीचा दौरा काढला आणि देशांतील जनतेचें मत आपल्या मतास अनुकूल करून घेतलें होतें. अशा परिस्थितींत नागपूरचें अधिवेशन भरलें. त्यापूर्वी सरकारशीं पूर्ण सहकार्य करणारे, 'रावबहादुर' उपाधि असलेले, आणि ज्यांत नाना प्रकारच्या महत्त्वाकांक्षेला पूर्ण वाव आहे अशा उद्यमव्यवसायांत दंग असलेले सेठ जमनालालजी यजाज स्वागताध्यक्ष निवडण्यांत आले. के. मोरोपंत

दीक्षित बॅरिस्टर हे उपाध्यक्ष असून डॉ. मुंजे यांना जनरल सेक्रेटरी निवडण्यांत आले होतें. याशिवाय जॉइंट सेक्रेटरी, स्वागतमंडळाचे सभासद आणि तेरा पोटकमिट्यांचें त्यांना पूर्ण सहकार्य होतें. नागपूरचें अधिवेशन अपूर्व थाटानें पार पाडावें एवढ्याकरितां सर्वांनीं अंग मोडून परिश्रम केले. आजच्या कांग्रेसनगरमध्यें पाव्हण्यांच्या राहत्या राहुट्या असून धंतोलीपार्कच्या मैदानांत कांग्रेसचा भव्य मंडप उभारण्यांत आला होता. यां अधिवेशनास एकूण १४५८२ प्रतिनिधि व सुमारें तितकेच प्रेक्षक हजर होते. खिलाफतीच्या चळवळीमुळें या कांग्रेसमध्यें १०५० मुसलमान बांधवही हजर होते. १६९ स्त्री प्रतिनिधीही हजर होत्या. शिवाय विलायतेहून कर्नल व मिसेस वेजवुड, मि. बेनस्पूर, मि. हॉलफोर्ड नाईट हेही हजर होते. या अधिवेशनांत जवळपास तीन लाख रुपये खर्च झाले.

ता. २६ । १२ । २० रोजीं १॥ वाजतां दुपारीं अधिवेशनास सुरुवात झाली. स्वागताध्यक्ष सेठ जमनालालजी बजाज यांनी प्रतिनिधी, प्रेक्षक व पाहुण्यांचे मनःपूर्वक स्वागत करून म्हटलें, "गेल्या तीन महिन्याच्या अनुभवानें हें स्पष्ट केलें कीं कलकत्याच्या असहयोगाच्या ठरावाला पाठिंबा देणें अत्यावश्यक आहे." त्यांनीं असहयोगाच्या तात्विक चर्चेवर भर न देतां व्यवहारतः ती कशी यशस्वी होऊं शकते याचें फार मार्मिक विवेचन केलें व शेवटीं स्वतःच्या व्यापारी बांधवांस आपलें वर्षोवर्षीचें राजकारणविषयक औदासीन्य टाकून देऊन देशाच्या वतीनें स्वतःचें बळ लावण्यास विनंती केली. त्यांच्या कळकळीच्या भाषणाचा व्यापारीवर्गावर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.

नागपूरच्या अधिवेशनाचे अध्यक्ष सुप्रसिद्ध सी. विजयराघवचारियर होते. हे जाडे कायदेपंडित असून कांग्रेसच्या बुद्धिप्रधान राजकारणांत मुरलेले होते. त्यांचें भाषण बरेंच विस्तृत असून त्यांत कॉन्स्टिट्युशनॅलिझमला (सनदशीर राजकारणाला) प्राधान्य होतें. तथापि हिंद-

मातेची गांजणूक आणि असह्य छळ, आर्थिक लूटपाट, ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या वचनभंगाची प्रणाली ह्यांमुळें त्यांच्या हृदयाला पडत असलेला पीळ त्यांच्या भाषणांत प्रतिबिंबित झालेला दिसून येतो. पण त्याबरोबरच ब्रिटिश साम्राज्याचा संबंध अजीबात तोडून टाकल्यापासून आपल्या मातृभूमीचें कल्याण व्हावयाचें नाही, उलट अनहित होईल. या सनातनी राजकरणी मनोवृत्तीची पडछाया त्यांच्या संपूर्ण भाषणावर पडली होती.

अशा प्रकारें ते सनातनी राजकारणी असले तरी नेमस्तांच्या प्रभावळींत यशण्याइतपत लेच्यापेच्या वृत्तीचे नव्हते. त्यांना गेल्या ३५ वर्षांतील विनंत्या, अर्जे आणि सरसकटपर ठरावांच्या वार्षिक सर्व्यांच्या युगाचें आता कायमचें उच्चाटन झालें आहे ही गोष्ट पटली होती. असहयोगाच्या कार्यक्रमासंबंधानें त्यांची विचारसरणी अशी होती. "आपल्याला तावडतोब संपूर्ण स्वातंत्र्य मिळावें ह्या दृष्टीनें राज्यकर्त्यांशी सुसंघटित असहयोग करणें ह्यासारखें एखादें शस्त्र हातांत घेण्याच्या आत्यंतिक आवश्यकतेसंबंधानें प्रामाणिकपणें दोन मतें राहूं शकत नाहींत. पण कार्यक्रमाच्या तपशिलाच्या बाबतींत त्यांनीं विस्तृत चर्चा करून आपले मतभेद भाषणांत नमूद केले. त्याचा भर आर्थिक बहिष्काराच्या अस्त्रावर विशेष होता. तसेंच त्यांनीं आपल्या भाषणाला ब्रिटिश हिंदुस्थानच्या राज्यघटनेच्या मसुदा जोडला होता. तथापि त्यांनीं शेवटीं म्हटलें —

"माझी अशी भावना आहे कीं आतां निर्वाणीचा प्रसंग निकराला येऊन पोंहचला; आणि त्या दृष्टीनें नागपूरच्या अधिवेशनाला भारतवर्षाच्या, आणि विशेषकरून राष्ट्रीय महासभेच्या इतिहासांतील हळदीघाट समजणें उचित होईल.

आणि खरोखरच नागपूरची बैठक ही हळदीघाट होती. योगायोग असा कीं कायदेभंगाच्या पहिल्या मोहिमेला झेंडा सत्याग्रहाचें निमित्तानें नागपुरासच तोंड लागलें. तो रोमांचकारी प्रसंग पुढें येणारच आहे. ह्या अधिवेशनात अध्यक्षाच्या भाषणांतील मार्गदर्शनापेक्षा महात्मा

गांधींच्या मार्गदर्शनाकडे लोकांची नजर लागून राहिली होती. अर्थात् गांधीयुगाला प्रत्यक्ष आरंभ नागपूर येथील अधिवेशनांत झाला. राष्ट्राच्या नाडीनाडींतून नवचैतन्याचा संचार याच अधिवेशनापासून झाला. या दृष्टीनें नागपूरचें अधिवेशन अत्यंत परिवर्तनकारी ठरतें.

ह्या अधिवेशनांत विषयनियामक मंडळाच्या बैठकींत ध्येयाच्या (क्रीडच्या) मुद्द्यावर आणि असहयोगाच्या ठरावावर खूप रण माजले. बंगालच्या प्रतिनिधींच्या छावणींत मतभेदामुळें अतिप्रसंग झाला. प्रतिनिधींची उत्कट इच्छा गांधींच्या असहयोगाच्या ठरावाला पूर्ण पाठिंबा मिळावा अशी असल्यामुळें विषयनियामक मंडळींत स्थानिक नेमस्तांचा शिरकाव झालेला नव्हता. तथापि कॉंग्रेसचें क्रीड बदलेपावेतो ते अधिवेशनास हजर राहिले होते; कॉंग्रेसचे सभासदहि होते. प. वा. श्री विपिन बोस आपल्या "जीवनांतील प्रसंगां"त लिहितात कीं कांहीं नागपूरचे टिळकांचे जुने अनुयायी आणि राष्ट्रीय पक्षाचे प्रौढ सभासद नागपूर अधिवेनांत गांधींच्या राजकारणाला हाणून पाडण्यासाठीं स्थानिक नेमस्तांशीं संगनमत करण्याची इच्छा करीत होते व तसा त्यांनी प्रयत्नही केला.

पहिल्या दिवशीं (ता० २७ डिसेंबर) स्वागताध्यक्ष आणि अध्यक्ष ह्यांचीं भाषणें झालीं. दुसऱ्या दिवशीं विषयनियामक मंडळांत मंजूर झालेले ठराव खुल्या अधिवेशनांत मांडण्यांत आले त्यांपैकीं पहिला ठराव **राष्ट्रीय सभेचें ध्येय सर्व प्रकारच्या न्याय्य व शांततेच्या मार्गांनीं हिंदुस्थानच्या लोकांनीं स्वराज्य मिळविणें "** या संबंधीचा होता. ठराव महात्मा गांधींनीं मांडला. आपल्या भाषणात त्यांनीं स्पष्ट खुलासा केला कीं, 'हिंदुस्थानच्या प्रगतीला परिपोषक होईल अशा प्रकारें ब्रिटिश संबंध राहणार असेल तर त्याची मोडतोड करण्याची आम्हाला गरज नाहीं. पण जर तो आमच्या राष्ट्रीय स्वाभिमानाच्या आड येणार असेल तर त्याला झुगारून देणें हें आमचें आद्य कर्तव्य

आहे.' ह्या भाषणाच्या अखेरीस त्यांनीं ठरावाची अंमलबजावणी एकाच वर्षांत करण्याचें धैर्य आणि सामर्थ्य देव आपणांस देवो अशी आशा प्रगट केली. धडाडीचा कार्यक्रम अपूर्व हिंमतीनें, अविश्रांत श्रमानें आणि कमालीच्या स्वार्थत्यागानें एक वर्षभर चालवला तर स्वराज्य खात्रीनें मिळेल असा संदेश त्यांत अंतर्भूत झालेला होता. राष्ट्राच्या डोळ्यांत एक वर्षाची मुदत भरली पण कार्यक्रम पार पाडण्याची शर्त त्यांच्या गळीं उतरावी तशी उतरली नाहीं !!

ह्या ठरावावर कै० लाला लजपतरायांचें विवेचन झालें. तें चालू असतां त्याच्यावर प्रश्नांची सारखी झोड चालली होती. प्रश्न करणारांनां त्यांनीं समर्पक उत्तरें दिलीं. ह्या ठरावाला मुख्य विरोध मौ. महंमदअली व जिनांचा होता. त्यांनीं आपली बाजू निर्भयपणें आणि चतुराईनें पुढें मांडली. त्यांनाहि भाषणांत मधून मधून प्रश्नांचा भडिमार सोसावा लागला. ठरावाला अनेक उपसूचना आल्या आणि कर्नल वेजवुडहि बोलले. त्यांच्या भाषणांत त्यांनीं मि. मॉंटेग्यू साहेब, ते हिंदुस्थानाच्या हितासाठीं झटतात म्हणून त्यांच्या देशबांधवांकडून कसकसे छळले जातात ह्याचें वर्णन करून आपल्या त्यांच्या मित्रत्वाचा निर्वाळा दिला. त्यांनीं अध्यक्षांची विचारसरणी उचलून धरून राष्ट्रीय महासभा आपलें ध्येय बदलीत आहे ह्याबद्दल दिलगिरी नमूद केली.

पुनः ता. ३० डिसेंबर रोजीं बैठक भरली तींत कै. देशबंधु चित्तरंजन दास यांनीं अहिंसात्मक असहयोगाचा ठराव मांडला. त्याला म. गांधींनीं हिंदींत दुजोरा दिला. ह्यावर अनेक रथी महारथींचीं समर्थनपर भाषणें झालीं. मुख्य ठरावाला हजरत मोहानींची एक लहानशी उपसूचना सोडून दिल्यास त्याला दुसरी उपसूचना आली नाहीं किंवा विरोध झाला नाहीं. मात्र पं. मदन मोहन मालवीय आजारी होते त्यांनीं आपला संदेश कळविला कीं, या प्रस्तावाशीं मी सर्वस्वी सहमत नाहीं. उपसूचना मागें घेण्यांत येऊन ठराव मतास टाकतां केवळ दोन प्रतिनि-

धींचीं मतें विरुद्ध पडून अहिंसात्मक असहयोगाचा मूळ ठराव पास झाला. कलकत्ता येथील अधिवेशनांत मंजूर झालेला ठराव देखील मतें नोंदणाऱ्या प्रतिनिधींच्या दोन तृतियांश मतानें पास झालेला होता. हा ठराव राष्ट्रीय महासभेच्या धोरणांत आणि कार्यक्रमांत प्रचंड क्रांति करणारा होता. त्याचा प्रभावही फार मोठा होता. त्याला विशेष ऐतिहासिक महत्त्व असल्यामुळें आणि तो नागपूरच्याच अधिवेशनांत मंजूर झाल्यामुळें संपूर्ण देणें इष्ट होईल.

"ज्याअर्थी राष्ट्रीय महासभेच्या मतें विद्यमान हिंदुस्थान सरकार देशाचा विश्वास गमावून बसलें आहे, आणि

"ज्याअर्थी हिंदुस्थानच्या लोकांचा स्वराज्य स्थापन करण्याचा निर्धार झाला आहे; आणि

"ज्याअर्थी राष्ट्रीय महासभेच्या गेल्या खास अधिवेशनापूर्वी हिंदुस्थानच्या लोकांनीं योजिलेले सर्व उपाय, त्यांचे हक्क आणि विविध स्वातंत्र्य यांना योग्य स्थान मिळण्याच्या बाबतींत आणि त्यांच्या संबंधानें होणारे अनेक आणि दुःखद अन्याय–विशेषेंकरून खिलाफत आणि पंजाब प्रकरणातील अन्याय–दूर करण्याच्या बाबतींत फोल ठरले; त्यास त्याअर्थी आतां ही राष्ट्रीय महासभा कलकत्ता येथील अधिवेशनात मंजूर झालेल्या अहिंसात्मक असहयोगाच्या ठरावाचा पुनः पुरस्कार करते आणि असें जाहीर करिते कीं, अहिंसात्मक असहयोगाची पूर्णत्वेंकरून अथवा त्याच्या एखाद्या किंवा एकाहून अधिक अंगांची अमलबजावणी करावी. त्यांत एका टोंकास सांप्रतच्या सरकारशीं आपखुशीनें संबंध ठेवण्याचें सोडून देण्यापासून तों दुसऱ्या टोंकास सर्व प्रकारचे कर देण्याचा इनकार करण्यापावेतों बाबींचा अंतर्भाव होतो. त्यापैकीं कोणती बाब केव्हां घ्यावयाची हें राष्ट्रीय महासभा अथवा ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी ठरवील. तोंपावेतों देशाची त्यासाठीं तयारी करण्याकरितां परिणामकारी उपाययोजना येणेंप्रमाणें चालू ठेवावी:—

(अ) १६ वर्षांखालच्या वयाच्या विद्यार्थ्यांच्या वाडवडिलांना आणि पालकांना (विद्यार्थ्यांना नव्हे) सरकारी, सरकारच्या मदतीनें चाललेल्या, कोणत्या ना कोणत्या प्रकारचें सरकारी नियंत्रण असलेल्या शाळांतून आपल्या मुलांना काढून घेण्यासाठीं अधिकाधिक प्रयत्न करण्याबद्दल सांगावें; त्याच बरोबर राष्ट्रीय शाळांतून अथवा असल्या शाळांच्या अभावीं आपल्या सामर्थ्यानुसारें असल्याच दुसऱ्या साधनांनीं त्यांच्या शिक्षणाची (training) सोय करावी;

(ब) १६ वर्षांच्या किंवा त्यावरील वयाच्या विद्यार्थ्यांना यत्किंचित् विलंब न करतां किंवा त्यांच्या परिणामाची पर्वा न करतां सरकारी, सरकारच्या मदतीनें चाललेल्या अथवा कोणत्याहि प्रकारचें सरकारी नियंत्रण असलेल्या शिक्षणसंस्थांतून नांव काढून घेण्याबद्दल सांगावें; मात्र ज्या राज्यपद्धतीचा शेवट करण्याचा राष्ट्रानें गंभीरतापूर्वक निश्चय केला आहे त्या राज्यपद्धतीच्या वर्चस्वाखालीं चाललेल्या संस्थांत शिक्षण घेत राहणें हें त्यांना आपल्या सदसद्विवेक बुद्धिविरुद्ध आहे असें वाटत असेल त्याच विद्यार्थ्यांना हें लागू पडवें; पुढें असल्या विद्यार्थ्यांनीं असहयोगाच्या चळवळीच्या बाबतींत कोणत्या ना कोणत्या विशेष कार्यांस लागावें; अथवा राष्ट्रीय संस्थांतून शिक्षण चालू ठेवावें असा सल्ला द्यावा.

(क) सरकारी मान्यता असलेल्या अथवा सरकारच्या मदतीनें चाललेल्या शाळांच्या शिक्षकांना, व्यवस्थापकांना, निक्षेपकांना (trustees), म्युनिसिपालिट्यांना व लोकल बोर्डांना असल्या संस्था राष्ट्रीय करण्याच्या कामीं साहाय्य देण्याबद्दल सांगणें;

(ड) वकिलांना आपला धंदा (प्रॅक्टिस) मुलतवी (सस्पेंड) करण्याबद्दल अधिकोत्तर प्रयत्न करण्याबद्दल व राष्ट्रसेवेकडे आपलें लक्ष लावण्याबद्दल सांगणें; यांत, अशिलांनीं आणि वकिलीच्या धंद्यातील त्यांच्या बांधवांनीं कोर्टांना बहिष्कार घालणें आणि आपल्या वादांचा खासगी पंचायतींच्या द्वारें निकाल करून घेणें याचाही समावेश होतो.

(ई) हिन्दुस्थान आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण करावा ह्यासाठीं व्यापारी आणि रोजगारी ह्यांना परदेशी व्यापारीसंबंधाला हळु-हळू बहिष्कार घालण्याबद्दल सांगावें; हातानें सूत कांतणें आणि हात मागांवर विणकरी करणें आणि त्यासाठीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें नेमलेल्या तज्ञांच्या मंडळाकडून योजिलेली व आंखलेली आर्थिक बहिष्काराची योजना मूर्त स्वरूपांत आणणें;

(फ) आणि सर्वसाधारणतः असहयोगाचा कार्यक्रम यशस्वी व्हावा ह्यासाठीं आत्मयज्ञाची आत्यंतिक अवश्यकता असल्यामुळें, देशांतील हरएक वर्गाला, हरएक पुरुषाला आणि स्त्रीला राष्ट्रीय आंदोलनाला शक्य तोंवर अधिक स्वार्थत्याग करून हातभार लावण्यास सांगणें;

(ग) असहयोगाच्या चळवळीचें पाऊल जोरानें पुढें पडत जावें ह्यासाठीं प्रत्येक खेड्यांत किंवा खेड्यांच्या गटांत कमिट्या स्थापन कराव्या; अशा कमिट्यांच्या प्रांतीय मध्यवर्ती संस्था प्रत्येक प्रांताच्या मुख्य शहराच्या ठिकाणीं असाव्यात;

(ह) इंडियन नॅशनल सर्व्हिस ह्या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या सेवासंस्थेकरितां राष्ट्रीय कार्यकर्त्यांच्या चमूची संघटना करणें.

(च) वर उल्लेखिलेल्या नॅशनल सर्व्हिसची सांपत्तिक तरतूद करण्याकरितां व सर्वसाधारणपणें असहयोगाच्या चळवळीकरितां ऑल इंडिया टिळक मेमोरिअल स्वराज्यफंड नांवाचा राष्ट्रीय निधि उभारण्यासाठीं कसून खटपट करणें.

ही राष्ट्रीय सभा राष्ट्रानें आतापावेतों असहयोगाचा,—विशेषेंकरून मतदारांकडून झालेल्या कायदेमंडळाच्या बहिष्काराच्या बाबतीं-तला—कार्यक्रम पार करून दाखविण्याच्या बाबतींत जी प्रगति केली

त्याबद्दल त्याचें अभिनंदन करिते; आणि ज्या परिस्थितींत ही नवीन कायदेमंडळें अस्तित्वांत आणलीं गेलीं त्या परिस्थितींत तीं देशाच्या प्रतिनिधित्वाची निदर्शक नव्हतीं असें ही राष्ट्रीय सभा हक्कानें म्हणूं शकते; आणि ती अशा विश्वास बाळगते कीं मतदारांच्या अत्यंत मोठ्या संख्येनें मतदानासाठीं जाण्याचें जाणून बुजून टाळलें असतांनादेखील ज्यांनीं आपल्याला निवडून येऊं दिलें ते कायदेमंडळाचे सभासद कौन्सिलांतील आपापल्या जागाचे राजीनामे देतील; आणि लोकसत्तेच्या तत्त्वाला प्रत्यक्ष गचांडी देऊन आपापल्या मतदार मंडळाच्या जाहीर इच्छेला न जुमानता जर ते आपल्या जागांना चिकटून राहिले तर मतदारांनीं असल्या आमदारांकडून (Councillors) कोणत्याही प्रकारच्या राजकीय सेवेची मागणी करण्याचें प्रयत्नपूर्वक टाळावें.

ही राष्ट्रीय सभा पोलीस, लष्करी शिपाई आणि जनता ह्यांच्यांतील वाढता सलोखा जाणून आहे; आणि ती अशी आशा बाळगून आहे कीं पोलीस आणि लष्करी शिपाई आपल्या अधिकाऱ्यांचे हुकूम पाळताना आपलें ब्रीद आणि आपली मातृभूमि ह्यांना गौण लेखण्याचें नाकारतील आणि लोकांशीं सभ्यपणाची आणि विवेकाची वागणूक ठेवून त्यांच्यासंबंधानें जी लोकांची कागाळी आहे कीं ते आपल्याच लोकांच्या मनोवृत्ति आणि भावना ह्याबद्दल यत्किंचितही दरकार बाळगीत नाहींत हा आरोप धुवून काढतील.

तसेंच राष्ट्रीय महासभा सरकारी नोकरींत असलेल्या सर्व लोकांना अशी विनंती करते कीं, आपापल्या जागाचे राजीनामे देण्याबद्दल राष्ट्राची त्यांना पुकार होईपावेतो त्यांनीं आपल्या लोकाशीं ठेवावयाच्या वागणुकींत काटेकोर प्रामाणिकपणा व अधिक सौजन्य आणावें आणि अशा प्रकारें राष्ट्रकार्याला हातभार लावावा आणि लोकांच्या सर्व सभांना, त्यांत कोणत्याही प्रकारचा सक्रिय भाग न घेतां, उघड उघड हजर

रहावें. तसेंच विशेषेंकरून राष्ट्रीय चळवळीला उदंड उदंड आर्थिक सहाय्य देऊन मदत करावी.

ही राष्ट्रीय महासभा, असहयोगाच्या ठरावांत अहिंसेचा अंतर्भाव होत असल्यामुळें अहिंसेवर विशेष जोर देऊं इच्छिते; तसेंच ती, ज्याप्रमाणें सरकारच्या बाबतींत लोकांनीं वाणींत आणि क्रियेंत अहिंसेचें पालन करणें अत्यंत अवश्यक आहे त्याचप्रमाणें लोकांनीं आपापल्या परस्पर व्यवहारांतही तिचें पालन करणें अगत्याचें आहे, ही गोष्ट लोकांच्या निदर्शनास आणते. या महासभेचें असें मत आहे कीं, हिंसेची वृत्ति ही लोकसत्तेच्या खऱ्या खऱ्या भावनेच्या वाढीच्या आड येणारी आहे एवढेंच नव्हें तर ती असहयोगाने ( जरुरीप्रमाणें ) गाठावयाच्या इतर टप्प्यांच्या बाबतींतही खरोखर पिछेहाट करणारी आहे.

सरते शेवटीं, खिलाफत व पंजाब संबंधीं केल्या गेलेल्या अन्यायाचें परिमार्जन केलें जावें म्हणून आणि एक वर्षांत स्वराज्यसिद्धि व्हावी म्हणून ही राष्ट्रीय महासभा तिच्याशीं संलग्न असलेल्या अथवा नसलेल्या सर्व संस्थाना सरकारशीं करावयाच्या व्यवहारात अहिंसात्मक असहयोगाचें आचरण वाढविण्याकडे आपलें अवधानसर्वस्व लावावें असें आग्रहपूर्वक सांगते; तसेंच, ज्याअर्थी असहयोगाचें आंदोलन हें लोकांचें परस्पराशीं संपूर्ण सहकार्य झाल्यानेंच यशस्वी होऊं शकतें, त्याअर्थी ही राष्ट्रीय महासभा सार्वजनिक संस्थाना त्यांनी हिन्दु-मुसलमानांचें ऐक्य वाढवावें आणि या महासभेच्या हिंदु प्रतिनिधींनीं, प्रमुख हिंदूंना भेटून ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्या दरम्यान जेथें जेथें झगडे चालू असतील ते झगडे मिटवावें, आणि हिन्दु धर्माला लागलेला अस्पृश्यतेचा कलंक धुवून टाकण्यासाठीं विशेष प्रयत्न करावे, असें सांगते; आणि दलित वर्गाशीं होत असलेल्या व्यवहाराच्या बाबतींत हिन्दुधर्मांत सुधारणा करण्यास धर्माचार्यांनीं सहाय्य द्यावें असा त्यांना आदरपूर्वक आग्रह करिते."

येथें एवढें नमूद करणें अवश्य आहे कीं, जरी हा महत्वाचा प्रस्ताव मंजूर करून घेण्याचे बाबतींत कलकत्त्यास तीव्र मतभेद असणाऱ्या दे. भ. चित्तरंजन दास, बिपिनचंद्र पाल आदिकरून बऱ्याच प्रमुख विरोधकांना म. गांधींनीं अनुकूल करून घेतलें असलें तरी महाराष्ट्रांतील कांहीं प्रमुख प्रतिनिधी आणि वऱ्हाड मध्यप्रांतांतील बरीच ठळक मंडळी वस्तुतः या ठरावाला मनापासून अनुकूल नव्हती. खास नागपूर प्रांतांतील डॉ. मुंजे प्रभृति विरोधकांना आपण आमंत्रिलेल्या अधिवेशनांत आपण अधिवेशनाच्या मंडपांत विरोधाचा झेंडा उघड रोवणें चांगलें दिसणार नाहीं म्हणून त्यांनीं उघड विरोध केला नाहीं. परंतु त्यांचीही या कार्यक्रमाला पूर्ण अनुमति नव्हती.

हा मुख्य ठराव मंजूर झाल्यावर तत्पूर्वींचा ध्येयासंबंधींचा ठराव थोड्या चर्चेनंतर आणि कांहीं उपसूचना मागें घेण्यांत आल्यावर मतास टाकण्यांत आला. फक्त सिंध प्रांतांतील एक प्रतिनिधी व संयुक्त प्रांतांतील एक प्रतिनिधी सोडून बाकीच्या एकमतानें मंजूर झाला

स्वावलंबी व्हावें, ही जागरूकता काँग्रेसला येथें आली. 'इंडिया' पत्र आणि ब्रिटिश काँग्रेस कमिटी ह्यांच्या खर्चाची तरतूद करण्याकरिता सालोसाद राष्ट्रीय महासभेच्या नाकीं नऊ येत असत. हा प्रस्ताव मंजूर झाला त्या वेळीहि या दोन्ही संस्थाकडून झालेला कर्जाचा बोजा राष्ट्रीय महासभेच्या शिरावर होताच.

आणखी एक महत्वाचा ठराव इंग्लंडच्या बादशहाचे चुलते आणि बरींच वर्षे हिन्दुस्थानच्या सरसेनापतित्वाचीं वस्त्रे धारण करणारे ड्यूक ऑफ कनॉट यांच्या हिन्दुस्थानातील दौऱ्याची जी घोषणा झालेली होती त्या निमित्त होणाऱ्या हिन्दुस्थानातील नानाविध समारंभ पासून असहयोगाच्या प्रस्तावाला अनुसरून लोकांना अलिप्त रहाण्याबद्दल होता. हा ठराव या प्रांतांत फार कटकपणें पाळण्यात आला.

आठव्या प्रस्तावात ट्रेड यूनियन संस्था व कामगार ( Workers ) यांच्या संबंधानें सहानुभूत प्रगट करण्यात आली. नवव्या ठरावांत विशेषेंकरून हिन्दी मजुरांची स्थिति सुधारण्यासाठीं त्यांची संघटना करण्याबाबत आणि त्यासाठीं कमिटीनें कसून प्रयत्न करण्यासाठीं एक कमिटी नेमण्याबद्दल ऑल् इंडिया काँग्रेस कमिटीला अधिकार देण्यात आला होता. दहाव्या ठरावांत सरकारच्या लॅंड अक्विझिशनच्या धोरणाबाबत नापसंती व्यक्त करण्यांत आली होती. ठराव न. चिं. केळकरानीं मांडला होता. ठरावाच्या अखेरीस असें म्हटलेलें आहे कीं, ह्यामुळें सरकारविरुद्ध असहयोग करण्यासाठीं अधिकोत्तर वाव मिळतो.

तेरावा ठराव पंजाबच्या पं. रामभुजदत्त चौधरींनीं मांडला. त्यात ईशर कमिटीमुळें हिंदुस्थानची पराधीनता आणि हतवीर्यता वाढणार आहे असें नमूद करण्यात आलें होतें.

नंतरच्या ठरावांत म. गांधींनीं राष्ट्रीय महासभेची नवी घटना मांडली. तींत काँग्रेसला आणि ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला सुटसुटीत-

पणा आणला गेला. राष्ट्रीय महासभेपासून तों स्वागतमंडळ इत्यादि पात्रेतों सात घटक करण्यांत आले; भाषावार प्रांतरचना करण्यांत आली; ब्रह्मदेशासह राष्ट्रीय सभेच्या कारभारासाठीं २१ प्रांत करण्यांत आले. प्रतिनिधींची संख्या साधारणपणें ५० हजारांना एक याप्रमाणें नियुक्त करण्यांत आली; प्रतिनिधींची फी १० रुपये निश्चित केली; सर्व माजी अध्यक्ष, जनरल सेक्रेटरीज व खजीनदार यांच्या व्यतिरिक्त ऑल इंडिया कांग्रेस कमिटीच्या सभासदांची संख्या ३६० निश्चित करण्यांत आली व ऑल इंडिया कांग्रेस कमिटी आणि वर्किंग कमिटी ह्यांच्या अधिकाराची मर्यादा ठरविण्यात आली; पूर्वी अधिवेशनाच्या वेळीं प्रांतवारीनें विषय-नियामक मंडळाच्या सभासदांची निवडणूक करून देण्यांत येई त्याजागीं ह्या घटनेप्रमाणें ऑल इंडिया कांग्रेस कमिटी हीच अधिवेशनाचे वेळीं नियामकमंडळ होईल असें ठरविण्यांत आलें. घटनेंत ज्या बाबींचा अंतर्भाव व्हावयाचा राहिला असेल त्या बाबतींत मूळ घटनेला अविरोधी असे नियम करण्याचा ऑल इंडियाकाँग्रेस कमेटीला अधिकार देण्यात आला.

हा ठराव महात्मा गांधींनीं हिंदींत भाषण करून मांडला. प्रतिनिधींची संख्या व त्यांची निवडणूक ह्या संबंधाचें कलम ८ सोडून बाकीची घटना अगदीं एकमतानें पास झाली. कलम ८ वर प्रातनिहाय मतें घेण्यात आलीं. तींत बंगालचीं फक्त १० मतें व इतर पांच प्रांतांचीं मिळून ७ मतें विरुद्ध पडलीं.

एकंदर ठराव २४ झाले. महात्मा गांधींनीं अखिल भारतीय टिळक स्मारक स्वराज्य निधीसंबंधानें प्रतिनिधींना हिन्दींत भाषण करून कळीवळवची विनंति केली. आमच्या जागीं प्रोफेसर राममूर्तींनीं १००१ रुपयांची वर्गणी कबूल केली. कामाच्या अतिशय दगदगीमुळें राष्ट्रीय महासभेचें अधिवेशन चालू असतांना स्वागताध्यक्ष जमनालाल बजाज

आजारी पडल्यामुळें बिछान्याला खिळून होते. तेथून त्यांनीं १,००,००० रुपयांची देणगी म० गांधींच्या स्वाधीन करण्याबद्दल आपला मनोदय कळविला. ह्या पैशांतून जे आपली वकिली तहकूब करतील व आपला सर्व वेळ राष्ट्रसेवेला लावतील अशांपैकीं ज्यांना आर्थिक सहाय्याची जरूर पडेल त्यांची तरतूद करावयाचें त्यांनीं ठरविलें होतें. त्यांनीं महात्मा गांधींना असेंही आश्वासन दिलें कीं, ह्या कार्यासाठीं अधिक निधी जमविण्यासाठीं आपण खटपट करूं. म० गांधींच्या मागणीप्रमाणें पुढें हा स्मारक फंड एक कोटीपावेतों कसा जमला वगैरे बाबी राष्ट्रीय महासभेच्या अखिल भारतीय इतिहासाचा विषय आहे. तथापि एक कोटीची मजल मारलेल्या राष्ट्रीय निधीचा यशोमय आरंभ नागपूरच्याच अधिवेशनांत करण्यात आला. वरील देणग्यांशिवाय अधिवेशनानंतर म० गांधींकडे अनेक देणग्या येऊं लागल्या.

अशा प्रकारें नागपूरचें रा० महासभेचें अधिवेशन पार पडलें. वरील वृत्तांतावरून हें अधिवेशन कसें परिवर्तनशील होतें व इतरही अनेक दृष्टींनीं कसें महत्त्वाचें होतें हें दिसून येईल.

ह्या अधिवेशनाच्या मोसमांत येथें अखिल भारतीय विद्यार्थ्यांची परिषद लाला लजपतरायांच्या अध्यक्षतेखालीं ता. २५ डिसेंबर रोजीं भरली होती. तींत विद्यार्थ्यांनीं जे ठराव केले त्यापैकीं एकांत "पूर्ण विचारा-अंतीं सरकारी व सरकारच्या मदतीनें चाललेल्या विद्यालयांवर (कॉलेजेस) तावडतोब आणि विनशर्त बहिष्कार घालण्याला मनःपूर्वक पाठिंबा देऊन हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांना त्याप्रमाणें वागण्याबद्दल सल्ला दिला" ता. ३० व ३१ डिसेंबर १९२० रोजीं नागपूर मुक्कामींच ऑल इंडिया मुस्लिम लीगचें तेरावें अधिवेशन डॉ. अनसारींच्या अध्यक्षतेखालीं भरलें. तें राष्ट्रीय महासभेच्या मंडपांतच भरलें होतें. खिलाफतीच्या बाबतींत ब्रिटिशांनीं केलेल्या वचनभंगामुळें हिंदुस्थानांतील मुसलमान बेदिल

मक्त घेण्यास पुढें येईनात. दारूचा खप कमी होऊन अबकारीखात्याचें उत्पन्न कमी झालें. जानेवारी महिन्यात प्रांतांतील निरनिराळ्या भागांत प्रभावशाली परिषदा झाल्या. व प्रांतामध्यें चळवळीचीं पाळेमुळे पसरू लागलीं. स्वयंसेवकांचीं पथकें निर्माण होऊं लागली व त्यांना शिक्षण देण्यासाठीं १२ फेब्रुवारीला डॉ० परांजपे यांच्या नेतृत्वाखालीं प्राव्हिन्शिअल व्हॉलंटिअर कोअर स्थापन झालें

फेब्रुआरी महिन्यापासून सरकारनें दडपशाही सुरू केली. नागपूरचे दलाल, विक्रीदार आणि खरीददार यांनीं गाडीमागें एक आणा निधी गोळा करावयास सुरुवात केली. नागपूरच्या डेप्युटि कमिशनरला हें सहन न होऊन त्यानीं वरील मंडळीची कानउघाडणी केली पण परिणाम झाला नाहीं. शाळा बहिष्कारही नीव्र होऊं लागला व वकीलही पटापट वकिली सोडू लागले जागजागी लवाद कोर्टें स्थापन झालीं. मुदतीबाहेर दावे गेल्यामुळें अनेक सावकारांचें फार नुकसान झालें पण ते त्यांनीं आनंदानें सोसलें.

यामुळें सरकारी धोरणांत कठोरपणा येऊन फेब्रुवारीच्या तिसऱ्या आठवड्यांत दारूबंदी चळवळीमुळें डॉ० चोळकरांवर १२४ (अ) खालीं खटला भरण्यात आला. गांवांत हरताळ पडला. लवकरच अबकारी लिलांव व्हावयाचे होते. चोळकरांवरील खटल्यामुळें लोकमत प्रक्षुब्ध होतें. कचेरीच्या आवारांत अतोनात गर्दी जमली. डॉ० मुंजे, वें, अभ्यंकर, श्री. अळेकर वगैरे मंडळी लोकांना थोपवून धरीत होती तरी पोलीसानीं थोड्या उतावळेपणानेच लोकांवर बागनेटी, दंडुके यांचा हल्ला केला. आर्मस्ट्रांग साहेबांनीं तर गोळीबाराचीही धमकी दिली पण सुदैवानें तसा प्रसंग आला नाहीं. कांहीं लोकांना जखमा झाल्या.

२६ फेब्रुआरी रोजीं डॉ० परांजप्यांवर १४४ कलमान्वयें नोटीस बजावण्यांत आली. हा दडपशाहीचा प्रकार जसजसा वाढूं लागला तसे लोकही अधिक नाराज होऊं लागले. लोक क्वचित् अनावर होत व दारूच्या दुकानांत शिरून नासधूस करू लागले. कांहीं पोलीसवाले व साहेबांनाही उपसर्ग होऊं लागला. १४४ कलम लावण्यांत आलें. पण लोकांनीं घाबरून न जातां त्यावर तोड काढली. त्यांनीं शहरसीमेबाहेर टोलेजंग सभा भरविली चळवळीचा जोर

वाढू लागला. डॉ. चोळकरांच्या मुकदम्यांत बॅ. अभ्यंकरांनीं फिर्यादीपक्षाच्या पुराव्याची आपल्या फेरतपासणीनें इमेलेंडी उडवून दिली.

मार्च महिन्यांत नागपूर पंचायत मंडळस्थापन झालें. श्री नारायणराव वैद्य या मंडळाचे चिटणीस होते. दुसऱ्या आठवड्यांत नागपूर जिल्ह्यांतील वेळा येथे १४४ कलम लावण्यांत आलें व जादा पोलीस बसविले. १७ मार्चला महात्मा गांधी आर्वी ( जि. वर्धा ) ला गेले व त्यांचें अपूर्व स्वागत झालें. असहयोगाश्रमाचे संचालक म. भगवानदीनजी यांना सिवनीच्या भाषणाबद्दल पकडून १॥ वर्षाची स. म. ची शिक्षा देण्यांत आली. वकिली, मॅजिस्ट्रेटी शाळा-कॉलेजें यांवरील बहिष्कार बळावत होते. दारूच्या पिकेटिंगच्या बाबतींत सरकार व लोक यांतील नागपुरांतील तेढ श्री. उदारामजी पहेलवानांच्या गिरफतारीच्या वेळीं कळसास पोचली. सरकार चिडखोर बनलें व अशा मनोवृत्तीतच २७ मार्च १९२१ रोजीं नागपूर शहरांत गोळीबार करण्यांत आला. दहाजण ठार होऊन केक जखमी झाले. मृतांची मोठी मिरवणूक निघाली होती. या प्रकारामुळें लोकमत विशेषच प्रक्षुब्ध झालें व दारूच्या बंदीला जोर आला. लोक दारूचे ठेके घेण्यास धजेनात व मालगुजार आपल्या आबादानींत दुकानास जागा देण्यास कबूल होईनात. वर्धा रेल्वे स्टेशनवर तर एकदां दारूचे पिंप वाहून नेण्यास हमाल अगर बैलगाड्याही मिळूं शकल्या नाहींत.

नागपूर गोळीबारामधील सरकारच्या अन्यायावर सारवण घालण्यासाठीं ढोबळे कमिशन नेमलें पण त्याच्यावर लोकांनीं बहिष्कार घातला परंतु खरा प्रकार उजेडांत आणण्याकरितां प्रां. कां. क. नें श्री. बाप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखालीं सहा निष्णात वकीलांची एक चौकशी कमिटी नेमली. (२८-४-२१) ढोबळे कमिटीनें मे महिना अखेर आपला रिपोर्ट प्रसिद्ध करून दोघांचें खापर लोकांच्या माथीं फोडलें हें अपेक्षितच होतें.

३१ मार्च व १ एप्रिल रोजीं बेझवाड्यास ऑ. इ. कां. क. ची महत्वाची बैठक झाली. या बैठकींतील पहिल्या ठरावान्वयें ३० जून २१ पावेतों एक कोटीचा टि. स्व. फंड जमविणें, एक कोट सभासद करणें व वीस लाख चरखे चालू करणें या कार्यक्रमावर विशेष जोर देण्यांत आला होता. बहिष्काराचीं इतर कलमें कायमच

होती. आपल्या प्रांतानें या ठरावाच्या अंमलबजावणीची पूर्ण कोशीस केली. टि. स्व. फंडाला आपल्या प्रांतानें एकंदर १, ९२, ६९४ रु. ७ आ. ९ पै इतकी रकम दिली पैकीं सेठ जमनालालजींचे एकट्याचे एक लाख रुपये होते. सेठजींनीं अखिल हिंदुस्थानांत टि. स्व. फं. करितां प्रांतोप्रांतीं दौरा केला.

या सुमारास प्रांतांतील प्रमुख कार्यकर्त्यांवर व स्वयंसेवकांवर सरकारनें खटले भरले. प. अर्जुनलाल शेठींना १॥ वर्षाची कैद झाली. प. सुंदरलाल यांना खरागणा ( त. आर्वी ) येथील भाषणाबद्दल १ व स. म ची शिक्षा झाली. श्री. नारायणराव ददे ( खापा ) श्री. मारोतराव पोहरकर ( काटोल ) कर्मवीर पाठव ( भंडारा ) यांजवरही खटले करण्यांत आले.

जून महिन्यांत डॅ० अभ्यंकरांच्या खंबीर व निर्भय वर्तनामुळें डॉ० चोळकर सुटले. वर्धा येथें १९ जून रोजीं जिल्हा दरबार भरविण्याचा सरकारनें प्रयत्न केला पण त्याला सामान्य जनतेनें यत्किंचितही पाठिंबा दिला नाहीं. या महिन्यांत खाप्याचे श्री. ना. श्री. हरकरे यांवर १०८ कलमा, खालीं व सात स्वयंसेवकांवर ४५२ कलमान्वयें खटला झाला. या महिनाअखेर बेझवाड्याच्या ठरावाप्रमाणें किती कार्य झालें याचा तपास करतां आपल्या प्रांतात निदान दहा हजार चरखे चालू असून सभासदही दहा ते पंधरा हजार झालें असावेत असा अंदाज आहे. ठरलेल्या कार्यक्रमाच्या दृष्टीनें विचार करतां आपला प्रांत इतर प्रांताच्या बरोबरीत राहिला असें म्हणावयास हरकत नाहीं

वर्तमानपत्रावर सरकारची प्रथमपासूनच कडक नजर होती तिला अनुसरून वर्धा येथील राजस्थान केसरीचे संपादक पं० सत्यदेव विद्यालंकार यांजवर खटला करण्यांत आला. त्याचप्रमाणें असहयोगी मालगुजारांवरही सरकारची वक्रदृष्टी होती; त्याला अनुसरून घोटीवाड्याचे मालगुजार मि. समीउल्लाखान यांचेवर १०८ कलमाखालीं कारवाई करण्यांत आली होती.

२६ जुलैला नागपुरांत परदेशी कापडाची एक प्रचंड होळी करण्यांत आली. खेडेगांवींही अशा होळ्या पेटविण्यांत आल्या. प्रांतांतील कैं.कडों व्यापाऱ्यांनीं

परदेशी माल न मागविण्याच्या, शिलकीतील परदेशी माल न विकण्याच्या त्याच प्रमाणें अनेक लोकांनीं स्वदेशी कापड वापरण्याच्या शपथा घेतल्या. या महिन्यांत असहयोगाश्रमाचे पं० राधा मोहन गोकुलजी यांचेवर १०८ कलमान्वयें खटला भरण्यांत आला. वेळा (त. उमरेड) येथील बऱ्याच मंडळीवर १४७ व इतर कलमाखालीं मुकदमे भरण्यांत आले. अंजनगांव सर्कल मधील कार्यकर्त्यांवर १०७ कलमाची तंबी देण्यांत आली. वकीली सोडणाऱ्या वकील मंडळींवर वचक बसविण्याकरितां ज्यु० कमिश्नरांनीं वकीलांकरितां सनदेचा अर्ज करतांना स्वतः असहयोगी आहोंत कीं नाहीं याचा खुलासा करण्याबद्दल हुकुम सोडला. या काळांत स्थानिक संस्थांनीं बराच स्वतंत्रपणा दाखविला. वर्धा डि० कौ० ने टि. स्व. फंडाला दोन हजार रुपये देण्याचा आणि जुन्या टौनहॉलला टिळक भवन नांव देण्याचा ठराव केला.

या सुमारास धारवाड गोळीबारासंबंधी कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें एक चौकशी कमिशन नेमलें त्यावर आपल्या प्रांतातल्या श्री. भवानीशंकर नियोगींना घेण्यांत आलें होतें. आगष्ट महिन्यांतच ज्यु. कमिश्नरांनीं वकिलांवर नोटिसा बजावून वकिलांकडून "तुम्हीं वकिली सोडली आहे काय" याचें स्पष्ट उत्तर मागण्याचा प्रयत्न केला. कांहीं या चौकशीमुळें बिचकले पण पुष्कळांनीं हिम्मत सोडली नाहीं.

श्री. हेलेकर वकील त्यावेळीं यंग पेट्रिअडचे उपसंपादक होते. ते गांधी टोपी घालून एकदां कौंसिलांत रिपोर्टिंगला गेले असतां त्यांना कौंसिल सेक्रेटरी मि. मिचेल यांनीं सभ्य पोषाख करून येण्याबद्दल सांगितलें. भंडाऱ्याचे श्री. टेंभेकर, श्री. अतेरकर व श्री. आंबोकर यांनीं वकिली सोडली.

वर वर्धा डि. कौं. नें उदाहरण आलें आहेच. सोबतच वर्धा लोकल बोर्डानें दारूपिकेटिंगकरितां तीन हजार रुपये मंजूर केले. काटोल म्यु. पा. नें आपल्या हद्दींत दारू दुकानांना जागा दिली नाहीं. खास नागपुरांत न. कां. क. च्या नेतृत्वाखालीं "दारू दुकानें असावें कीं नाहीं" या प्रश्नावर निरनिराळ्या मोहोल्यांतून रेफरेंडम घेण्यांत आलें. पैकीं एका मोहोल्यांत २३२२ लोकांनीं दारू दुकान नको असें मत देऊन दुकान असावें याबद्दल फक्त पांचच मतें पडलीं. अफूखेरीज दारू व इतर मादक पदार्थ विकणें बंद करावें असा काटोल लो. बो. नें

होतीं. आपल्या प्रांतानें या ठरावाच्या अंमलबजावणीची पूर्ण कोशीस केली. टि. स्व. फंडाला आपल्या प्रांतानें एकंदर १, ९३, ६९४ रु. ७ आ. ९ इतकी रकम दिली पैकीं सेठ जमनालालजींचे एकट्याचे एक लाख रुपये होते सेठजींनीं अखिल हिंदुस्थानांत टि. स्व. फ. करितां प्रांतोप्रांतीं दौरा केला.

या सुमारास प्रांतांतील प्रमुख कार्यकर्त्यांवर व स्वयंसेवकांवर सरकारनें खटले भरले. पं. अर्जुनलाल शेठींना १॥ वर्षाची कैद झाली. पं. सुंदरलाल यांना खरांगणा ( त. आर्वी ) येथील भाषणाबद्दल १ व स. म ची शिक्षा झाली. श्री. नारायणराव ददे ( खापा ) श्री. मारोतराव पोहरकर ( काटोल ) कर्मवीर पाठक ( भंडारा ) यांजवरही खटले करण्यांत आले.

जून महिन्यांत बॅ० अभ्यंकरांच्या खंबीर व निर्भय बचावामुळें डॉ० चोळकर सुटले. वर्धा येथें १९ जून रोजीं जिल्हा दरबार भरविण्याचा सरकारनें प्रयत्न केला पण त्याला सामान्य जनतेनें यत्किंचित्‌ही पाठिंबा दिला नाहीं. या महिन्यांत खाप्याचे श्री. ना. श्री. हरकरे यांवर १०८ कलमा, खालीं व सात स्वयंसेवकांवर ४५२ कलमान्वये खटला झाला. या महिनाअखेर बेझवाड्याच्या ठरावाप्रमाणें किती कार्य झालें याचा तपास करतां आपल्या प्रांतांत निदान दहा हजार चरखे चालू असून सभासदही दहा ते पंधरा हजार झाले असावेत असा अंदाज आहे. ठरलेल्या कार्यक्रमाच्या दृष्टीनें विचार करतां आपला प्रांत इतर प्रांतांच्या बरोबरींत राहिला असें म्हणावयास हरकत नाहीं

वर्तमानपत्रांवर सरकारची प्रथमपासूनच कडक नजर होती तिला अनुसरून वर्धा येथील राजस्थान केसरीचे संपादक पं० सत्यदेव विद्यालंकार यांजवर खटला करण्यांत आला. त्याचप्रमाणें असहयोगी मालगुजारांवरही सरकारची वक्रदृष्टी होती; त्याला अनुसरून घोटीवाड्याचे मालगुजार मि. सर्माउल्लाखान यांचेवर १०८ कलमाखालीं कारवाई करण्यांत आली होती.

२६ जुलैला नागपुरांत परदेशी कापडाची एक प्रचंड होळी करण्यांत आली. खेडोपाडींही अशा होळ्या पेटविण्यांत आल्या. प्रांतांतील कैकडों व्यापाऱ्यां

परदेशी माल न मागविण्याच्या, शिलकींतील परदेशी माल न विकण्याच्या त्याच प्रमाणें अनेक लोकांनीं स्वदेशी कापड वापरण्याच्या शपथा घेतल्या. या महिन्यांत असहयोगाश्रमाचे पं० राधा मोहन गोकुलजी यांचेवर १०८ कलमान्वयें खटला भरण्यांत आला. बेला ( ता. उमरेड ) येथील बऱ्याच मंडळीवर १४७ व इतर कलमाखालीं मुकद्दमे भरण्यांत आले. अंजनगांव सर्कल मधील कार्यकर्त्यांवर १०७ कलमाची तंबी देण्यांत आली. वकीली सोडणाऱ्या वकील मंडळीवर वचक बसविण्याकरितां ज्यु० कमिशनरांनीं वकीलांकरितां सनदेचा अर्ज करतांना स्वतः असहयोगी आहोंत कीं नाहीं याचा खुलासा करण्याबद्दल हुकुम सोडला. या काळांत स्थानिक संस्थांनीं बराच स्वतंत्रपणा दाखविला. वर्धा डि० कौ० ने टि. स्व. फंडाला दोन हजार रुपये देण्याचा आणि जुन्या टौनहॉलला टिळक भवन नांव देण्याचा ठराव केला.

या सुमारास धारवाड गोळीबारासंबंधीं कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें एक चौकशी कमिशन नेमलें त्यावर आपल्या प्रांतातल्या श्री. भवानीशंकर नियोगींना घेण्यांत आलें होतें. आगष्ट महिन्यांतच ज्यु. कमिशरांनीं वकिलांवर नोटिसा बजावून वकिलांकडून "तुम्हीं वकिली सोडली आहे काय " याचें स्पष्ट उत्तर मागण्याचा प्रयत्न केला. कांहीं या चौकशीमुळें विचकले पण पुष्कळांनीं हिम्मत सोडली नाहीं.

श्री. हेडेकर वकील त्यावेळीं यंग येट्रिअटचे उपसंपादक होते. ते गांधी टोपी घालून एकदां कौंसिलांत रिपोर्टिंगला गेले असतां त्यांना कौंसिल सेक्रेटरी मि. मिचेल यांनीं सभ्य पोषाख करून येण्याबद्दल सांगितलें. भंडाऱ्याचे श्री. टेंभेकर, श्री. असेरकर व श्री. आंबोकर यांनीं वकिली सोडली.

वर वर्धा डि. कौ. चें उदाहरण आलें आहेच. सोबतच वर्धा लोकल बोर्डानें दारूपिकेटिंगकरितां तीन हजार रुपये मंजूर केले. काटोल म्यु. पा. नें आपल्या हद्दींत दारू दुकानांना जागा दिली नाहीं. खास नागपुरांत न. कां. क. च्या नेतृत्वाखालीं " दारू दुकान असावें कीं नाहीं " या प्रश्नावर निरनिराळ्या मोहोल्यांतून रेफरेंडम घेण्यांत आलें. पैकीं एका मोहोल्यांत २३३२ लोकांनीं दारू दुकान नको असें मत देऊन दुकान असावें याबद्दल फक्त पांचच मतें पडलीं. अफूखेरीज दारू व इतर मादक पदार्थ विकणें बंद करावें असा काटोल लो. बो. नें

माईना दारू पाजण्याची प्रथा होती. ही रूढि या जातिपंचायतींनीं मोडण्याचें ठरविलें व या चळवळीमुळें त्या जातींमधील दारूचें व्यसन बरेंच कमी झालें. नागपुरास मराठ्यांची राष्ट्रीय परिषद भरून तींत कांग्रेसला पाठिंबा देण्याचा ठराव एकमतानें पास झाला. सोबतच मराठा विद्यार्थीपरिषद भरून तींत शाळा बहिष्काराला मान्यता देण्यांत आली. क्षत्रिय लोधीसमाज व क्षत्रिय माळीसमाजांनीही आपापल्या परिषदा भरवून राष्ट्रीय विचारसरणीचे ठराव पास केले. नागपूरच्या मराठा परिषदेचे अध्यक्ष बेळगांवचे श्री. फातरफेकर व उपाध्यक्ष श्री. बाबासाहेब देशमुख विरूळकर होते.

आपण कांहीं केलें तरी लोकांची चळवळ जोरच धरीत आहे असें पाहून प्रतिकार करावा या बुद्धीनें सरकारनें " अमन " ( शांति ) सभा स्थापन केल्या. या सभांतून आपल्या पक्षपाती लोकांच्या सहाय्यानें असंतोष लोकमत शमवावें असा सरकारचा प्रयत्न होता पण त्याला फारसें यश आलें नाहीं. मात्र अमन सभांच्या कार्यक्रमा बरोबर सरकारचें दडपशाही सत्र सुरू होतेंच. प्रथम उमरावतीस निघत असलेल्या पण पुढें वर्धेस गेलेल्या नंतर बाबासाहेब देशमुखांच्या संपादकत्वाखालीं सुबोधमालेकडून ५०० रु० चा व घोरपड्यांच्या ' विजय ' कडून २००० रु० चा जामीन मागण्यांत आला. पण अशानेंही लोकांना जरब बसू शकली नाहीं. सरकारनें दडपशाहीचा जसा डाव टाकावा तसें लोकांनी बदला स्वतन्त्रबुद्धीनें उत्तर द्यावें असा प्रकार चालू होता. नागपूरच्या नेटिव्ह जनरल लायब्ररीला या दडपशाहीच्या काळातच नॅशनल लायब्ररी हें नाव देण्यांत आलें यावरून हेंच सिद्ध होतें. गांवोगांवी लोक रस्त्यांना व चौकांना टिळक व गांधी अशीं नावें देऊं लागले. शिंप्यांनीं सुद्धां आपआपले संघ करून परदेशी कापडाचे कपडे न शिवण्याचा ठराव केला.

अशा प्रकारें एका वर्षांत स्वराज्य मिळूं या निश्चयानें लोक चळवळींतील प्रत्येक कलम पार पाडण्याच्या मार्गे लागले. एका प्रान्तीं तर सरकारनें दारू मनवाचें

फेव्हांच हार्दिक पाठिंबा दिला नव्हता. त्या दृष्टीनें पहातां या परिषदेंत खादीच्या जागी 'स्वदेशी वस्त्र परिधान करावें' हा बाब साहजिकच मान्य झाले. राष्ट्रीय महासभेच्या 'परदेशी'च्या जागीं 'ब्रिटिश कापड व माल' शब्द प्रयोग आला. नवीन घटनेंत राष्ट्रीय महासभा अधिक कार्यक्षम करण्यासाठीं वर्किंग कमिटीला दिलेले अधिकार काँग्रेसच्या कार्यक्रमाला विरोध असणाऱ्यांना जाचक वाटत होते. तेव्हां त्या दलाच्या अग्रणीं पैकीं श्री. बापुजी अणे ह्यांनीं काँग्रेसची वर्किंग कमिटी खारिज करण्याबद्दल ठराव मांडला

परिषदेंत महाराष्ट्रांतले देव, दास्ताने आणि मध्यप्रांतातले जमनालाल बजाज काँग्रेसची बाजू कळकळीनें पुढें मांडत होते. त्यांना जमनादास मेहताचा पाठिंबा होता. विरोधी दलांत मध्यप्रांतातर्फे अभ्यंकर बॅरिस्टर, नारायणराव वैद्य आदिकरून मंडळी हल्ला चढवीत होती. त्या काळचे त्या दलाचे मध्यप्रांतीय सरसेनापति डॉ. मुंजे येथून तेथपावेतों अल्पसंख्यांत केल्याप्रमाणें मूकवृत्ति धारण करून बसले होते. अशा प्रकारें अकोला परिषदेंत राष्ट्रीय सभेच्या नागपूर येथील अधिवेशनांत मंजूर झालेल्या कार्यक्रमाच्या बाबतींत विरोधाची पताका फडकावण्यांत आली त्याचें पर्यवसान कशांत झालें हें पुढें येईलच.

डिसेंबरांतच भंडारा जिल्ह्यांत जिल्हापरिषद बोलावण्यांत आली. त्या परिषदेचा सरकाला बाऊ वाटला, व १४४ कलमाखालीं तिजवर बंदी केली पण चालकांनी लागलीच तेथून ६ मैलावर असलेल्या एकलारी गांवांत जाऊन यशस्वीपणें परिषद् भरविली. मौलाना ताजुद्दीन अध्यक्ष होते. या परिषदेंत नागपूर काँग्रेसच्या कार्यक्रमाला पाठिंबा देण्यांत आला. याच वेळीं नोकरशाहीनें भंडाऱ्यास जिल्हा दरबार भरविला. जिल्ह्यांतल्या २०० मंडळींना निमंत्रणें पाठविलीं परंतु सारी ५० मंडळी हजर होती. याप्रमाणें या प्रांताची १९२१ सालची स्थूलतः काँग्रेसची कारकीर्द झाली. तिचा आढावा घेतां प्रांताची काँग्रेसची सत्ता ज्यांच्या हातीं होती त्यांच्या कार्यक्रमाशीं असलेल्या मतभेदाच्या मानानें बरीच चांगली झाली. म. भग.नदीन, पं. सुंदरलाल, अर्जुनलाल सेठी, वीर वामनराव जोशी, व माखनलाल चतुर्वेदी यांनी या प्रांतात केलेल्या राष्ट्रसेवेबद्दल व त्या करितां सोसलेल्या कष्टांबद्दल श्री. दा. कमेटीनें धन्यवाद दिले. (ठराव नं. ५ ता. १०-७-२१)

पैसे वसूल करण्यांत सक्ती केली जाणार नाहीं असें आश्वासन दिलें पण साकोलींतील रतनसिंग ठाकूर या ठेकेदाराला उलट अनुभव येऊन शेवटीं त्यानें सत्याग्रह केला व तो जेलमध्यें गेला. पाटणसांवगीच्या पिकेटिंगच्या कार्यक्रमांत असहयोगाश्रमाचे श्री. कालीचरण शर्मा यांचेवर खटला झाला. १७ नोव्हेंबर रोजीं युवराजांनीं मुंबईस पाय ठेवला, तेव्हां मुंबईस मोठा दंगा होऊन महात्माजी अस्वस्थ झाले. या दिवशीं प्रांतभर मोठा हरताळ पाळण्यांत आला. ठिकठिकाणचे हरताळ पूर्णपणें स्वयंस्फूर्त होते. परिषदाद्वारें लोकजागृतीचें काम सारखें चालू होतें. नागपूरचे कॉंग्रेसपदाधिकारी अवश्य त्या किमान प्रमाणांत कॉंग्रेसचे ठराव पाळीत तरी त्यांचीं मतें निराळीं होतीं म्हणून त्यांनीं नागपूर जिल्हा परिषदेंत कॉंग्रेसनें ध्येयांतील सदिग्धता काढून मार्गाचे बाबतींत बंधन घालूं नये असा ठराव पास केला. पुढें होणाऱ्या अकोला परिषदेची मुहूर्तमेढ या परिषदेंतच रोंविली गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या वेळीं महाराष्ट्रांत मुळशी सत्याग्रहाचें भांडण चालू होतें पण कॉंग्रेसनें त्याला आत्मसात् केलें नव्हतें. तथापि महाराष्ट्रांत या प्रश्नाबद्दल जिव्हाळा वाटे आणि सेनापति बापट, दास्तानेप्रभृति जेव्हां येथें आले तेव्हां या प्रांतानें त्यांच्याशीं शक्यनुसार सहकार्य केलें. निव्वळ पुरुषच नव्हे तर कांहीं स्त्रियाही येथून स्वयंसेविका म्हणून गेल्या. वर्ध्याची वृद्ध सत्यभामाबाई ही पहिली स्त्रयंसेविका होय.

दिसेंबर महिन्यांत पूर्वसंकेतानुसार नागपूर, वऱ्हाड मुंबई, महाराष्ट्र व कर्नाटक यांची संयुक्त परिषद अकोला येथें भरली. तात्यासाहेब केळकर अध्यक्ष होते. त्यांत अनेक ठराव झाले. परंतु मुख्य ठराव त्यांचें लांबलचक पूर्वकथन ( Preamble ) वजा जातां, "असहकारितेची पुढील पायरी जो विरोधक असहकारिता (obstructive non-co operation ) तिचा अवलंबन करणें इष्ट आहे" हा होता. त्यांत असहकारितेवर प्रच्छन्न वार केलेला दिसतो. महाराष्ट्रांत पुढें जीं लोकपक्षीय राजकारणांत स्थित्यंतरें होत जाऊन राजकारणाचा रथ प्रतियोगी सहकारितेच्या मार्गावर आणण्याचा प्रयत्न झाला, त्याची ही प्रस्थानपत्रिका होती असें म्हणता येईल. महाराष्ट्रांत खादीच्या कार्यक्रमाला पुष्कळ विरोध मनोवृत्तीच्या दळानें

केव्हांच हार्दिक पाठिंबा दिला नव्हता. त्या दृष्टीनें पहातां या परिषदेंत खादीच्या जागी ' स्वदेशी वस्त्र परिधान करावें ' हा बदल साहजिकच मान्य झाला. राष्ट्रीय महासभेच्या 'परदेशी च्या जागीं ' ब्रिटिश कापड व माल ' शब्द प्रयोग आला. नवीन घटनेंत राष्ट्रीय महासभा अधिक कार्यक्षम करण्यासाठीं वर्किंग कमिटीला दिलेले अधिकार कॉंग्रेसच्या कार्यक्रमाला विरोध असणाऱ्यांना जाचक वाटत होते. तेव्हां त्या दलाच्या अग्रणी पैकीं श्री. बापुजी अणे ह्यांनीं कॉंग्रेसची वर्किंग कमिटी खारिज करण्याबद्दल ठराव मांडला

परिषदेंत महाराष्ट्रांतले देव, दास्ताने आणि मध्यप्रांतातले जमनालाल बजाज कॉंग्रेसची बाजू कळकळीनें पुढें मांडत होते. त्यांना जमनादास मेहताचा पाठिंबा होता. विरोधी दलांत मध्यप्रांतातर्फे अभ्यंकर बॅरिस्टर, नारायणराव वैद्य आदिकरून मंडळी हुज्जा चढवीत होती. त्या काळचे त्या दलाचे मध्यप्रांतीय सरसेनापति डॉ. मुंजे येथून तेथपर्यंतीं स्वसंन्यास केल्याप्रमाणें मूकवृत्ति धारण करून बसले होते. अशा प्रकारें अकोला परिषदेंत राष्ट्रीय सभेच्या नागपूर येथील अधिवेशनांत मंजूर झालेल्या कार्यक्रमाच्या बाबतींत विरोधाची पताका फडकावण्यांत आली त्याचें पर्यवसान कशांत झालें हें पुढें येईलच.

डिसेंबरांतच भंडारा जिल्ह्यांत जिल्हापरिषद बोलावण्यांत आली. त्या परिषदेचा सरकारला बाऊ वाटला, व १४४ कलमाखालीं तिजवर बंदी केली पण चालकांनीं लागलीच तेथून ६ मैलांवर असलेल्या एकलारी गांवांत जाऊन यशस्वीपणें परिषद् भरविली. मौलाना तायुद्दीन अध्यक्ष होते. या परिषदेंत नागपूर कॉंग्रेसच्या कार्यक्रमाला पाठिंबा देण्यांत आला. याच वेळीं नोकरशाहीनें मंडळींस जिल्हा दरबार भरविला. जिल्ह्यांतल्या २०० मंडळींना निमंत्रणें पाठविलीं परंतु सारी ५० मंडळी हजर होती. याप्रमाणें या प्रांताची १९२१ सालची स्थूलतः कांग्रेसची कारकीर्द झाली. तिचा आढावा घेतां प्रांताची कांग्रेसची सत्ता *ज्यांच्या हातीं होती त्यांच्या कार्यक्रमासाठीं असलेल्या मतभेदाच्या मानानें बरीच चांगली* झाली. म. भगवानदीन, पं. सुंदरलाल, अर्जुनलाल सेठी, वीर वामनराव जोशी, व माखनलाल चतुर्वेदी यांनीं या प्रांतात केलेल्या राष्ट्रसेवेबद्दल व त्या करितां सोसलेल्या हालअपेष्टांबद्दल ना. को. कमेटीनें धन्यवाद दिले. (ठराव नं. ५ ता. १०-४-२१)

---

## प्रकरण ३ रें

# १९२२ : मतभेदाचें बीजारोपण.



१९२० सालीं पास झालेला असहकारितेचा कार्यक्रम १९२१ सालीं वर्षभर आचरल्यानंतर अमदाबाद काँग्रेसमध्यें त्यापुढचा कायदेभंगाचा प्रयोग करण्याकरितां महात्मा गांधींना सर्वाधिकारित्व देण्यांत आलें असलें तरी अमदाबाद काँग्रेस-नंतर १९२२ च्या सुरुवातीपासून व असहकारितेबद्दलचे मतभेद सुरू झाले होते. या मतभेदांना स्पष्ट स्वरूप येण्यास सुमारें एक वर्ष लागलें व गया काँग्रेस (१९२२) पावेतों ते अत्यंत स्पष्ट झाले तरीही गयेला श्री. राजगोपालाचारिअर यांच्या अव्वल दर्जाच्या भावनात्मक भाषणामुळें कौन्सिलवादी लोकांचा प्रभाव पडला नाहीं व असहकारितेचें धोरण अमलांत कायम राहिलें. तरी गयेलाच स्वराज्य पार्टी स्थापन करण्यांत आली त्यानंतर दोन वर्षें स्वराज्यपक्षाचें वर्चस्व राहिलें व बेळगांवच्या १९२४ मधील काँग्रेसच्या सुमारास स्वराज्यपक्षाचा सूर्य मध्या-न्हावर होता. आमच्या प्रांतांतील स्वराज्यपक्षानें आपल्या अल्पकाल जीवनांत पहिल्या दर्जाची व अखिल हिंदुस्थानांत सर्वश्रेष्ठ अशी कामगिरी केली पण अत्यंत उच्च शिखर गांठतां गांठतांच त्या पक्षाच्या अधःपातालाही सुरुवात झाली. मात्र १९२५ च्या कानपूर काँग्रेसला स्वराज्यपक्षानें काँग्रेसला पूर्णपणें ताब्यांत घेतलें आणि गयेस जसा स्वराज्यपक्ष काँग्रेसमधून फुटून निघाला त्याचप्रमाणें कानपूरला स्वराज्यपक्षांतून प्रतिसहकारपक्ष फुटून निघाला व आमच्या प्रांतांतील स्वराज्य पक्षाच्या अधःपातास कारणीभूत झालेल्या पक्षांनं सहजच प्रतिसहकार पक्षांत प्रवेश केला. १९२६ साल जवळ जवळ भांडणांत गेलें आणि १९२७ सालीं मद्रासला त्यानंतरीं पुनः पुनः नापास झालेला—सातव्याचा ठराव प्रथम पास होऊन पुढील जोमदार कार्यांनी पुनः मुहूर्तमेढ रोवण्यांत आली. अशा प्रकारें हा पांच वर्षांचा काळ आंदोलनाचा अतएव महत्त्वपूर्ण व मनोरंजक आहे. आमच्या प्रांतांतील

स्वराज्यपक्षाचा या काळांतील इतिहास अत्यंत महत्वपूर्ण असल्यामुळें तो पुढील एका प्रकरणांत स्वतंत्रपणें दिला आहे.

अमदाबाद (१९२१) काँग्रेसमध्यें कांग्रेसवाल्यांत दुफळी होईल अशी सरकारची अपेक्षा होती पण ती फसल्यामुळें सरकारनें सहजच दडपशाहीवर कटाक्ष ठेवला. आमच्या प्रांतांतही तसेंच वारें वाहूं लागून पाटणसावंगीस जादा पोलीस-बावतची म्युनिसिपल टॅक्सची वसूली, येथील श्री. उदाराम पहेलवानांवरील खटला, श्री. गणपतराव पांडे यांच्यावर ७॥ हजारा ऐवजीं २० हजार इन्कमटॅक्स बसविणें या द्वारां सरकारचें धोरण स्पष्ट झालें. भंडारा जिल्ह्यांत श्री. असीरकर वकील वगैरे मंडळींवर खटले होऊन आर्वीचे श्री. अंबाडे यांचे पोलीस नोकरीचें पेन्शन बंद झालें. पण यामुळें सरकारच्या कल्पनेप्रमाणें लोकांची वृत्ति मात्र नरमली नाहीं. ३० जानेवारीला युवराज यावयाचे होते त्यांच्या स्वागतावर बहिष्कार घालावा या अर्थाचें पत्रक हिंदी व मराठी मध्यप्रांत आणि वऱ्हाड यांतर्फे अनुक्रमें श्री. ई. राघवेंद्रराव, श्री बळवंतराव देशमुख आणि श्री बापूजी अणे यांच्या सहीनें काढण्यांत आलें. या पत्रकाप्रमाणें सर्व प्रांतांत कडकडीत हरताळ पाळण्यांत आला. या बहिष्काराच्या बातमीच्या तारा आक्षेपार्ह म्हणून ठरविण्यांत आल्या होत्या.

यानंतर प्रांतभर सर्वत्र परिषदा भरूं लागल्या. असहकारितेबद्दल या प्रांतांतही पक्षभेद होते सबब ज्या ठिकाणीं ज्यांचें वर्चस्व असेल त्या प्रमाणें त्या त्या परिषदेला रंग आला. वर्धा जिल्ह्यांतील परिषदा बहुंशीं असहकारितावादी आणि नागपूर व पूर्वेकडील परिषदा मिश्रमत प्रदर्शक झाल्या सिंदी, सालोड, सेलू, नाचणगांव, बोरा (गोंदिया), केळवद, पाटणसावंगी, अशा लहान लहान ठिकाणीं सुद्धां फार जोरानें परिषदांचे कार्यक्रम पार पाडण्यांत आले. दारू पिकेटिंगचा कार्यक्रमही १९२२ सालीं या प्रांतानें फार जोराचा केला. याबद्दल त्यावेळचे दारू दिवाण सर शंकरराव चिटणवीस आणि नामदार स्टेंटसाहेब यांनी सुद्धां कौंसिलांतून दारूची दुकानें सं. २३ कमी झाल्याबद्दल कबूली दिली होती. १० मार्चला महात्मागांधींना पकडण्यांत येऊन त्यांना नंतर सहा वर्षांची ॥ देण्यांत आली. याच्या निषेधार्थ भरलेल्या सभेत अध्यक्ष डॉ. मुंजे यांनीं ग'

तत्त्वावर टीका केली. या सुमारास प्रांतिक कां. क. नें प्रांतिक परिस्थितीचा आढावा घेऊन कार्यक्रम सुचविण्यास पोटकमिटी नेमली. ६ ते १३ एप्रिल पावेतों येथें राष्ट्रीय आठवडा पाळण्यांत आला पण १३ च्या जंगी जाहीर सभेतच कट्टर पक्षाच्या मंडळींनीं 'प्रां. कां. क. नें अं. इ. कां. क. व अमदाबाद कांग्रेसचे ठराव यांना धरून आपला कार्यक्रम करावा असा ठराव आणला. असहकारितेसंबंधीं तीव्र मतभेद असणारे दोन पक्ष खुद्द नागपुरांत त्यावेळीं होते आणि प्रां. कांग्रेस कमिटीची सूत्रें हातीं असलेल्या मंडळीचा असहकारितेच्या कार्यक्रमावर पूर्ण विश्वास नव्हता ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे व म्हणूनच कांग्रेस कार्यक्रमाबद्दल आणि प्रां. कां. क. च्या सूत्रचालकांबद्दल पुढें अत्यंत निकराची भांडणें झाली. १९२२ ते १९२७ काळांतील कट्टर स्वराज्यपक्ष व प्रतिसहकार पक्ष यांच्यांतील खडाजंगी बरोबरच पदारूढ प्रां. कांग्रेसवाले व त्यांना पदच्युत करूं पाहणारे यांच्यातही सारखें भांडण चालू होते.

ता. १४ एप्रिल १९२२ रोजीं येथील प्रां. कां. क. च्या पोटकमिटीनें कांग्रेस कार्यक्रमासंबंधीं आपला रिपोर्ट प्रसिद्ध करून अं. इं. कां. क. कार्यक्रमापैकीं जवळजवळ सर्व कलमांवर अव्यवहारीपणाचा शिक्का मारला. यामुळें पुढें ७ मे च्या सभेंत सेठ जमनालालजींनीं "या प्रां. कां. क. स कोणतेंही काम करण्याचा हक्क नाहीं" असा शिस्तीचा ठराव मांडला. या रिपोर्टनें प्रांतात खळबळ उडून अनेक ठिकाणीं त्याचा निषेध होऊन कांहीं मोजक्या ठिकाणीं उ० उमरेड तालुका परिषद तो मान्य झाला. यामुळें सबंध प्रांतात झपाट्यानें दोन तट पडून प्रां. कां क. नें निवडणुकीच्या बाबत दिलेल्या निर्णयाबद्दल तीव्र मतभेद उत्पन्न होऊन त्यासंबंधीं जागोजागी वाद माजूं लागले.

ता. १२ ते १४ मे पावेतो मुंबईस भरलेल्या व. क. च्या सभेंत वर्धा ता. कां. क. आणि प्रां. कां क. यांचे भांडण विचारात घेऊन श्री. टी. प्रकाशम् यांना चौकशी करण्याकरितां नेमण्यात आलें. डॉ. मुंजांना मुद्दाम बोलावण्यात आलें होतें पण डाक्टरांनीं कामें सोडून जातां येत नाहीं अशी त्यांनीं उलट तार पाठविली. टी. प्रकाशम् यांनीं चौकशी करून 'भांडणामुळें या प्रांतांतील काम थबकून राहिलें आहे' असा शेरा दिला.

अशी परिस्थिती असली तरी प्रांतांत निरनिराळ्या दिशांनीं चैतन्य होतेंच. त्या सुमारास चालू असलेल्या मुळशी सत्याग्रहांत आपल्या प्रांतांतून श्री. नारायणराव वैद्य प्रभृति बरीच मंडळी गेली. टिळक विद्यालयानेंही आपल्या शिक्षक व विद्यार्थी वर्गाच्या तुकड्या पाठविल्या. तहसिलींमध्येंही कार्यक्रम चालू होते. रामटेकास दारू पिकेटिंग संबंधीं श्री. गोविंदराव पाटील यांना चोप बसला. आर्वी तहसिलींत पानवाल्यांच्या कार्यकर्त्याकडून पावतीबुकें हिसकून घेण्यांत आलीं व सेलूच्या गणपतराव जोशांना जबर शिक्षा देण्यांत आली.

लखनौला ९-६-२२ ला भरलेल्या ऑ. इं. कां. क. च्या ठरावान्वयें नेमलेली कायदेभंग चौकशी कमिटी नागपुरास ता. ११ जुनं रोजीं आली व तिनें फेरवाले व नाफेरवाल्यांच्या साक्षी घेतल्या. लखनौच्या बोलीं बैठकींत सेठ जमनालाल यांना १७ लाख रुपये त्यांच्या स्वाधीन करून खादीची अखिल भारतीय संघटना करण्याचें काम त्यांच्याकडे दिलें. तों पावेतों नागपूरच्या कांग्रेसचे हिशेब प्रसिद्ध झाले नव्हते त्याबद्दल वर्तमानपत्रांतून बराच असंतोष प्रकट करण्यांत येत असे.

सप्टेंबरांत प्रांतांतील कॉं. च्या नवीन निवडणुकी व्हावयाचें ठरलें. प्रां. कॉं. कमिटीच्या ता २३ जुलैच्या सभेंत कॉंग्रेसच्या निवडणुकी करण्यासाठीं भवानीशंकर नियोगी, समीउल्लाखान व मंडलेकर यांची पोट कमिटी नेमण्यांत आली त्यांनीं केलेले नियम ता. ३० जुलैच्या सभेंत मंजूर करण्यांत आले. दोन्हा पक्षांची आपल्या पक्षाची निवडणुकींत सरशी व्हावी म्हणून चुरस सुरू झाली. जमनालालजींनीं प्रांतांत जाहीर नामा काढला कीं. हकीमच्या कार्यक्रमावर विश्वास ठेवणाराच निवडून या कार्यक्रमांत फरक करणारांना निवडून देऊं नका. जमनालालजींनीं आपल्या प्रां. कॉं. कमिटीच्या उपाध्यक्षत्वाचा आणि सभासदत्वाचा राजीनामाहि दिला. भंडाऱ्याचे कर्मवीर पाठक ह्याच सुमारास कलम १०८ अन्वयें पकडले होते. नागपूर नगर कॉंग्रेस कमिटीच्या निवडणुकींत मुंजे, चोळकर, अभ्यंकर, समिउल्लाखान, प्रधान, मगबानदीन, अवारी, तिजारे, धर्माधिकारी, डेकाटे इ. निवडले गेले. ' महाराष्ट्रानें ' ह्या निवडणुकीला 'डेमॉक्रॅटिक' म्हटलेलें आहे. नाफेरवाल्यांच्या हातीं बऱ्याच तालुक्यांत या निवडणुकीमुळे संघा येऊं पहात होती. फेरवाला पक्ष सत्ताधारी होता. त्यांत वर्धा, आर्वी, चांदा

येथें पुनः निवडणुकी व्हाव्यात असें ठरविलें. भंडारा, साकोली, गोंदा, काटवल येथील निवडणुकी मुदत बाहेर झाल्या म्हणून त्यांचीही पुनः निवडणूक व्हावी म्हणून हुकूम दिला. निवडणुकीच्या तक्रारींची चवकशी करण्याकरितां एक पोट-कमिटी नेमण्यांत आली. नागपूर नगर कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारिणीत टिकेकर-अध्यक्ष, उपाध्यक्ष कोतवाल, खजीनदार-पुनमचंद, चिटणीस आंबुलकर-तिजारे ह्या प्रमाणें निवडून आले.

नोव्हेंबर महिन्यांत कॉंग्रेसच्या कायदेभंग कमिटीचा अहवाल प्रसिद्ध झाला. त्यांत कांहीं अटींवर कौन्सिल प्रवेशास संमती देण्यांत आली. सामुदायिक सत्याग्रहाला मोकळी वाट ठेवण्यांत आली नाहीं. ऑ. इं. कॉ. कमिटीनें घातलेल्या शर्ती पाळल्यास त्यासंबंधानें प्रां. कॉं. कमिट्यांस अधिकार देण्यांत आला. ह्याच सुमारास देशबंधु दास अमरावतीस येऊन त्यांनीं आपलें ह्या प्रश्नावरील मत जाहीर केलें असहकारितेचे तत्व कायम ठेऊन कार्यक्रमाची दिशा बदलणें अवश्य आहे असें त्यांचे मत होतें. महाराष्ट्र पक्षाचा तत्वाशींच मतभेद आढळतो. त्याचा त्यासंबंधानें जाहीरनामाहि निघाला. सरकारनेंहि एका बाजूस दडपशाही तर दुसऱ्या बाजूस शांतिसभाद्वारें विरुद्ध प्रकार सुरू केला तरीहि १२ तारखेला को-ऑप्शन साठीं नवीन प्रां. कॉं. कमिटीची सभा भरली. अध्यक्षस्थानीं विश्वनाथराव केळकर होते. चव्हाणांनीं शिरस्त्याचा प्रश्न (point of order) उपस्थित केला. नियोजित १४० च्या जागीं ६१ च सभासदांची प्रांतिक कॉंग्रेस कमेटीवर निवडणूक मंजूर असल्यामुळें को-ऑप्शन करतां येत नाहीं. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. सगळे फेरवाले को-ऑप्ट केले गेले. काटवलच्या नव्या निवडणुकींतहि घाटे प्रभृति सर्व फेरवाले निवडून आले.

१८ नोव्हेंबर रोजीं वर्किंग कमिटीची व ता. २० रोजीं ऑ. इं. कॉं. कमिटीची लागोपाठ कलकत्त्या मुक्कामीं बैठकी झाल्या. त्यांत मराठी मध्यप्रांताच्या निवडणुकांच्या तक्रारींचा प्रश्न पुढें आला. एका बाजूस मुंजे व दुसऱ्या बाजूस जमनालालजी यांच्या तक्रारी मांडीत होते. जे. सेनगुप्त, गंगाधरराव देशपांडे यांची चवकशी कमिटी नेमण्यांत आली. दोघांचा मतभेद झाल्यास त्यांनीं एक तिसरा गृहस्थ निर्णयासाठीं घ्यावा असें ठरविण्यांत आलें. ह्या सभेंत कायदेभंग कमिटीचा रिपोर्ट

मंजूर करण्यांत आला. ता. २१ च्या सभेंत कौन्सिलप्रवेशाचा ठराव आला. सारखीं मतें पडल्यामुळें तो ठराव गया येथील अधिवेशनावर सोपविण्यांत आला. चिटणीस पार्कांत पुनः कायदेभंग कमिटीच्या रिपोर्टसंबंधानें सभा भरली. अभ्यंकर सुंदरलाल ह्यांची खडाजंगी झाली. ता. २६ रोजीं प्रां. कॉ. कमिटीच्या अधिकाऱ्यांची व ऑ. इं. कॉ. कमिटीच्या सभासदांची निवडणूक करण्याबद्दल नव्या प्रां. कॉ. कमिटीची सभा भरली त्यांत मतभेदाचें वादळ उठलें; परंतु प्रां. कॉ. कमिटी बहुतेक एकपक्षी असल्यामुळें फेरवाल्या पक्षाचीच मंडळी निवडून आली. डॉ. मुंजे अध्यक्ष झाले. ऑ. इं. कॉ. कमिटीवर डॉ. मुंजे, बॅ० अभ्यंकर, डॉ. खरे, समीउल्लाखान, बळवंतराव देशमुख, मनोहरपंत देशपांडे व गणपतराव देव हे सात सभासद निवडून आले.

वास्तविक बहुतेक ता. कॉं. कमिट्यांत नाफेरवाल्यांचेंच बहुमत असूनहि त्यांना ज्यांच्या हातीं सत्ता होती त्यांच्याकडून वाव मिळेना. म्हणून त्यांनीं ता. १५ डिसेंबर रोजीं प्रांताची निराळी प्रांतिक कमिटी स्थापन करून तींत को-ऑप्शन केलें. ता. १८ डिसेंबर रोजीं ऑ. इं. काँग्रेस कमिटीच्या सभासदांच्या निवडणुकीची सभा झाली. तींत जमनालाल बजाज, गणपतराव टिकेकर, नीळकंठराव देशमुख वगैरे सात सभासद निवडून देण्यात आले. गया काँग्रेससाठीं निराळे प्रतिनिधीहि या प्रां. कॉ. कमिटीनें निवडून दिले. ह्याच सुमारास ता. १७ डिसेंबर रोजीं सेनगुप्ता व गंगाधरराव देशपांडे वर्धेस निवडणुकीच्या तक्रारींच्या चौकशी साठीं आले. फेरपक्षाच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटीतर्फे कागदपत्रांसह बॅ. अभ्यंकर वर्ध्यास गेले होते. त्यानंतर दोन्हीहि पक्षांच्या पाच प्रतिनिधींची तडजोडीसाठीं नागपुरास बैठक झाली. परंतु तींत तडजोड होऊं शकली नाहीं. चवकशी अपूर्ण राहिली. त्यासाठीं गया मुक्कामीं पुनः तारीख नेमण्यांत आली. जमनालालपक्षाकडून सेनगुप्ताकडे तडजोडीची तयारी सुचविण्यांत आली. परंतु मुंजे अभ्यंकर ह्यांनीं तडजोड करण्याचें नाकारलें. नंतर ते सेनगुप्ता देशपांडे ह्यांनीं तें प्रकरण काँग्रेसचे अध्यक्ष देशबंधु दास ह्यांचेकडे सोपविलें त्यांनीं नीळकंठराव देशमुख व डॉ. मुंजे

घांची साक्ष घेतली डॉ. मुंजे पूर्वी प्रां कॉ. कमिटीचे सेक्रेटरी असल्यामुळें त्यांची साक्ष मी विश्वसनीय समजतों असें म्हणून फेरपक्षातर्फे त्यांनीं आपला निर्णय दिला.

१९२२ च्या गया कांग्रेसमध्यें मुख्यत्वेंकरून फेर आणि नाफेर वृत्तींत सामना होऊन श्री. सी. राजगोपालाचार्यांच्या प्रभावामुळें नाफेरपक्षानें जय मिळविला पण फेरवाल्यांचे नाफेर पक्षावर प्रखर आघात होत आहेत असा देखाव्यांतच १९२३ साल उजाडलें.

## प्रकरण ४ थें

# गया काँग्रेसनंतर नागपूरचा झेंडासत्याग्रह.



१९२२ च्या गया अधिवेशनांत कायदेभंगाची मोहीम लवकर सुरू करण्यास एप्रिलच्या आत अखिल देशांत पंचवीसहजार स्वयंसेवक व २५ लाख रुपये जमविण्याचें ठरलें व आपल्या प्रांतावर पांचहजार स्वयंसेवक व पन्नास हजार रुपयांची जबाबदारी आली. येथील प्रां कॉ. क. ची सूत्रें फेरवाल्यांच्या हातीं होतीं, त्यांचा या कार्यक्रमावर विश्वास नव्हता म्हणून अलाहाबादेस भरलेल्या वर्किंग कमिटीनें नागपूर प्रांतामध्ये सत्याग्रहाचा कार्यक्रम पार पाडण्यासाठीं सेठ जमनालाल बजाज, श्री. नीलकंठराव देशमुख महात्मा भगवानदीनजी, आचार्य विनोबाजी भावे आणि श्री. ठिकेकर यांची स्वतंत्र कमिटी नेमली.

गया काँग्रेसचा संदेश सांगतांना लोकांत दोन स्पष्ट वृत्ति दिसून येत. देशबंधु दासांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या पक्षाचे महाराष्ट्र व वऱ्हाड हे बालेकिल्ले होते. १०-१-२३ च्या नगर काँग्रेसच्या सभेंत या उभयमतांच्या लोकांत बराच वाद झाला. २० जानेवारीला टौनहालपटांगणांत श्री. ठिकेकर यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीरसभा झाली तीअहि तीच प्रकार झाला. त्यावेळीहि नागपुरास भरणाऱ्या सभा या मतभेदामुळें शांततेनें पार पडणें कठीण झालें होतें.

असहयोगाथम्यांनीं १ फेब्रुआरीपासून परदेशी कापडाचें पिकेटिंग करा-वयाचें ठरविलें, व मिरवणूक काढून कार्यक्रमास सुरुवात केली. बऱ्याच व्यापा-ऱ्यांनीं परदेशी कापड न विलायतण्याच्या शपथा घेतल्या. सरकारला हें पसंत पडलें नाहीं, कारण आतापावेतों जी चळवळ झाली होती तीमुळें १९२२ च्या मार्च-पावेतों परदेशी कापडाची आयात २०० कोटि वारांनीं कमी झाल्याची कबूली खुद्द मँचेस्टर चेंबर ऑफ कॉमर्सच्या अध्यक्षांनीं दिली होती.

या सुमारास झालेल्या मुबईच्या वर्किंग कमिटीच्या सभेंत पुनः आपल्या प्रांतातील निवडणुकीसंबंधीं प्रश्न निघाला, व निवडणुकी मजूर झाल्या. स्थानिक

काँग्रेस पदाधिकाऱ्यांना हा निकाल अर्थातच मानवला नाहीं गया काँग्रेसचा कार्यक्रम पार पाडण्याकरितां कट्टरपक्षानें प्रांतभर दौरा सुरू केला. या कट्टर मंडळीला फेरवादी त्यावेळीं पुढाणे पुढारी म्हणत. फेरवादी काँग्रेस पदाधिकाऱ्यांनीं प्रां कां. क. च्या सभेंत गया काँग्रेसचा कार्यक्रम पार पाडण्याकरितां अलाहाबाद अ. भा. क. नें नेमलेले जमनालालप्रभृति पांच व श्री. बाळमुकुंद व मि. अबदुल रज्झाक या सात जणांची कमिटी नेमून त्याविषयींची सर्व जबाबदारी आपल्या आंगाबाहेर टाकली. ७ मार्चला राजगोपालाचार्य, राजेनबाबू, देवीदास गांधी वगैरे मंडळी नागपुरास आली व त्यांनीं प्रांतात दौरा काढला. १८ मार्चला गांधीदिनानिमित्त प्रांतभर कडक हरताळ पाळण्यात आला.

यावेळीं गतवर्षीप्रमाणें पुनः ठिकठिकाणीं परिषदा भरू लागल्या आणि त्यात त्या त्या ठिकाणच्या कार्यकर्त्यांच्या प्रवृत्तिमुळे फेरवादी अगर नाफेरवादी ठराव मंजूर झाले. प. सुंदरलाल यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली वर्धा जिल्हा परिषद व तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली वर्धा तालुका परिषद, या अनुक्रमें वरील दोन प्रकारांचे उत्कृष्ट नमुने होत

१९२२ मध्यें कायदेभंग चौकशी कमिटीचा दौरा जबलपूर येथें गेला असतां तेथील म्यु. पालि त्यांना मानपत्र दिलें व त्याप्रसंगीं कमिटीच्या इमारतीवर राष्ट्रीय झेंडा लाविला. त्यासंबंधीं पार्लमेंटांत प्रश्नोत्तरें झाली व पुनः असे न होऊं देण्याचें सरकारतर्फे आश्वासन देण्यात आलें होतें. गया कॉंग्रेसनंतर जानेवारींत राजगोपालाचारीप्रभृति मंडळी जबलपुरास गेली तेव्हां पुनः म्यु. पानें मानपत्र देण्याचा व झेंडा लावण्याचा ठराव केला. तेथील डेपुटी कमिशनरांनीं ताबडतोब म्युनिसिपालिटीस फेरविचार करण्यास सांगितलें पण तिनें आपला निश्चय कायम ठेवला म्हणून वरील ठरावांची अमलबजावणी न करण्याचा डेप्युटि कमिशनरांनीं म्यु. पा. वर हुकुम बजाविला. यामुळें लोकांत असंतोष माजून जबलपुरास घरोघर राष्ट्रीय झेंडे दिसू लागले. म्यु. पा. नें डेपुटि कमिशनरांच्या हुकुमाचा निषेध केला व कांहीं सभासदानीं राजीनामे दिले. शहरांतून झेंड्याच्या मिरवणुकी निघू लागल्या. तेथील कांग्रेस कमिटीनें १८ मार्चला झेंडादिन पाळण्याचें ठरविलें व त्यादिवशीं कडक हरताळ पाळला. प. सुंदरलाल यांच्या नेतृत्वाखालीं मिरवणूक काढण्यांत आली व शेवटीं प. सुंदरलाल पकडले गेले.

याचा प्रतिध्वनि नागपुरासही उमटला. १३ एप्रिलला जालियानवालाबाग दिननिमित्त येथेंही मिरवणूक निघाली. तिच्या बरोबर राष्ट्रीय झेंडा होता. सिव्हिल स्टेशनमध्ये मिरवणूक जातांच डे. क (आतांचे नामदार गव्हर्नर साहेब) मि. गोवन आणि पोलिस अधिकारी यांनीं मिरवणुकीला हरकत घेतली लष्करी तुकडीही सज्ज होती. तरीही मिरवणूक पुढें चालू लागली. त्यानंतर पोलीस कप्तान मि. स्मिथ यांनी मिरवणुकीवर हल्ला केला व तिच्यांतील मंडळींला चोंपण्यांत येऊन रस्त्यानजीकच्या नालींत ढकलण्यांत आलें. श्री आवारी, कालीचरण, अंबुलकर, वडे, तिजारे वगैरे मंडळींला या गर्दीत चोप बसला. या सर्वांना पकडण्यांत येऊन प्रत्येकी दोन महिन्यांची शिक्षा देण्यांत आली.

१७ एप्रिलला पुण्यास भरलेल्या व. क. स. या स्वयंसेवकांचें अभिनंदन करण्यांत आलें. यानंतर सेठ जमनालालप्रभृतींची जी पांच जणांची कमिटी होती तिनें १ मे पासून झेंडा सत्याग्रह करण्याचें ठरविलें. ता १५ एप्रिलला झालेल्या नगर कांग्रेस कमिटीनेंही वरील सत्याग्रह करावा असा ठराव केला. सरकारनेंही १ मे रोजीं सिव्हिल स्टेशनमधून झेंडा मिरवणूक नेण्याबद्दल १४४ कलमाखालीं मनाई हुकुम काढला.

अशाप्रकारें युद्धाला तोंड लागल्यावर ता. २ मे पासून स्वयंसेवकांचे जथे नियमितपणें जाऊं लागले. सात दिवसांच्या दडपशाहीनें सत्याग्रह संपेल अशी सरकारची अपेक्षा होती. पण ती खोटी ठरल्यामुळें सरकारनें निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्या योजण्यास सुरुवात केली. धरपकड जोरानें सुरू झाली. सत्याग्रहींना तिकिटे मिळू नये अशी स्टेशनांवर व्यवस्था करण्यात आली. याला उत्तर म्हणून कांही बाहेरगांवच्या स्वयंसेवकांनीं पायीं नागपुरास येण्यास सुरुवात केली. पण यांना रस्त्यांतच पकडण्यांत येऊं लागलें. प्रथम थोडी शिक्षा देण्यांत येत असे पण पुढें पिनल कोडाचीं अनेक कलमें ओढून ताणून उपयोगांत आणून जबर शिक्षा देण्यात येऊं लागल्या. यानेंही जेव्हां सत्याग्रह उताराबर येतांना दिसेना तेव्हां सत्याग्रहींना तुरुंगांतही छळण्यात येऊन माफी मागण्यास भाग पाडण्याचे प्रयत्न सुरू झाले.

असें असलें तरी हिंदी मध्यप्रांतांतून व उत्कल, मुंबई, आंध्र, बिहार, बंगाल, गुजराथ, कर्नाटक या दुसऱ्या प्रांतांतून सत्याग्रहाकरितां पुष्कळच स्वयंसेवक आले. डॉ. चइथराम, डॉ. दिया, डॉ. हर्डीकर, श्री गोपालदास तलाठी,

नागपुरास पाठविलें व २००० रु० चें सहाय्य केलें. ता. २२ जुलै पासून त्यांच्या अनुरोधानें काम चाललें विठ्ठलभाई पटेलहि त्यांच्या जोडीला ता. २३ जुलै रोजीं येऊन पोंचले. दंडवसुलीसाठीं जमनालालजींची एक मोटार व गाडी जप्त करण्यांत आली ती लिलावांत कोणी घेईना निळकंठराव देशमुखांच्या दंडाचे १५०० रुपये जप्तीच्या वारंटानें वसूल करण्यांत आले. देशातल्या निरनिराळ्या भागांतले जथे नागपूरांत छोटूं लागले नागपुरांतल्या लढ्यांत पडल्यामुळें ज्या सत्याग्रहांच्या कुटुंबीयांचो हलाखीची स्थिति झाली त्यांच्या मदती करितां प्रांताच्या स्पेशल कमिटीकडे वार्किंग कमिटीनें मराठी मध्यप्रांतातील स्पेसल कमिटिकडे ५००० व हिंदी मध्यप्रांताकडे २००० रुपयांची मदत पाठविली.

ता. ६ आगस्ट रोजीं स्थानिक कायदेकौंसिलच्या बैठकीला सुरवात झाली. तींत मध्यप्रांताच्या नामदार गव्हर्नरांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं सरकारच्या दमन नीतीचें समर्थन केले. ता. ७ रोजीं होममेंबर सर मोरोपंत जोशी यांनींहि सरकारी धोरणाचें समर्थन करून कायदेभंग करणारांनाच ठपका दिला. सरकारी धोरणाचा बॅ. रामराव देशमुखांनीं खरपूस समाचार घेतला. सेठ शिवलालजीचा सत्याग्रही कैद्यांना विनशर्त सोडून देण्याचा ठराव १९ वि. ३१ मतांनीं नापास झाला.

या सुमारास बिहारचे हरदेव नारायणसिंग जेलांत मरण पावले. अस्वस्थ स्थितींतहि " मेलों तरी बेहेत्तर पण माफी मागणार नाहीं " हा निश्चय त्यांनीं कायम ठेवला व ता० ८ आगस्ट रोजीं त्यांचा देहांत झाला. ता० १६ आगस्ट रोजीं १४४ कलमान्वयें काढलेल्या मनाई हुकमाची मुदत संपली तेंव्हां डि० मॅजिस्ट्रेटानें पुनः तोच हुकूम नव्यानें जारी केला. त्याला प्रत्युत्तर म्हणून ता० १८ आगस्ट रोजीं प्रांतांतल्या व देशांतल्या दूरदूरच्या भागांतल्या मिळून १०० स्वयंसेवकांनीं पुनः जथ्था काढला. सत्याग्रहांच्या वृत्तीप्रमाणें नव्या हुकूमानंतर या छापील हस्तपत्रकांची नक्कल डिस्ट्रिक्ट सु० ऑफ पोलिसकडेहि वल्लभ भाईनीं पाठविली व आगाऊ जाहिर केल्याप्रमाणें मिरवणूक निघाली चर्च जवळ मिरवणूक आल्यानंतर डि. एस. पी. नें गाणाऱ्या मुलांना गांत बंद करण्या- बद्दल सांगितलें त्यावर जथ्याचे सेनापति पं. माखनलालजींनी " आमचा झेंडा

श्री. मोहनलाल पांड्या, श्री. दुर्गाशंकर मेहेता, श्री. जडार, श्री वरदाचारी, श्री. इमेशिअर शेठ घीसालाल इत्यादि बाहेरगांवरून प्रमुख मंडळींही सत्याग्रहांत भाग घेण्यास आली होती.

ता. १८ जून हा तारीख अखिल भारतीय स्वयंसेवकांच्या सत्याग्रहासाठीं नेमण्यांत आली होती. हा प्रसंग पाहण्याकरितां पं. जवाहरलाल नेहरू, पुरुषोत्तमदास टंडन तसेच दरबार गोपालदास देसाई आणि त्यांच्या पत्नि भक्तिबा, चित्रशाळेचे बाबुकाका, जार्ज जोसेफ, विठ्ठलदास जेराजनी वगैरे मंडळी नागपुरांत आली होती. अखिल भारतवर्षीय जथ्था सत्याग्रहाच्या मोहिमेवर निघालेला पाहून सरकारचे धाबें दणाणलें तो प्रसंग घडून येऊं नये म्हणून सरकारनें ता. १७ रोजीं सध्याकाळीच सत्याग्रहाचे पुढारी जमनालालजी, निळकंठराव देशमुख व महात्मा भगवानदीन ह्यांना गिरफ्दार केलें. जेथें जेथें स्वयंसेवकाच्या छावण्या होत्या त्यांना रात्रीं पोलिसांचा वेढा देण्यांत आला आणि १८ तारखेला सूर्योदयापूर्वीच त्या सगळ्यांना गिरफदार करण्यात आलें त्यापूर्वी प्रांतिक कार्यकारी कमिटीचे चिटणीस अवीदअली ह्यांना पकडलें. सरकारनें सर्रास धरपकड सुरू करून सुमारें २५० लोकांना गिरफदार केलें श्री. गणपतराव टिकेकर व श्री. जैनेंद्रकुमार यांनाही पकडलें पण नतर सोडून दिलें. नतर श्री. गणपतराव टिकेकर व पं माखनलाल चतुर्वेदी यांनीं संग्रामाची सूत्रें आपल्या हातीं घेतली आणि खड न पडूं देतां संग्राम पुढें चालविला. पुढें सागरचे केशवराव खांडेकरांनीं प्रकाशन विभाग व वासुदेवराव सुभेदारांनीं स्वयसेवक विभाग ह्याचे आधिपत्य घेतलें. शेठ जमनालालजी, निळकंठराव देशमुख, भगवानदीनजी, अबीदअली याना ता. १० जुलै रोजीं एकदर १॥ वर्षांची शिक्षा व जमनालालजींना ३००० आणि निळकंठराव देशमुखांना १५०० रुपये दंड झाला.

ऑ० इं. का. कमेटीनें नागपूरच्या बैठकींत बहुमतानें या चळवळीला मदत देण्याचा व ता. १८ जुलै झडादिन मानण्यांत यावा असा ठराव केला. पुढें गणपतराव टिकेकर काळजाच्या विकारानें आजारी होऊन उपचारासाठीं बाहेरगांवी गेले. त्यांच्या पश्चात पं. माखनलालजी संचालक झाले. पुढें ऑ. इं. कॉ. क. नें हा लढा अखिल भारतीय समजून आपल्या तर्फे सरदार वल्लभभाई पटेलांना

नागपुरास पाठविलें व २००० रु० चें सहाय्य केलें. ता. २२ जुलै पासून त्यांच्या अनुरोधानें काम चाललें विठ्ठलभाई पटेलहि त्यांच्या जोडीला ता. २३ जुलै रोजीं येऊन पोंचले. दंडवसुलीसाठीं जमनालालजींची एक मोटार व गाडी जप्त करण्यांत आली ती लिलावांत कोणी घेईना निळकंठराव देशमुखांच्या दंडाचे १५०० रुपये जप्तीच्या वारटानें वसूल करण्यांत आले. देशांतल्या निर-निराळ्या भागांतले जथ्थे नागपुरांत लोटूं लागले नागपुरांतल्या लढ्यांत पड-ल्यामुळे ज्या सत्याग्रह्यांच्या कुटुंबीयांची हलाखीची स्थिति झाली त्यांच्या मदती करितां प्रांताच्या स्पेशल कमिटीकडे वर्किंग कमिटीनें मराठी मध्यप्रांतातील स्पेशल कमिटिकडे ५००० व हिंदी मध्यप्रांताकडे २००० रुपयांची मदत पाठविली.

ता. ६ आगष्ट रोजीं स्थानिक कायदेकौंसिलच्या बैठकीला सुरवात झाली, तींत मध्यप्रांताच्या नामदार गव्हर्नरांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं सरकारच्या दमन नीतीचें समर्थन केलें. ता. ७ रोजीं होममेंबर सर मोरोपंत जोशी यांनींहि सरकारी धोरणाचें समर्थन करून कायदेभंग करणारांनाच ठपका दिला. सरकारी धोरणाचा बॅ. रामराव देशमुखांनीं खरपूस समाचार घेतला. सेठ शिवलालजींचा सत्याग्रही कैद्यांना बिनशर्त सोडून देण्याचा ठराव १९ वि. ३१ मतांनीं नापास झाला.

या सुमारास बिहारचे हरदेव नारायणसिंग जेलांत मरण पावले. अत्यवस्थ स्थितींतहि " मेलों तरी बेहेत्तर पण माफी मागणार नाहीं " हा निश्चय त्यांनीं कायम ठेवला व ता० ८ आगष्ट रोजीं त्यांचा देहांत झाला. ता० १६ आगष्ट रोजीं १४४ कलमान्वयें काढलेल्या मनाई हुकमाची मुदत संपली तेव्हां डि० मॅजिस्ट्रेटानें पुनः तोच हुकूम नव्यानें जारी केला. त्याला प्रत्युत्तर म्हणून ता० १८ आगष्ट रोजीं प्रांतांतल्या व देशांतल्या दूरदूरच्या भागांतल्या मिळून १०० स्वयंसेवकांनीं पुनः जथ्था काढला. सत्याग्रहाच्या वृत्तीप्रमाणें नव्या हुकूमानंतर या छापील हस्तपत्रकांची नकल डिस्ट्रिक्ट सु० ऑफ पोलिसकडेहि वल्लभ भाईनीं पाठविली व आगाऊ जाहिर केल्याप्रमाणें मिरवणूक निघाली चर्च जवळ मिरवणूक आल्यानंतर डि. एस. पी. नें गाणाऱ्या मुलांना गांत बंद करण्या-बद्दल सांगितलें त्यावर जथ्याचे सेनापति पं. माखनलालजींनी " आमचा झेंडा

नागपुरास पाठविलें व २००० रु० चें सहाय्य केलें. ता. २२ जुलै पासून त्यांच्या अनुरोधानें काम चाललें. विठ्ठलभाई पटेलहि त्यांच्या जोडीला ता. २३ जुलै रोजीं येऊन पोंचले. दंडवसुलीसाठीं जमनालालजींची एक मोटर व गाडी जप्त करण्यांत आली ती लिलावांत कोणी घेईना. निळकंठराव देशमुखांच्या दंडाचे १५०० रुपये जप्तीच्या वारंटानें वसूल करण्यांत आले. देशातल्या निर-निराळ्या भागांतले जथ्थे नागपूरांत लोटूं लागले नागपुरांतल्या लढ्यांत पड-ल्यामुळे ज्या सत्याग्रह्यांच्या कुटुंबीयांची हलाखीची स्थिति झाली त्यांच्या मदतीकरितां प्रांताच्या स्पेशल कमिटीकडे वार्कींग कमिटीनें मराठी मध्यप्रांतातील स्पेशल कमिटीकडे ५००० व हिंदी मध्यप्रांताकडे २००० रुपयांची मदत पाठविली.

ता. ६ आगष्ट रोजीं स्थानिक कायदेकौंसिलच्या बैठकीला सुरवात झाली, तींत मध्यप्रांताच्या नामदार गव्हर्नरांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं सरकारच्या दमन नीतीचें समर्थन केलें. ता. ७ रोजीं होममेंबर सर मोरोपंत जोशी यांनींहि सरकारी धोरणाचें समर्थन करून कायदेभंग करणारांनाच टपका दिला. सरकारी धोरणाचा बॅ. रामराव देशमुखांनीं खरपूस समाचार घेतला. सेठ शिवलालजींच। सत्याग्रही कैद्यांना बिनशर्त सोडून देण्याचा ठराव १९ वि. ३१ मतांनीं नापास झाला.

या सुमारास बिहारचे हरदेव नारायणसिंग जेलांत मरण पावले. अत्यवस्थ स्थितींतहि " मेलों तरी बेहेत्तर पण माफी मागणार नाहीं " हा निश्चय त्यांनीं कायम ठेवला व ता० ८ आगष्ट रोजीं त्यांचा देहांत झाला. ता० १६ आगष्ट रोजीं १४४ कलमान्वयें काढलेल्या मनाई हुकमाची मुदत संपली तेंव्हां डि० मॅजिस्ट्रेटनें पुनः तोंच हुकूम नव्यानें जारी केला. त्याला प्रत्युत्तर म्हणून ता० १८ आगष्ट रोजीं प्रांतांतल्या व देशांतल्या दूरदूरच्या भागांतल्या मिळून १०० स्वयंसेवकांनीं पुनः जथ्था काढला. सत्याग्रह्यांच्या वृत्तांप्रमाणें नव्या हुकूमानंतर ह्या छापील हस्तपत्रकांची नक्कल डिस्ट्रिक्ट सु० ऑफ पोलिसकडेहि वल्लभभाईनीं पाठविली व आगाऊ जाहिर केल्याप्रमाणें मिरवणूक निघाली चर्च जवळ मिरवणूक आल्यानंतर डि. एस. पी. नें गाणाऱ्या मुलांना गांत बंद करण्या-बद्दल सांगितलें त्यावर जथ्थाचे सेनापति पं. माखनलालजींनी " आमचा झेंडा

बंद ठेवावा आणि या अवधींत देश पुनः कायदेभंगाकरितां तयार होईल किंवा काय हें पहावें अशी अट स्वराज्य पक्षासमोर मांडण्यांत आली परंतु त्यापक्षानें ती मान्य केली नाहीं. दोघांनींहि आपापला कार्यक्रम सुरू ठेवावा असें दे. बं. दास यांचें म्हणणें होतें. शेवटीं कौन्सिलप्रवेशासंबंधींचा प्रचार बंद ठेवून गया काँग्रेसचे ठराव एप्रिल अखेरपर्यंत अमलांत आणण्याचें दासपक्षानें कबूल केलें, परंतु या समेटानें कोणाचेंच समाधान झालें नाहीं. कायदेभंगाची चळवळ पुनः चालू करण्याचे नेटाचे प्रयत्न करण्यांत आले. त्यांपकीं नागपूरच्या झेंडा सत्याग्रहाची हकीकत मागें दिलीच आहे.

या सुमारास देशांत-विशेषतः उत्तर हिंदुस्थानांत-हिंदुमुसलमानांचे दंगे होऊं लागल्यामुळें शांतिमय कायदेभंगाला अनुकूल वातावरण निर्माण होऊं शकलें नाहीं. शेवटीं दिल्ली येथें मौ. अबूलकलाम आझाद यांचे अध्यक्षतेखालीं स्पेशल काँग्रेस भरून कौन्सिलप्रवेशाचा मार्ग मोकळा करून देण्यांत आला. स्वराज्यपक्षानें आपल्या प्रांतातील कौन्सिलें कशीं काबीज केलीं आणि तेथें कोणती कामगिरी बजाविली याची हकीकत पुढील प्रकरणांत दिली आहे.



प्रकरण पांचवें

# मध्यप्रांतीय स्वराज्यपक्षाचा इतिहास

गेल्या प्रकरणांत वर्णन केलेल्या झेंडा सत्याग्रहानें आमच्या प्रांतांत कट्टर पक्षाचा कार्यक्रम यशस्वी करण्यास तयार अशी मंडळी होती हें जरी निर्विवादपणें सिद्ध झालें होतें तरी कट्टर पक्षाला समांतर असा आणि त्यावेळीं कांग्रेस पदाधिकारी असलेला पण मनानें देशबंधु दासांच्या कार्यक्रमावर पूर्णपणें विश्वास असलेला प्रबल पक्षही येथें होताच हें पूर्वीच्या प्रकरणावरून स्पष्ट आहे. १९२३ ते १९२७ पावेतोंचा या पक्षाचा आमच्या प्रांतांतील इतिहास विशेष महत्त्वाचा आहे. सबब या प्रकरणांत स्वतंत्रपणें मध्यप्रांतांतील स्वराज्यपक्षाचा इतिहास देण्याचें योजिलें आहे.

## स्वराज्यपक्षाची स्थापना

१९२२ ची गया कांग्रेस संपल्याबरोबर ता. ३१ डिसेंबर १९२२ रोजीं निरनिराळ्या प्रांतांतील ज्या प्रतिनिधींनीं कौंसिल निवडणुकीच्या व ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या ठरावास अनुकूल मतें दिलीं त्यांची बैठक भरून तींत कॉंग्रेसच्या कक्षेंत राहूनच काम करणारी अशी कॉंग्रेस खिलाफत स्वराज्यपार्टी स्थापन करण्यांत आली. दे. बं. दास यांस या पार्टीचे धुरीण नेमून पंडित मोतीलाल नेहरू, सत्यमूर्ति, विठ्ठलभाई पटेल व चौधरी, खलीक उज्जमां यांस सेक्रेटरी निवडण्यांत आलें. या पार्टीच्या जाहीरनाम्यावर निरनिराळ्या प्रांतांतील देशभक्तांनीं सह्या केल्या

होत्या. त्यांत मराठी मध्यप्रांततर्फे डॉ. मुंजे, बॅ. अभ्यंकर, डॉ. खरे, बॅ. गोविंदराव देशमुख, डॉ. परांजपे यांनी आपल्या सह्या दिल्या होत्या. पुढें अलाहाबाद येथें या पक्षाची सभा भरून पक्षाची घटना तयार करण्यात आली आणि प्रांतोप्रांतीं स्वराज्यपक्षाच्या शाखा स्थापन करण्याचे कार्य सुरू झालें. मराठी मध्यप्रांतात स्वराज्यपक्षाची संघटना करण्याचें काम डॉ. मुंजे व बॅ. अभ्यंकर यांजकडे देण्यात आलें होतें. मधल्या तडजोडीमुळें पक्षस्थापनेचें काम जरी पुढें ढकललें गेलें तरी ठिकठिकाणीं सभा व परिषदा भरून स्वराज्यपक्षाला पाठिंबा देण्यांत येत होता. कौंसिल प्रवेशावरील बंदी उठली तेव्हां असेंब्लीच्या व प्रांतिक कौन्सिलाच्या निवडणुकी जवळच आल्या होत्या. त्याकरितां मराठी मध्यप्रांततर्फे असेंब्लीसाठी बॅ. मोरोपंत अभ्यंकर व प्रांतिक कौन्सिलसाठीं डॉ. मुंजे, डॉ. खरे, श्री. के. पी. वैद्य, आप्पासाहेब हळदे, देवराव पाटील, डॉ. घोपटे, बळवंतराव देशमुख, बॅ. जी. व्ही. देशमुख, ही मंडळी उभी करण्यांत आली. बॅ. अभ्यंकर यास विरोध करण्याकरितां रा. ब. ढोबळे यांस उभे करण्यांत आलें होतें. परंतु रा. ब. ढोबळे यास ३८० व बॅ. अभ्यंकर यास २४६६ मतें पडून बॅ. अभ्यंकर हे प्रचंड बहुमतानें निवडून आले. डॉ. खरे व डॉ. मुंजे यांसही अनुक्रमें १९४१ व १९४० मतें पडून दोघेही स्वराज्यपक्षातर्फे प्रांतिक कौन्सिलांत नागपूरतर्फे निवडून आले. मराठी मध्यप्रांतातून उभे राहिलेले स्वराज्यपक्षाचे सगळेच उमेदवार विजयी झाले. मध्यप्रांत कौंसिलांत ५४ लोकनियुक्त सभासदांपैकीं शपथ घेऊन स्वराज्यपक्षाचे झालेले हिन्दू ३६ व मुसलमान ३ व स्वराज्यपक्षाच्या मदतीनें निवडून आलेले स्वतंत्र ३ मिळून ४२ सभासद होऊन एकंदर ७० सभासदांपैकीं ४२ सभासदांचें निर्भेळ बहुमत सी. पी. कौंसिलांत प्रस्थापित झालें. इतर कोणत्याही प्रांतात स्वराज्यपक्षाला एवढा प्रचंड विजय मिळाला नाहीं.

कौन्सिलांत स्वराज्यपक्ष हाच मोठा पक्ष असल्यामुळें त्यावेळचे गव्हर्नर सर फ्रँक स्लाय यांनीं स्वराज्यपक्षाचे कौन्सिलांतील पुढारी डॉ.

मुंजे यांस स्वराज्यपक्षानें दिवाणगिऱ्या स्वीकाराव्या अशी विनंति केली. त्यावर डॉ. मुंजे म्हणाले "आमच्या पक्षाच्या सर्व सभासदांनीं कौंसिलांत जबाबदारीच्या जागा न स्वीकारण्याची प्रतिज्ञा केली आहे; हल्लींच्या द्विसत्ताक राज्यपद्धतींत काम करण्याची आमची इच्छा नाहीं. ही पद्धति दुरुस्त तरी करावी, नाहीं तर मोडून तरी टाकावी, असा आमचा संकल्प ठरला आहे. म्हणून मला आपली विनंति मान्य करतां येत नाहीं." तेव्हां गव्हर्नर साहेब म्हणाले, "तुमच्या पक्षाचे बहुतेक सभासद टिळकांच्या प्रतियोगी सहकारितेच्या धोरणास अनुसरून वागतील अशी मला आशा वाटते." त्यास डॉ. मुंजे यांनीं असें उत्तर दिलें कीं, "प्रतियोगी सहकारितेचें धोरण स्वराज्यपक्षाच्या हल्लींच्या धोरणाशीं जुळण्याजोगें नाहीं." ही मुलाखत सुमारें तासभर चालली होती.

कोकोनाड्याची काँग्रेस संपताच ता. ३० डिसेंबर १९२४ रोजीं स्वराज्यपक्षाच्या जनरल कौंसिलची बैठक भरून स्वराज्यपक्षाच्या सभासदांसाठीं कांहीं नियम ठरविण्यांत आले. याच बैठकींत राष्ट्राच्या वतीनें स्वराज्यपक्षाची किमान मागणी निश्चित होऊन ती सरकारकडे पाठविण्याचें ठरलें. सरकारनें ही मागणी फेटाळून लाविली तर कौंसिलांत एकजात, अखंड व सुसंगत अडवणुकीचें धोरण अमलांत आणावें असा ठराव पास करण्यांत आला. मध्यप्रांत कौन्सिलांत स्वराज्यपक्षानें आपलें हुकमी बहुमत मिळविलें असल्यामुळें या कौंसिलांत जशी कामगिरी करून दाखवितां येईल तशी इतर प्रांतांत करतां येणार नाहीं म्हणून येथील स्वराज्यपक्षाच्या सभासदांस जरूर तो सल्ला देण्याकरितां दे. बं. दास व पं. मोतीलाल नेहरू हे मुद्दाम येथें आले होते. दिवाणावरील अविश्वासाचा ठराव जेव्हां कौन्सिलांत आला तेव्हां डॉ. मुंजे व राघवेंद्रराव यांचीं सडेतोड भाषणें झालीं. 'तुम्ही इंग्रजांनीं लोकसत्तेची सनद जबरीनें हिसकावून घेतली कीं नाहीं? आम्हीही तसेंच करणार! फरक इतकाच कीं, तुम्ही त्या वेळीं तरवारीचा—जबरदस्तीचा—उपयोग केला! आम्ही सनदशीर मार्गाचा

व शांततामय व अहिंसात्मक उपायांचा जोर लावून आमची सनद व अधिकार आम्ही मिळवणार' ! असें डॉ. मुंजे यांनीं सरकारला खडखडीत बजावलें, ते दिवशीं स्वराज्यपक्ष कौन्सिलांत नुसता गर्जत होता. मध्यप्रांत सरकारचे चीफ सेक्रेटरी मि. नेल्सन शांत व गंभीर वृत्तीचे पण तेही त्यादिवशीं 'दिवाणांविरुद्ध अविश्वासाचा ठराव मांडणें हा शुद्ध निर्लज्जपणा व उद्धटपणा आहे' असें संतापून बोलले. परंतु डॉ. मुंजे यानीं त्यास हरकत घेतली. आणि नेल्सन साहेबांना आपले शब्द परत घ्यावयास लावलें. शेवटीं दिवाणांवरील अविश्वासाचा ठराव १४ विरुद्ध २४ अशा बहुमतानें पास झाला आणि कौन्सिल तहकूब झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें. अशा रीतीनें आपल्या प्रांतापुरती तरी स्वराज्यपक्षानें कौंसिलची पूर्णपणें कायदेशीर कुचंबणा केली. याबद्दल ना. शास्त्री यांनीं देखील 'स्वराज्यपक्षानें पहिल्या धडाक्यास आपल्या शक्तीची जी चुणुक दाखविली त्याबद्दल त्याचें अभिनंदन केलें पाहिजे' असे उद्गार काढले. मध्यप्रांत कौंसिलांत ही जी कायदेशीर कुचंबणा निर्माण झाली आहे ती हिंदुस्थान सरकार व स्टेट सेक्रेटरी यांच्या नजरेस तावडतोब आणावी आणि आम्ही जी राष्ट्रीय मागणी सादर करणार आहोंत तिच्या धोरणानें हिंदुस्थानात तावडतोब स्वराज्य स्थापन करा असें आपण त्यांना कळवावें असा निरोप गव्हर्नर साहेबांस धाडण्यांत आला. नुकतेंच इंग्लंडच्या प्रधानपदावर अधिष्ठित झालेले मजूर पुढारी मि. मक्डोनल्ड यानीं हिंदुस्थानाला "बाबानों ! अडवणुकीच्या मार्गाचा अवलंब करूंनका" असा संदेश पाठविला. असेंब्लीमध्येंही स्वराज्याच्या मागणीचा ठराव येऊन राउंड टेबल कान्फरन्सची मागणी करण्यात आली. आपल्या प्रांताच्या अंदाजपत्रकाच्या बैठकींतही सरकारपक्ष व स्वराज्यपक्ष यांच्यांत चांगल्याच चकमकी झडल्या. "हें बजेट लोकांचें नव्हे, तें तुमचें आहे" असा रोखठोक जबाब डॉ. मुंजे यांनीं स्टँडन साहेबास दिला; आणि दिवाणांना सालिना प्रत्येकी अवघा १ रुपया

पगार मंजूर करून स्वराज्यपक्षानें संबंध बजेट फेटाळून लावलें. याच बैठकीत डॉ. खरे यांनीं ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा ठरावही मांडला व तो ४० विरुद्ध २२ अशा प्रचंड बहुमतानें पास झाला. असेंब्लीची बैठक संपून बॅ. अभ्यंकर नागपुरास परत आले त्यावेळीं, महाराष्ट्राच्या प्रतिनिधीनें त्यांची गांठ घेतली असतां ते म्हणाले, :— "स्वराज्यपक्ष सरकारच्या भुलथापांना भुलला नाहीं. युक्त्याप्रयुक्त्यांना फसला नाहीं, किंवा धमकावण्यांला भ्याला नाहीं. त्यानें राष्ट्रहिताकडे अढळ दृष्टि ठेविली होती. सरकारची इच्छा असेल तर सरकारच्या मदतीनें, व नसेल तर सरकारच्या इच्छेच्या विरुद्ध कसेंही करून आम्हांला स्वराज्य मिळालेंच पाहिजे, असें आम्ही सरकारास स्पष्ट दाखविलें आहे." यावेळीं म. गांधी सुटून आले होते. "माझ्या सुटकेबाबत स्वराज्यवाद्यांनीं जें संबीरपणाचें धोरण स्वीकारलें तेंच माझ्या सुटकेचें प्रमुख कारण आहे अशी माझी ठाम समजत झाली आहे." अशी त्यांनीं खुल्या दिलानें कबूली दिली. स्वराज्यपक्षानें मिळविलेल्या ह्या अभूतपूर्व यशामुळें मध्यप्रांत सरकार इतकें बेचैन झालें, कीं, स्वराज्य पक्षाविरुद्ध त्यानें उघड उघड मोहीम सुरू केली. सर फ्रँक स्लाय यांनीं या मोहिमेंत स्वतः भाग घेऊन ठिकठिकाणीं भाषणें केलीं. वस्तुतः बजेट फेंकून दिल्यानंतर सरकारनें पुनः निवडणुकी करावयास हव्या होत्या किंवा वर्तुळ परिषदेची मागणी तरी मंजूर करावयास पाहिजे होती; परंतु सरकारच्या दृष्टीनें अर्थातच यापैकी एकही गोष्ट इष्ट नव्हती.

स्वराज्यपक्षानें उत्पन्न केलेल्या परिस्थितीमुळें सरकारला (मुडिमन कमिटी) सुधारणा चौकशीकमिटी नेमणें भाग पडलें. या कमिटीच्या कामास ता. ७ आगस्ट १९२४ रोजीं जेव्हां सुरुवात झाली तेव्हा तिचे पहिलेच साक्षीदार मध्यप्रांताचे माजी दिवाण सर शंकरराव चिटनविस हे होते. त्यांनीं द्विदल राज्यपद्धति नको, ती नष्ट झालीच पाहिजे असें असंदिग्ध शब्दांत सांगितलें. दुसरे माजी दिवाण रा. ब. नारायणराव केळकर

यांचीही साक्ष तशीच झाली. असहकारितावादी असो, स्वराजिस्ट असो, किंवा प्रागतिक असो सगळ्यानाच या द्विदल पद्धतीचा वीट आला आहे असें सर शंकरराव आपल्या साक्षींत म्हणाले. डायार्कीचा बोजवारा उडा- ल्याचें बहुतेक साक्षीदारांनीं सांगितलें.

इंग्लंडांतील अधिकारारूढ पक्षाच्या धोरणाचा परिणाम हिन्दी राजकारणावर थोडाबहुत होतोच. त्या सुमारास अधिकारारूढ असलेला मजूरपक्ष जाऊन हिन्दुस्थानची राज्यसूत्रें पुनः हुजूरपक्षाच्या हातांत गेलीं आणि त्या पक्षानें आपलीं नखें बाहेर काढलीं. बंगाल्यांत क्रांतिकारकांच्या गुप्त मंडळ्या आतून जोराची चळवळ करीत असल्याविषयीं ॲंग्लो इंडिअन पत्रानी गिल्ला सुरू केला व आतां सरकारनें गय करतां कामा नये अशी त्यानीं ओरड सुरू केली. लागलीच २५ आक्टोबर १९२४ रोजीं लार्ड रीडींग साहेबांच्या सहीनें एक ऑर्डिनन्स सिमल्याहून जारी झाला. क्रांतिकारकांच्या गुप्त मंडळ्याकरिता हा ऑर्डिनन्स काढ- ण्यात आला आहे असा जरी सरकारनें बहाणा केला तरी त्याचा खरा रोख बंगालच्या स्वराजिस्टांना दडपून टाकण्याकडेच होता. दडपशाहीच्या या सत्रांत बंगालच्या स्वराज्यपक्षाचेच बहुतेक लोक पकडले गेले. त्यात दे. बं. दास याचे उजवे हात श्री. सुभाषचंद्र बोस व बंगाल कौंसिलचे दोन सभासदही होते. बंगाल्यांतील या दडपशाहीचा निषेध मुंबईस सर्व- पक्षीय परिषद भरवून करण्यात आला. कांग्रेसमध्येंही असहकारिता पक्ष आणि दास पक्ष यांत समेट होऊन दडपशाहीला तोंड देण्याचें ठरलें. १९२४,च्या बेळगांवच्या* कांग्रेसमध्यें स्वराज्यपक्षाला बरोबरीचें स्थान मिळालें. परंतु येथूनच स्वराज्यपक्षाच्या चंद्राला ग्रहणाचे वेध लाग- ण्यास सुरवात झाली. बजेट फेटाळल्यामुळें मध्यप्रांत सरकारनें दिवाणा- शिवायच मन मानेल तसा राज्यकारभार चालविला आणि त्यामुळें लोकांचें नुकसान झालें. याकरितां स्वराज्यपक्षानें कोणतें धोरण स्वीका- रावें याचा विचार करणें अवश्य आहे अशी भाषा सुरू झाली. स्वराज्य-

पक्षाला पुढील कार्यक्रम ठरविण्याकरितां मध्यप्रांत वऱ्हाडांतील स्वराज्य-पक्षीयांची एक सभा जानेवारी १९२५ मध्यें नागपूरला बोलाविण्यांत आली. या सभेकडे हिंदुस्थानांतीलच नव्हे तर विलायतेंतील लोकांचेही डोळे लागले होते. तिकडील मँचेस्टरगार्डिअन नांवाच्या एका पत्रानें तर मध्यप्रांतांतील स्वराज्यपक्ष हा लोकमान्य टिळकांच्या प्रतियोगीसहकारितेचा अनुयायी असल्यामुळें तो दिवाणगिऱ्या स्वीकारणार, असें लिहूनही टाकलें. या बाबतींत नागपूर आणि विलायत दरम्यान कांहीं गुप्त पत्रव्यवहार झाला असण्याचा संभव आहे. कारण डॉ. मुंजे आणि सर फ्रँक स्लाई यांच्यामध्यें एक तासभर झालेल्या पहिल्या मुलाखतींतच 'प्रतियोगी सहकारिते'ची चर्चा झाली होती. १९२४ सालचे प्रांतिक पत्रक फटाकून लावल्यानंतर सरकारनें स्वराज्यपक्षाविरुद्ध जी मोहीम सुरू केली तींत खुद्द गव्हर्नर साहेबांनींही हेंच-तुणतुणें सारखें चालू ठेवलें. शेवटीं मध्यप्रांत कौंसिलराची आणि अखिलभारत स्वराज्यपक्षाच्या कार्यकारी मंडळाची संयुक्त सभा नागपूर येथें ता. ११-१-२५ रोजीं भरून तींत कांहीं ठराव पास करण्यात आले. सरकारची बेगुमान वृत्ति जोपर्यंत बदलत नाहीं तोंपर्यंत स्वराज्यपक्षाला सरकारची यापुढेंही शक्य तितकी अडवणूक करणेंच प्राप्त आहे आणि खरीखुरी जबाबदारी जर सरकार लोकांच्या हवालीं करील तरच स्वराज्यपक्ष ती स्वीकारण्यास तयार होईल असें या ठरावान्वयें जाहीर करण्यांत आलें. मध्यप्रांतांतील स्वराज्यपक्षाचा कार्यक्रम स्वराज्यपक्षाच्या मूळ तत्त्वास न सोडतां सद्यःस्थितींत बदलणें अवश्य आहे काय व असेल तर तो कसा व कितपत बदलतां येईल आणि असा बदल कशा प्रकारें घडवून आणावा याचा विचार करून ता. १५ फेब्रुवारी १९२५ पर्यंत रिपोर्ट करण्याकरितां वरील बैठकींत एक पोट कमिटी नेमण्यात आली. तींत दे. बं. दास, पं. नेहरू, श्री. अणे, पं. अभ्यंकर, श्री. राव, श्री. तांबे, घनःश्यामसिंह गुप्त, डॉ. मुंजे आणि

tude is taken under the fascinating name of Party-discipline and it is high time that we ascertained our own minds as to what is going to follow......My definite view that I strongly hold and which I ever held is that our Party made a mistake in not accepting offices when they were offered and it will make an irreparable mistake now in rejecting them and not declaring that they are going to accept them. If this mistake is repeated our Party will lose its hold on the public mind and the Party will, sooner or later, if this policy is blindly persisted in, disrupt and go to ruin........

B. G Khaparde.

डॉ. चोळकर यांस ता. ६ जानेवारी १९२५

आपलें पत्र आतांच पावलें......पक्षशिस्तीच्या मोहक नावाखालीं अनिष्ट धोरणाचा अवलंब केला गेला असें मला वाटतें व पुढील (धोरणां) संबंधी आपण आपला निश्चय करण्याची वेळ आली आहे. ......माझें स्पष्ट मत आहे—हेंच पूर्वी होतें व आजही तें ठाम आहे—कीं चालून आलेल्या अधिकाराच्या जागा न घेण्यात (आपल्या) पक्षानें चूक केली व आतांही त्या नाकारल्या तर घोडचूक होईल. या चुकीच्या पुनरावृत्तीनें आपल्या पक्षाचें लोकांवरील वजन कमी होईल व हेंच (चुकीचें) धोरण सतत पुढें रेटल्यास पक्षाची वाताहात होऊन त्याचा नाश होईल...

आपला

बी. जी. खापर्डे

## डॉ. मुंजे यांचीं रा. राव यांस पत्रें

### ( १ )

2nd Feb. 1925

Dear Mr. Rao,

.......I may not be able to go to Delhi again for the meeting of the Sub-committee appoined to consider the situation of e C. P. in regard to acceptance of ministerships or otherwise. The meeting has been fixed for 12th Feb. at the Western Hotel Raisina, Delhi, and you will soon geta notice of it You know my views. I am strongly of opinion that it will be blunder if we allow revocation or suspension of the transferred Department on account of our own non-acceptance of office. I am afraid it will cause revulsion of feeling against the Swaraj Party in the province I need not say more. You know it better......so you must go.

B. S. Moonje.

श्री. राव, २ फेब्रुवारी १९२५

मध्यप्रांतांत दिवाणगिऱ्या घ्याव्या अगर न घ्याव्या यासंबंधीं विचार करण्याकरितां नेमलेल्या सबकमिटीच्या दिल्लीस होणाऱ्या सभेस मला पुनः कदाचित् जातां येणार नाहीं. सभा १२ तारखेस दिल्लीस रेझीनांतील वेस्टर्न हॉटेलमध्यें होणार आहे. तुम्हाला लवकरच (सभेची) सूचना मिळेल. तुम्हांला माझीं मतें माहीत आहेत. आपण अधिकाराच्या जागा न पत्करल्यामुळें सोंपीव खातीं राखीव बनलीं अगर तहकूब झालीं तर ती घोडचूक होईल. असें झाल्यास स्वराज्यपक्षाबद्दल प्रांतांत तिरस्कार उत्पन्न होईल.

अधिक लिहिण्याची गरज नाही....तुम्हांला (सर्व) माहीतच आहे... सवव तुम्ही गेलेंच पाहिजे.

आपला

बा. शि. मुंजे.

( २ )

23rd Feb. 1925.

Dear Mr. Rao,.

I sent you a letter this morning and I have again an occasion to write to you now. I had occasion to meet Sir G. M. and he asked me what have we decided in connection with the acceptance or otherwise of Ministerships and Presidentship and he further told me that it would be better if our final decision be made and the Govt. come to know of it as early as possible; otherwise the position of each other may be misunderstood mutually and an action may be taken by either or both the parties, i. e. the S. P. and Govt., which may eventually prove to be not very desirable to either party. I asked him if he speaks for the Governor with his authority. But he protested that it was a mere curiosity which impelled him to ask these questions. It may or may not be a fact but we may start with the assumption that perhap he is speaking for the Governor with a view to know our views on these burning questions. Who knows the Governor may even send for us, for I am told that he being

येणार त्यांची ओळख करून घेण्याची त्यांस इच्छा आहे असेंही मी ऐकतो. हें सर्व लक्षांत घेऊन मी हें पत्र लिहीत आहें. तुम्ही दिवाणगिरी घेणार कीं नाहीं यासंबंधीं मी कोणतें धोरण पत्करावें व कसें मत द्यावें यासंबंधीं तुमचें म्हणणें पत्रोत्तरीं तावडतोब कळवावें. वऱ्हाडचे सभासद अधिकाराच्या जागा घेण्याच्या मताचे असून त्यांच्याविषयीं मी निश्चयात्मक रीतीनें बोलूं शकतों. श्री. ताम्ब्यांचें नाव सुचविल्यास ते नाहीं म्हणणार नाहींत. म्हणून तुम्हींही आपलें मत नक्की कळवावें. किंवा हें पत्र मिळतांक्षणीं एखाद्या दिवसाकरितां येथें यावें. येणार असाल तर तार करा म्हणजे ताम्ब्यांनाही येथें येण्याबद्दल मी तार करीन. उशीर करण्यात व हा प्रश्न संदिग्ध राहूं देण्यांत अर्थ नाहीं. कोणत्या तरी एका तऱ्हेनें या प्रश्नाचा निकाल लावुं या. म्हणून हें पत्र जरूरीचें समजून व मला पत्रानें, तारेनें अगर प्रत्यक्ष येऊन कळवा.

अध्यक्षासंबंधीं सर गंगाधररावांना मी नक्की सांगितलें कीं, मला जी कांहीं माझ्या पक्षाची माहिती आहे तीवरून पक्षाचें व माझेंही स्वतःचें असें मत आहे कीं अध्यक्षपदाकरितां आपण आपल्या पक्षाचा माणूस उभा केलाच पाहिजे आणि व्यक्तीबद्दल मी म्हटलें कीं ता. १ मार्चला याविषयीं सभा होणार असून व्यक्तीची निवड मी श्री. राव यांचेकडे सोपवीन.

सारांश, बंगालच्या स्वराज्यपक्षाला जसें बनविण्यात आलें तसें आपणही बनल्यास जी नामुष्की होईल ती टाळण्यासंबंधीं माझा कटाक्ष आहे. आपण शेवटीं कसाही निश्चय केला तरी अधिकारपदासंबंधीचा प्रश्न आपण अधिक कुशलतेनें सोडवावयास हवा.

सध्यां इतकें पुरे; अधिक भेटीनंतर.

या. शि. मुंजे.

वरील पत्राबरोबरच स्वराज्यपक्षांतर्गत दिवाणगीर गटाच्या पुढाऱ्यांनीं इतर सभासदांच्या खासगी गांठी घेऊन मयविणें, फितविणें, कसे असतील त्यांना वळविणें इत्यादि गुप्त प्रयोग सुरू केले; परंतु

ह्या भानगडी गुप्त राहणें शक्य नव्हतें. मार्च १९२५ चे असेंब्लीच्या बैठकीला बॅ. अभ्यंकर हे दिल्लीस गेले होते तरी पण डॉ. खरे यांस या कारस्थानाचा सुगावा असल्याकारणानें स्वराज्यपक्षानें दिवाणगिऱ्या घेऊन मतदारांचा विश्वासघात न होऊं देण्याबद्दल फार खटपट केली. परंतु प्रांतिक कौन्सिलच्या मार्च १९२५ च्या बैठकीच्या होळीच्या सुटींत स्वराज्यपक्षांत कांहीं प्रमुख सभासदांनीं दिवाणगिऱ्या घेण्याचा निश्चय केलेला आहे असें त्यांना खात्रीलायक समजलें तेव्हां त्या दिवशीं डॉ. खरे वस्तुस्थिति समजावून घेण्यास डॉ. मुंज्यांकडे गेले व डॉ. मुंजे, रविशंकर शुक्ल व डॉ. खरे या तिघांनीं अनेक सभासदांकडे जाऊन त्यांनीं खंबीर राहण्याची खटपट केली. त्याच वेळीं दिवाणगिरीला विरोध करण्याबद्दल त्यांचीं वचनें घेतलीं. डॉ. मुंज्यांचे घरीं झालेल्या बैठकींत हिं. म. प्रां. तील सभासद दिवाणगिऱ्यांना विरोधच करतील असें आश्वासन पं. रविशंकर शुक्ल यांनीं दिलें होतें. परंतु डॉ. खरे वऱ्हाडाच्या सभासदांना भेटून आल्यानंतर रात्रीं १ वाजता डॉ. मुंजे, बॅ. राव, पं. रविशंकर त्यांचेकडे आले आणि " डॉक्टर, दिवाणगिऱ्या घेण्यास तुम्हीं अनुकूल व्हा, निदान विरोध तरी करूं नका असा बॅ. राव आग्रह करूं लागले. तेव्हां डॉ. खरे म्हणाले, " मतदाराचा विश्वासघात करावयास मी कधींही संमति देणार नाहीं. " त्यावर बॅ. राव म्हणाले, " डॉ. खरे, लोक फार विस्मरणशील असतात, दिवाणगिऱ्या जर घेतल्या नाहींत तर आपल्या पक्षाची शकलें झाल्याशिवाय राहणार नाहींत." डॉ. खरे म्हणाले " तुम्हांला दिवाणगिऱ्या घ्यावयाच्याच असतील तर आपल्या जागाचे राजीनामे द्या व दिवाणगिरी घेण्याच्या टिकीटावर यावयास पुनः निवडून या. परंतु आजच्या परिस्थितींत दिवाणगिरी घेण्यास मी कधींहि संमति देणार नाहीं. या उपर तुम्हीं दिवाणगिरी घेण्याचें ठरविलेंच तर मीं आपलीं इतर सर्व कामें बाजूला ठेवून तुमचें हें कारस्थान हाणून पाडण्याची शक्य ती खटपट करीन " असें

डॉ. खरे जेव्हां म्हणाले तेव्हां डॉ मुंजे म्हणाले "देखो भाई राव, ये डॉ. खरे तो मानवें नहीं."--डॉ. खरे काहीं केल्या वळत नाहींत असें पाहून डॉ. मुंजे व यॅ. राव यांनीं त्यांची आशा सोडली.

या भेटीनंतर डॉ. खरे यांनीं आपल्या पक्षाच्या सभासदांना भेटून दिवाणगिऱ्या घेण्याचा डाव उधळून लावला व निदान ह्या कौन्सिलच्या बैठकीपुरता तरी स्वराज्यपक्षाचा होणारा अधःपात मोठ्या कसोशीनें टाळला.

कौन्सिलचे अध्यक्ष सर गंगाधरराव चिटणीस यांची मुदत याच वेळीं संपल्यामुळें स्वराज्यपक्षानें प्रांतिक कौन्सिलच्या अध्यक्षाच्या जागे करितां आपल्या पक्षातर्फें उमेदवार उभा करण्याचें ठरविलें व त्या करिता खालीलप्रमाणें नोटीस पक्षाच्या प्रतोदानें महाराष्ट्रांत दिली.

"येत्या मध्यप्रांतीय कायदे कौंसिलच्या बैठकींत (ता. ४ मार्च बुधवार) रोजीं कौंसिलचा नवा प्रेसिडेंट निवडला जाणार आहे. म्हणून स्व. प. तर्फे प्रेसिडेंटचें नांव निश्चित करून सुचविण्यासाठीं मध्यप्रांतीय कौंसिलमधील स्व.प.च्या सभासदांची सभा रविवार ता. १ मार्च १९२५ रोजीं दुपारी ३ वाजतां नागपुर येथें श्री. गोविंदराव देशमुख, बॅरिस्टर यांचे बंगल्यांत भरणार आहे. नांव सुचविण्याची मुदत सोमवार ता. २ मार्च, १ वाजेपर्यंत आहे. म्हणून सर्व सभासदांनीं अवश्य हजर राहावें अशी विनंती आहे.

कृ. पां. वैद्य.<br>
कौंसिल स्व.प.चे प्रतोद."

(महाराष्ट्र ता. २२।२।२५)

वरील दिलेलीं तीन्ही पत्रें, खाजगी भेटीची हकीकत व शेवटची नोटीस वाचल्यानंतर पाटणा येथें स्वराज्यपक्षाच्या जनरल कौंसिलचें ता. ८ मार्च १९२५ रोजीं तांतडीची सभा कां भरविण्यात आली यावर स्वच्छ प्रकाश पडतो. या सभेच्या निकालानंतरही मध्यप्रांतांत दिवाण

गिऱ्या जरी घेतल्या नाहींत तरी स्व. प. नें कौंसिलच्या अध्यक्षाच्या जागेकरितां स्व. प. चे सभासद ताम्बे यांना निवडून आणलें. दिवाणांचा पगार मात्र पूर्वीप्रमाणेंच नामंजूर केला. मध्येंच बंगाल्यांतील कौंसिलांत दिवाण पाहिजेत असा ठराव पास झाल्यामुळें मध्यप्रांतांत चलबिचल सुरू झाली. परंतु दासबाबूंच्या प्रयत्नानें व बंगाल सरकारच्या अदूरदर्शित्वामुळें पुनः दिवाणांचा पगार नामंजूर झाला. आणि बंगाल कौंसिल नागपूरच्या पंगतीस येऊन बसलें. "या वेळीं मध्यप्रांतीय स्वराज्यपक्षांत दिसून आलेले मतभेद व वैयक्तिक महत्त्वाकांक्षा यांची नोंद सरकारनें आपल्या स्मरणवहींत काळजीपूर्वक करून ठेवली आहे व चालू उन्हाळ्याच्या दिवसांत पंचमढीच्या उंच व थंड टेकड्यांवरून वऱ्हाड व छत्तीसगड या भागाकडे लांब लांब जाळीं फेंकलीं जाऊन त्यांत किती मासे अडकतात, याचा प्रयोग चतुरपणें करून पाहिला जाईल. अगोदरच गुप्त पत्रव्यवहारही सुरू झाले असतील. फंदफितूरी होऊन जर कांहीं स्वराजिस्ट दिवाणगिरीच्या लोभानें म्हणा, किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा, सरकारपक्षांत सामील होणार असतील तर मध्यप्रांतानें गेल्या दोन वर्षांत कमविलेली अद्वितीय इभ्रत एका क्षणांत रसातळास पोंचेल. असें करणें म्हणजे केवळ प्रांताचा व स्वपक्षाचा विश्वासघात करणेंच नव्हे, तर आपल्या नीच स्वार्थलोलुपतेचें प्रदर्शन करणें होय स्वराज्यपक्षाच्या निरपेक्ष लोकसेवेच्या बाण्यास तें शोभण्यासारखें नसून एखाद्या स्वार्थलंपट 'होयबा'स किंवा सरकारी बगलबच्यास शोभण्यासारखें आहे." सिव्हिलस्टेशनमधील दोन बंगले सरकारनें भावी दिवाणांस राहण्यासाठीं म्हणून भाड्यानें घेऊन ठेवले आहेत अशी बातमी हितवाद पत्रानें प्रसिद्ध केली तेव्हां वरील टीका महाराष्ट्र पत्रानें केली होती. तुम्ही दिवाणगिऱ्या घेत नाहीं तर निदान त्या आम्हाला तरी घेऊं द्या असें या वेळीं नागपूरच्या प्रागतिक पक्षाचें म्हणणें होतें व याचा विचार करण्याकरितां एक प्रांतिक राउंडटेबल परिषद बोलवावी असा

वूट निघून सर विपिन घोस यांनीं तें काम आपल्या अंगावर घेण्याचेंही कवूल केलें. परंतु या सर्वपक्षीय परिषदेंत नागपूरच्या स्वराज्यपक्षानें कांहींच भाग घेतला नाहीं.

स्वराज्यपक्षात आंतून फंदफितुरी चालू आहे व त्यामुळें स्वराज्यपक्षाचीं शकलें होणार अशी सकारण भीति डॉ. खरे व बॅ. अभ्यंकर यांस वाटतच होती. स्वराज्यपक्षाचें नष्टचर्य येथेंच संपावयाचें नव्हतें. स्व. प.च्याच दुर्दैवानें नव्हे तर हिंदुस्थानच्या दुर्दैवानें दे. बं. चित्तरंजन दास यांना दार्जिलिंग येथे "स्टेप असाइड" या त्यांच्या राहत्या बंगल्यात मंगळवार ता. १६ जून १९२५ रोजीं तिसऱ्या प्रहरीं ५ वाजता हृदयक्रिया बंद पडून एकएकीं देवाज्ञा झाली. दास बाबूंच्या मृत्यूनंतर कलकत्यास स्वराज्यपक्षाची सभा भरुन तेथें पुढील धोरणासंबंधीं कांहीं चर्चा झाली. या चर्चेत डॉ.मुंजे, बॅ. अभ्यंकर, डॉ. खरे, बॅ. गोविंदराव देशमुख, वगैरे मंडळींनीं भाग घेतला होता. प्रतियोगी सहकारिता आणि सन्मान्य सहकारिता या शब्दांना नंतर महाराष्ट्रांतून खूपच कीस निघाला. मुडीमन कमिटीचा रिपोर्ट याच वेळीं बाहेर पडला. परंतु त्यातील शिफारसी हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड बर्कनहेड यांनी मान्य केल्या नाहींत. आणि हिन्दुस्थानात एक कमिशन पाठविण्याचें त्यांनीं जाहीर केलें.

दोन्ही पक्षांची मोहीम कानपूर काँग्रेसपर्यंत थांबविण्यांत आली. कानपुरास पुनः समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यात आला. तथापि तो यशस्वी होऊ शकला नाही. कानपूर काँग्रेसनें स्वराज्य पक्षानें असेंब्लीत केलेल्या राष्ट्रीय मागणीला पाठिंबा दिला. या मागणी संबंधीं सरकारनें आपले धोरण फेब्रुवारी १९२६ पर्यंत जाहीर करावें, तें न केल्यास किंवा असमाधानकारक असल्यास असेंब्लीतील सभासदांनीं 'फायनान्स बिल' फेटाळण्यास अनुकूल मत देऊन, असेंब्लींतून उठून यावें, वगैरे ठराव पास करण्यांत आले. या वेळीं स्वराज्यपक्षानें असेंब्लीतील किंवा प्रांतिक कायदे मंडळांतील राजीनामे मात्र द्यावयाचे नव्हते. या नंतर डॉ. मुंजे व लो. अणे यांनीं आपापल्या जागांचे राजीनामे दिले. डॉ. मुंजे यांच्या राजिनाम्यानें रिकाम्या झालेल्या जागेची निवडणूक ता. १३ फेब्रुवारी १९२६ रोजीं होऊन श्री. नीळकंठराव उधोजी हे स्वराज्यपक्षातर्फे निवडून आले. व स्वतंत्र स्वराज्य पक्षातर्फे उभे राहिलेले उमेदवार श्री. भवानीशंकर नियोगी यांचा पराभव झाला.

निवडणुकीचे भानगडींत एक मनोरंजक प्रकार घडला. डॉ. मुंजे या वेळीं प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. नागपूरतर्फे श्री. उधोजी यांस उभे करण्यासंबंधानें प्रांतिक कमिटींत ठराव आला तेव्हा प्रां. कां. क. चा अध्यक्ष या नात्यानें श्री. उधोजी यांची उमेदवारी मी स्वीकारतो आणि प्र. स. पक्षाचा अध्यक्ष या नात्यानें श्री. नियोगी यास माझा पाठिंबा राहील असें डॉ. मुंज्यांनीं सांगितलें. या विरोधी वर्तनाचा समन्वय कसा करावयाचा याबद्दल डॉ. खरे यांनीं त्याचें रूलिंग मागितलें तेव्हा डॉ. मुंजे गुळमुळीतपणें म्हणाले "असें होऊ शकतें".

रा. तांबे यांनीं एक्झिक्युटिव्ह कौन्सिलरशिप स्वीकारल्यामुळें अध्यक्षाच्या रिकाम्या झालेल्या जागेकरितां श्री. या. मा. काळे यांची निवड करण्यात आली. आणि मध्यप्रांतांतला स्वराज्यपक्ष दिवाणाचा पगार नामंजूर करून काँग्रेसच्या आज्ञेप्रमाणें कौंसिलातून उठून आला. सोमवार ता. ८ मार्च रोजीं पं. नेहरूंनीं दे. राव यास तार करून कानपूर काँग्रेसच्या ठरावाची आठवण करून दिली. या तारेनें नागपूरच्या

स्वराज्यपक्षांत खूपच गोंधळ उडवून दिला. पं. रविशंकर शुक्ल यांचें म्हणणें कीं, पंडितजींची आज्ञा पाळलीच पाहिजे. उलट राघवेंद्रराव वगैरे मंडळी आज्ञाभंग केल्याचा आरोप तर येऊं नये व कौंसिलांतून तर उठून जावें लागूं नये अशी खटपट करीत होते. १९२६ च्या एप्रिल महिन्यात साबरमती येथें स्वराज्यपक्ष आणि प्रतिसहकारपक्ष या दोहोंत समेट झाला. परंतु पुढारी समेट करून बाहेर येतात न येतात तोंच त्या समेटाचा बोजवारा उडाला आणि ऐक्याशिवाय गत्यंतर नाहीं असें जरी प्रत्येकास वाटत होतें तरी तें शक्य झालें नाहीं. यानंतर बॅ. अभ्यंकर यांच्या नेतृत्वाखालीं प्रांतिक स्वराज्यपक्ष, आणि डॉ. मुंजे यांचा प्रति-सहकारपक्ष या दोहोंत जें भारतीय युद्ध झालें त्याची इत्थंभूत हकीकत या ठिकाणीं देण्यास अवकाश नाहीं.

ऑ. इं. कां. कमिटीची मार्च १९२६ मधें दिल्ली येथें सभा भरून स्वराज्यपक्ष आणि कांग्रेस कमिट्या यांनीं कायदे, मंडळाच्या बाबतींत एकमेकांशीं पूर्ण सहकार्य करावें आणि स्वराज्यपक्षाला लागेल ती मदत कांग्रेसपक्षानें द्यावी असें ठरविण्यांत आलें. आणि १९२६ च्या निवडणुकी कांग्रेसच्या नांवावर व अधिकाराखालीं कांग्रेसनें आखून दिलेल्या कार्यक्रमाप्रमाणें लढविण्यात आल्या. स्वराज्यपक्षांतील कांहीं व्यक्ति जरी स्वराज्यपक्षाच्या मूल तत्त्वापासून आणि कार्यक्रमापासून ढळल्या तरी तो पक्ष कांग्रेसमध्यें विलीन होईंपर्यंत आपल्या मूल तत्त्वावर व कार्यक्रमा-वर अढळ राहिला याचें श्रेय सर्व हिंदुस्थानापुरतें जसें दे. बॅ. चित्तरंजन दास, पं. मोतीलाल नेहरू वगैरे कर्तृत्ववान्, शीलवान आणि निःस्वार्थी पुढाऱ्यांनाच देणें योग्य होईल तसेंच तें मराठी मध्यप्रांतापुरतें तरी बॅ. अभ्यंकर, नीलकंठराव उधोजी, डॉ. खरे वगैरे पुढाऱ्यांसच मुख्यतः द्यावें लागेल. स्वराज्यपक्षानें जें यश आणि जी कीर्ति मिळविली त्याचे पडसाद अजूनही हिंदुस्थानच्या राजकीय वातावरणांत ऐकावयास मिळतात. भावी इतिहासकाराला स्वराज्य पक्षाच्या कारकीर्दीचें वर्णन लिहिण्याकरिता हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासांत थोडींबहुत पानें तरी राखून ठेवावीं लागतीलच.

---

## प्रकरण सहावें.

# असहयोगयुगाचा दशवार्षिक समारोप

१९२० पासून १९२९ अखेरपावेतों सुमारें दहा वर्षांच्या काळांत महात्मा गांधींची लोकप्रियता आणि असहयोगाच्या तत्त्वज्ञानानें चढउताराची एक पूर्ण प्रदक्षिणा केली व १९३०च्या सुरवातीस महात्मा गांधी पुनः आपल्या पूर्ण तेजानें हिंदी राजकारणात चमकूं लागले. १९२१ सालीं वर्षभर असहयोगाचा कार्यक्रम चालविल्यानंतर मतभेद सुरू झाला. १९२२ सालीं गयेस तो स्पष्ट झाला. पुढें स्वराज्यपक्षानें जोर धरला व काँग्रेसला शेवटी आपल्या कार्यक्रमास मान्यता देण्यास भाग पाडलें. . या काळांत म. गांधीनीं काँग्रेसमधून निवृत्त होऊन खादीवर भर ठेवला होता. १९२६ सालीं स्वराज्यपक्षाला फाटे फुटून प्रतिसहकारपक्ष जन्मास आला. १९२७ सालीं मद्रासनें पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव मान्य केला. पुढें सायमन कमिशनची नेमणूक झाली व काँग्रेसनें पं. मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं सर्वपक्षीय कमिटी नेमून तिनें आपल्या रिपोर्टांत डोमिनिअन स्टेटस मान्य केल्यामुळें १९२८ ला कलकत्ता काँग्रेसमध्यें खडाजंगी झाली. पण म. गांधींमुळे तो रिपोर्ट पास होऊं शकला. ३१ डिसेंबर १९२९ पावेतों सरकार हा रिपोर्ट मान्य न करील तर मीही स्वातंत्र्यवादी होईन असें म. गांधींनीं आश्वासन दिल्यामुळें सुभापबाबूंच्या स्वातंत्र्यवादी विचारसरणीच्या लोकांचें समाधान झालें. म. गांधी कलकत्त्यासच पुनः राजकारणांत पडले. यानंतर १९२९ सालीं म. गांधी वगैरे मंडळींनीं लॉर्ड इर्विन याची भेट घेतली पण लॉर्ड रीडिंग–प्रधानमंडळ डोमिनिअन स्टेटसच्या मागणीला

पाठिंबा देईल असें म. गांधींना आश्वासन देऊं न शकल्यामुळें मुलाखत फोल ठरली व नेहरू रिपोर्टही निकालांत निघाला. या परिस्थितीमुळेंच पुढें लाहोरला पं. जवाहरलाल यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या काँग्रेसनें ३१।१२।२९ ला मध्यरात्रीं पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास करून सविनय कायदेभंगाच्या भावी अस्त्राची शक्यताही लोकांच्या नजरेस आणून दिली. १९२८च्या सुरुवातीस झालेल्या बारडोलीच्या सत्याग्रहामुळें जनतेला एक प्रकारचा आत्मविश्वास वाटत होता. यापुढें लवकरच कायदेभंग सुरू होऊन ती चळवळ आपल्या प्रांतात किती जोरानें चालविली गेली ती सविस्तर हकीकत पुढील भागांत येणारच आहे.

आमच्या प्रांतातही या दहा वर्षांत राजकारणाची ओढाताण कशी झाली हें मागील पाच प्रकरणांत विस्तारानें दिलें आहे. नागपूर काँग्रेसमध्यें पास झालेला कार्यक्रम त्या वेळच्या स्थानिक काँग्रेस अधिकाऱ्यांना मानवत नव्हता सबब या प्रांतात कट्टर व फेरवादी पक्ष निर्माण झाले आणि फेरवाद्यांनीं काँग्रेसचीं सूत्रें आपले हातीं घेतलीं. स्वराज्यपक्षाच्या आमदानींत कट्टर पक्षांतील मंडळींनीं आपल्या बुद्धीप्रमाणें नागपुरांतील झेंडा सत्याग्रह केला पण फेरवादी काँग्रेसपदाधिकाऱ्यांनीं त्यांत भाग घेतला नाहीं. यानंतर स्वराज्यपक्षातच दुही होऊन त्याचीं पुनः दोन शकलें झालीं आणि डॉ. मुंजे आणि त्यांचा पक्ष एकीकडे व श्री. दादासाहेब उधोजी, बॅ. अभ्यंकर व डॉ. खरे हे दुसरीकडे असे फुटून निघाले. १९२५ च्या कानपूर काँग्रेसमध्यें काँग्रेसनें स्वराज्यपक्षास अंतर्भूत करून कौन्सिलांतील अडवणुकीचें धोरण मान्य केलें. हेंही धोरण डॉ. मुंजे पक्षाला मान्य झालें नाहीं म्हणून पुढें बॅ. अभ्यंकर व पूर्वींच्या कट्टर पक्षाचो सेठ पूनमचंद प्रभृति मंडळी एकत्र होऊन त्यांनीं स्थानिक काँग्रेस कमिट्या काबीज करण्याचा इरादा केला पण या कार्यक्रमाला सुमारें दोन वर्षे लागलीं. डॉ. मुंजे पक्षानें निवडणुकींच्या बाबतींत शक्य त्या युक्त्या केल्या, त्यामुळें निवडणुकीसंबंधीं नेहमीं वाद उपस्थित होत. क्वचित्

निवडणुकी झाल्या नाहीं म्हणून पुनः पुनः तेच सभासद ऑ. इं. कां. क. वर जात. एकदा तर निवडणुकी ऑ. इं. कां. क. तर्फे आलेल्या श्री. मोहनलाल सक्से नायांच्या देखरेखी खालीं झाल्या. शेवटीं २१-१०-२८ रोजीं झालेल्या निवडणुकींत वें अभ्यंकरांना प्रा. कां. क. चे अध्यक्ष निवडण्यांत येऊन काँग्रेसच्या पदाधिकारित्वासंबंधींचें भांडण संपलें.

१९२३ सालीं स्वराज्यपक्षास निवडणुकींत भाग घेण्यास परवानगी देणकरितां दिल्लीस काँग्रेसचें खास अधिवेशन झालें. मौ. अबुल कलाम आझाद अध्यक्ष होते. झेंडा सत्याग्रहांतील मंडळी याचे पूर्वी सुटली होती. त्यापैकीं पुष्कळ लोक परस्पर दिल्लीस गेले. या वर्षी सप्टेंबर मध्यें नागपुरांत गणेशोत्सव प्रसंगीं हिन्दुमुसलमानांत गणपतीउत्सवावरून तेढ निर्माण झाली होती. पण थोडक्यांतच प्रकरण आटोपलें. १९२३ सालची काँग्रेस कोकोनाड्यास मौ. महंमदअली यांच्या अध्यक्षतेखालीं झाली तेथें दिल्लीचे ठराव मंजूर करण्यांत आले.

१९२४ सालीं महात्मा गांधींचें अपेंडिसायटिसचें ऑपरेशन होऊन त्यांची सुटका झाली. त्या वेळीं हिन्दुस्थानभर हिन्दुमुसलमानांच्या दंग्याचें पीक पिकलें होतें. १३ जुलैला नागपुरासही थिएटररोड जवळ हिन्दुमुसलमानांची मारामारी झाली व कामठींतही लहानसा दंगा झाला. यामुळें सप्टेंबर महिन्यांत त्यांनीं २१ दिवसांचा उपवास केला. दिल्लीस या उपवासाच्या कालातच ऐक्यपरिषद झाली २६ आक्टोबरला मौ. अबुल कलाम आझाद व पं० मोतीलाल नेहरू येथें आले होते. त्यांच्या निर्णयावर हिन्दुमुसलमान पुढाऱ्यांनीं मान्यतादर्शक सह्या केल्या. या वर्षीची काँग्रेस बेळगावला म० गांधी यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. तेथें गांधी-दास यांचें संयुक्त पत्रक निघालें. या पत्रकान्वयें परदेशी कापडावरील बहिष्काराव्यतिरिक्त असहकारितेचा इतर सर्व कार्यक्रम तहकूब करण्यांत येऊन विधायक कार्यक्रमावर जोर द्यावा असें

ठरविण्यांत आलें. ही काग्रेस कमालीची आक्षेपशीर होऊन दोनच दिवसांत संपली. म० गांधींचें भाषणही फक्त अर्धा तासच झालें.

१९२५ सालीं महात्मा गांधींनीं चरखासंघ काढून राजकारणांत कौंसिलवादी पक्षाला पूर्ण वाव करून दिला. या वर्षाची काँग्रेस कानपुरास श्री. सरोजिनीबाई नायडू यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. जानेवारी १९२६ मध्यें आमच्या प्रांतांतील स्वराज्यपक्षांत मतभेद होऊन पोटनिवडणुकींत श्री. दादासाहेब उधोजी हे प्र. स. पक्षाच्या श्री. भवानीशंकरांचा पराभव करून निवडून आले. पुढें ९ मार्चला स्वराज्यपक्ष प्रांतिक कौंसिलातून उठून आला व १६ मार्चला गव्हर्नरांनीं कौंसिल खारीज केलें. यानंतर कौंसिलच्या निवडणुकी झाल्या त्यांत स्वराज्यपक्षाचे उमेदवार पडले. स्वराज्यपक्षाचे डॉ. खरे वैयक्तिक लोकप्रियतेवर व श्री. देशमुखे हे ब्राह्मणेतर म्हणूनच निवडून आले. या वर्षाच्या असेंब्ली निवडणुकींतही स्वराज्यपक्षाचे उमेदवार बॅ. अभ्यंकर यांचा पराभव होऊन डॉ. मुंजे हे प्र. स. वादी पक्षातर्फे निवडून आले. १९२६ सालीं आक्टोबर महिन्यांत आर्वीचा हिंदु मुसलमानांचा भयंकर दंगा झाला. ता. २१।१२।२६ ला म. गांधींनीं येथें चरखासंघाची शाखा स्थापन केली. २३।१२ ला स्वामी श्रद्धानंदजींचा दिल्लीस खून झाला. या वर्षाची काँग्रेस गोहत्तीला श्री. श्रीनिवास अय्यंगार यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती.

१९२७ सालीं आगस्ट महिन्यांत येथें सर शंकरन् नायर यांच्या अध्यक्षतेखालीं हिन्दुमहासभेचें अधिवेशन झालें. ११।९।२७ रोजीं एका मिरवणुकीच्या निमित्तावरून नागपुरास हिन्दु मुसलमानांचा भयंकर दंगा झाला व अनेक लोकांचे बळी पडले. ९।११ ला सायमन कमिशनसर्चीं नावें प्रसिद्ध झाली त्यांत एकही हिंदी सभासद नसल्यामुळें प्रांतभर हलकल्लोळ पडला. यावर्षीच श्री. आवारींनीं शस्त्रसत्याग्रह सुरू केला होता. त्यांना २४ रोजीं पकडण्यांत येऊन निरनिराळ्या तीन भाषणांमुळें ४ गुन्हा एकंदर चार वर्षाची स. म. ची शिक्षा देण्यांत आली. श्री. दर्डेकर

ढवळे व श्री. तिजारे यानीं आवारींच्या मार्गे शस्त्रसत्याग्रहाचें नेतृत्व केलें. २२ जूनला श्री. सांबमूर्ती व श्री. भरूचा हे या सत्याग्रहाची पाहणी करण्याकरिता आले होते. २ जुलैपासून हा सत्याग्रह ओसरून शेवटीं बंद झाला. या वर्षीची कांग्रेस मद्रासला डॉ. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखाली झाली, व तेथें स्वातंत्र्याचा ठराव प्रथम पास झाला.

१९२८ सालीं फेब्रुवारींत सायमन कमिशन मुंबईस उतरलें त्या दिवशीं प्रांतभर कडकडीत हरताळ पडला. नंतर जून महिन्यांत मि. ब्रॅडले यांच्या अध्यक्षतेखाली नागपुरास मध्यप्रांत कास्तकार अधिवेशन झालें. डॉ. खरे स्वागताध्यक्ष होते. २१ आक्टोबरला शुक्रवारतलावाच्या पूर्व किनाऱ्यावरील लो. टिळकांच्या पुतळ्याचें डॉ. अन्सारींच्या हस्तें अनावरण झालें. लोकमान्यांचें यादात पडलेलें हे स्मारक घडवून आणण्यांत वें. अभ्यंकर व श्री. भवानीशंकर नियोगी यांनीं खटपट व तडफ दाखविली व वें. अभ्यंकरानी स्वागताध्यक्ष या नात्यानें हृदय पिळवटून भाषण केलें. हा प्रसंग आपले हस्तें घडून आला याचें त्यांना फार समाधान वाटे. या वर्षीची कांग्रेस कलकत्त्यास पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली कल्पनातीत थाटामाटानें पार पडली. या ठिकाणीं महात्मा गांधी पुनः नव्या उत्साहानें कांग्रेसच्या राजकारणात पडले.

१९२९ सालीं ९–१० मार्च रोजीं कांग्रेसतर्फे नागपुरास प्रांतिक राजकीय परिषद भरली. श्री. नरिमन अध्यक्ष व डॉ. खरे स्वागताध्यक्ष होते. या कान्फरंसमध्यें दिवाणगिऱ्या घेऊं नयेत असा वें. अभ्यंकरानीं ठराव आणला व डॉ. खऱ्यांनीं त्याला दुजोरा दिला. १४ मार्चला नागपुरास सायमन कमिशन आलें. त्या दिवशीं कडक हरताळ पडून काळ्या झेंड्यांनीं सायमन साहेबाचें स्वागत करण्यांत आलें. या वर्षी प्रांतानें कांग्रेससभासद बनविण्याचा कार्यक्रम फारच नेटानें केला. यांच्याला जरी ६५८२ सभासदांचीच जबाबदारी आली तरी ८००० सभासद करण्यात आले. ६४०० रु.ची खादी विकली. परदेशी कापडा-

च्या २८ होळ्या झाल्या. ६८ सभा, ११९ मिरवणुकी, परदेशी कापड गोळा करण्यास १८१५फेऱ्या असा कार्यक्रम झाला. एकंदर १३म्युनिसिपालिट्यांनीं खादीवरील कर माफ करण्याचे ठराव केले. ३० नोव्हेंबरला येथें पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं ऑ. इं. ट्रे. यु. ची परिषद झाली.

या वर्षाची जी काँग्रेस लाहोरास पं. जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं झाली ती भावी कायदेभंग युद्धाचें मंगलाचरणच होय. २६ जानेवारी १९३० हा स्वातंत्र्यदिन पाळण्याचा ठराव पास झाला. त्या प्रमाणें नागपुरासही स्वातंत्र्यदिन पाळला गेला. १२ तारखेस महात्मा गांधींच्या प्रसिद्ध दांडी प्रयाणाला सुरुवात होऊन ६ एप्रिलला त्यांनीं सत्याग्रह केला व कायदेभंगाचें शिंग फुंकलें गेलें. आमच्या प्रांतांतही या युद्धाचा लवकरच प्रतिध्वनि उमटून कायदेभंग सुरू झाला. या रोमांचकारी काळाचा वृत्तांत पुढील भागांत दिला आहे.

---

प्रमाणें सरकारी पदव्यांचाही बहिष्कार काँग्रेसनें पुकारला. रावसाहेब साळवे यांनी एव्हांच रावसाहेबी सोडली. सायमन कमिशनच्या बहिष्कारापासून सुरू झालेल्या असंतोषास लाहोरच्या काँग्रेसमधील संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावामुळें भरती आली. अखिल जनतेचीं मनें सरकारविरुद्ध पसरलेल्या असंतोषानें भरून गेलीं व पुढें होणाऱ्या स्वातंत्र्य युद्धासाठीं किंवा कायदे-भंगाच्या अभूतपूर्व लढाईसाठीं, सर्व सज्ज होते.

२६ जानेवारी १९३० हा दिवस स्वातंत्र्यदिन म्हणून काँग्रेसनें मुकर केला होता व खेडोपाडीं स्वातंत्र्याचा संदेश पसरविण्याची आज्ञा केली. त्या संदेशास अनुसरून प्रांतभर काँग्रेसच्या स्वातंत्र्य संदेशाची घोषणा करण्यांत आली. महत्त्वाच्या केंद्रस्थानीं स्वातंत्र्याचा ठराव वाचण्यांत आला.

महात्मा गांधींचें दांडीचें कूच सुरू होईपर्यंत जनतेचा असंतोष किती तीव्र झाला आहे ह्याचे वास्तविक स्वरुप कोणाच्याच लक्षांत येणें शक्य नव्हतें. जानेवारी नंतर महात्मा गांधींनीं जसजसें आपलें धोरण व्यक्त केलें तसतसें प्रांतिक कार्यकर्तेंही आपल्या प्रांताची तयारी करूं लागले. मार्चमध्यें प्रांतिक काँग्रेस कमेटीनें पहिल्या युद्ध–कमिटीच्या सभासदांची निवड केली, व १६ तारखेस बॅ. अभ्यंकर, डॉ. खरे, श्री. भगवानदीन सेठ जमनालालजी, श्री. निळकंठराव देशमुख व सेठ पुनमचंद रांका ह्यांच्याकडून युद्धाची द्वाही फिरविली गेली. तेव्हांपासून सर्व प्रांतभर दौरे काढले. ठिकठिकाणीं युद्ध मंडळें स्थापली व स्वयंसेवक नोंदविण्यास आरंभ केला. १७ ते रोजीं श्री. बापूराव हरकरे यांना सौंसर स्टेशनवर त्यांच्या व्याख्यानामुळें चिडलेल्या पोलीसांनी बेदम मारलें.

दांडीस महात्मा गांधींनीं मिठाचा कायदेभंग केल्यानंतर मराठी मध्य-प्रांतांतून दहिहंडा येथें मिठाच्या सत्याग्रहासाठीं श्री. भय्याजी सहस्रबुद्धे यांच्या नेतृत्वाखालीं ९ एप्रिल १९३० रोजीं रानडे, डांगरे, वाघमारे व दोक ह्यांची एक

तुकडी रवाना झाली. तेथें १३ तारखेस त्यांनीं सत्याग्रह केला. नागपुरासही त्याच तारखेस वॅ. अभ्यंकरांनीं मीठ तयार करून मिठाची पुडी २५० रुपयांस विकली. १५ तारखेस पुन्हां जाहीर सभा भरून श्री. चैतन्यदास प्रभृति मंडळींनीं बेकायदा मिठाची विक्री केली.

जनतेमधील हा भरतीस आलेला उत्साह पाहून डॉ० मुंजे यांनीं देखील मिठाचा सत्याग्रह केला, मध्यंतरी शिरोडें, धारास्ना इत्यादि ठिकाणीं मिठागारावर हल्ले चढविण्यांत आले. पुढे जून मध्यें १८ स्वयंसेवकांची एक तुकडी श्री. सहस्त्रबुद्धे ह्यांच्या नेतृत्वाखालीं धारास्ना येथें पाठविण्यांत आली पण खानदेशांत जळगांव येथें ह्या तुकडीस पकडण्यांत आलें. स्वयंसेवकांस ३ ते ६ महिन्यांची शिक्षा फर्माविण्यांत आली, विलेपार्लें येथेंही कांहीं मंडळी गेली. याच सुमारास राष्ट्रीय आठवड्याचा कार्यक्रम आखण्यांत आला. पंडित जवाहरलाल ह्यांचा दिन साजरा करण्यांत आला व कायदेभंगाचा प्रचार, खादी व स्वयंसेवकांची नोंद इत्यादि प्रकारांनीं सत्याग्रहाचा ध्वनी प्रांतभर घुमूं लागला. डॉ० खरे, त्यांच्या पत्नी सौ. इंदिराबाई खरे व मुलगी कृष्णाबाई यांनीं नाशिकला जाहीर सभेंत बेकायदा मीठ विकलें. असें असलें तरी या प्रांतास समुद्रकिनारा नसल्यामुळें येथें या सत्याग्रहाला जोर येणें शक्य नव्हतें. म्हणून युद्ध मंडळानें जप्त वाङ्मयाचा प्रचारकरण्याचें ठरविलें, व तो कार्यक्रम हातीं घेतला. ९ मे रोजीं बॅ० अभ्यंकर यांनीं " भारतमें अंग्रेजी राज " ह्या जप्त पुस्तकांतील उतारा प्रचंड जाहीर सभेंत वाचून दाखवून कायदेभंग केला. श्री० दादासाहेब उधोजी ह्यावेळीं हजर होते. सर्व प्रांतभर प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं कायदेभंग घडवून आणण्याकरितां ता० २१ मे हा दिवस मुक्रर करण्यांत आला. नागपुरांत एकाच दिवशीं १३ सभा करण्यांत आल्या. ह्या सभांत काकोरीके शहीद, भारतमें अंग्रेजी राज किंवा सावरकरांचा मॅझीनी ह्या पुस्तकांतील उतारे वाचण्यांत आले.

प्रकारांत झाला. परदेशी कापड विकणाऱ्यांचे धाव दणाणले व ते परदेशी कापडाचे गठ्ठे बांधून ठेवण्यास तयार झाले. एवढेंच नाहीं तर कॉंग्रेसचे सील देखील त्यांनीं लावलें. सुसंस्कृत स्त्री स्वयंसेविका दुकानावर पिकेटींग करावयास जाऊं लागलेल्या पाहून परदेशी कापडाची चटक लागलेल्यांना स्वतःची शरम वाटूं लागली व कापडाचे व्यापारी कॉंग्रेसची आज्ञा बराबर मानूं लागले. व्यापाऱ्यांनीं आपल्या सभा भरविल्या, मिरवणुकी काढल्या, नवीन परदेशी कापड न बोलावण्याच्या शपथा घेतल्या व जो व्यापारी परदेशी कापड मागवील त्यास १०१ रु. दंड होईल असा निर्बंध त्यानीं आपणांवर लादून घेतला.

श्री. भगवानदीन ह्यांच्या अटकेनंतर श्री. पुनमचंदजी ह्यांच्या युद्धमंडळानें श्री. वाचासुंदर यांस बहिष्कार कमेटीचे सेक्रेटरी नेमून परदेशी कापडाच्या बहिष्काराचा प्रश्न तडीस लावण्याचा निश्चय केला. मेच्या अखेरीस २५० स्वयंसेवकांच्या सहाय्यानें सर्व शहरभर पिकेटींग सुरूं झालें. त्याचा व युद्धमंडळाच्या सभासदांच्या वाटघाटीचा परिणाम होऊन व्यापाऱ्यांनीं इतवारी क्लॉथ असोसिएशन स्थापून त्या संस्थेची मोहोर परदेशी मालाच्या गठ्ठयावर लावण्याची तयारी दाखविली व दुकानांची तपासणी करण्याचा हक्क कॉंग्रेसला दिला. परदेशी कापडाच्या बहिष्काराची अशी व्यवस्था लावल्यानंतर २६ जूनला नागपूरच्या व्यापाऱ्यांनीं प्रचंड मिरवणूक काढली. त्यांत २० हजार पुरुष व ५०० ते १००० स्त्रिया सामील झाल्या होत्या. नागपूर येथील कापडाच्या १२५ दुकानांपैकीं सुमारें १०० दुकानांनीं आपल्या मालावर मोहोर केली. गठ्ठे बांधून ठेवलेल्या परदेशी कापडाची किंमत सरासरीनें ३॥ लक्ष इतकी होती. कांहीं शिंप्यांनीं परदेशी कपडा न शिवण्याचा निश्चय केला. नागपूरच्या कोष्टी लोकांनीं व त्यांच्या पुढाऱ्यांनीं स्वदेशी सुत वापरावें असा हेतुनें कसोशीनें खटपट केली. खिश्चन ॲसोसिएशन, स्टुडंटस् युनिअन, नाभिकोदय मंडळ, दलित युद्धमंडळ वगैरे संस्थांनीं परदेशी कापड बहिष्कारास शक्य तितकी मदत केली. सितावर्डी व्यापारी संघ, महाल व्यापारी संघ,

या संघांनीं परदेशी कापडाबरोबरच सिगारेट्स, साबू, आगपेट्या, परदेशी साखर, वगैरे वस्तूंतदेखील बहिष्काराचे तत्व अमलांत आणून स्वदेशीचा पुरस्कार केला. डॉक्टरांनींदेखील आपली सभा भरवून स्वदेशी औषधांवर जोर दिला. स्टुडन्ट्स् युनियन, नवयुवक संघ, नील सिटी हॉयस्कूल, कोऑपरेटिव्ह स्टोअर्स ह्या संस्थांनींही आस्थेवाईकपणानें व व्यवस्थित रितीनें स्वदेशी व्रताचा प्रचार केला.

दारुच्या व्यापाऱ्यांवरहि काँग्रेसनें प्रेमाचें नियंत्रण बसविलें जातिपंचायतीनें दारु न पिण्याचे ठराव केले व आपआपसांत दंड ठरविलें. पंचायतीनीं त्यांच्यावर सामाजिक बहिष्काराचेंहि क्वचित शस्त्र उगारलें. या सर्व घटनांचा परिणाम दारुविक्रीवर फार तीव्रतेनें झाला. स्वतः महात्मा गांधींनीं ताडीचीं झाडें तोडण्याचें कार्य हातीं घेतलें होतें व वर्धा वगैरे ठांवूत शिंदीचीं झाडें तोडण्याचा कार्यक्रम जारीनें अमलांत आला होता. ह्यानें देखील दारुचा तिटकारा जनतेच्या हृदयांत वाटण्यास मदत केली. ठेकेदारांस शिंदीचा पुरवठा करण्याची पंचाइत पडूं लागली. नागपूर सेंटरला ९१ ठेके दिले जात तेथें फक्त २०।२५ च ठेके दिले गेले. दारुबंदीचे व दारु दुकानावर पिकेटिंग करण्याचें काम नागपुरास स्त्री स्वयंसेविकांस सुपूर्त दिले गेले नाहीं, तें पुरुषांनींच आपल्याकडे घेतलें. पुढें पुढें दारु दुकानाच्या पिकेटिंग बरोबरच बेअर हौस ( गडंग ) वर पिकेटिंग सुरुं झालें. व बेअर हौसवर स्वयंसेवकांची पथकें पाठविण्यांत आलीं. नागपूर येथें प्रत्येक गुत्त्यावर ५।१० स्वयंसेवक असत. ह्या पिकेटिंगचा परिणाम असा झाला कीं कांहीं गुत्ते बंदही पडले. शिवाय वर्किंग कमिटीनें लष्कर व फौज ह्यांना उद्देशून काढलेल्या नं० ६ ठरावाच्या हजारों प्रति वाटण्यांत आल्या व डॉ० खरे यांनी पूर्वी झालेल्याप्रमाणें या ठरावाचा प्रचार जाहीर सभांतून केला.

ह्याच युद्धमंडळानें प्रकाशन विभागाची व्यवस्था लावून प्रेस ऑर्डिनन्सला प्रत्युत्तर म्हणून युद्धमंडळाच्या देखरेखीखालीं कांग्रेस बुलेटीन सुरुं केलें.

प्रकाशन विभागाचे प्रमुख श्री० बाबासाहेब देशमुख होते. हें कांग्रेस बुलेटीन प्रथम थोडे दिवस साप्ताहिक म्हणून निघालें व पुढें पुढें इतर छापखाने कांग्रेसचा मजकूर छापीनासे झाले तसतसें आपल्या प्रचारासाठीं युद्धमंडळास एक दैनिक काढणें भागच पडलें. युद्धमंडळाचें हेंच मुखपत्र होतें व ह्यांतच युद्धमंडळाचा सर्व कार्यक्रम जबाबदारपणानें जाहीर होई. परदेशी कापडाचा बहिष्कार व दारुबंदी ह्यांची व्यवस्था केल्यानंतर युद्धमंडळानें ह्या प्रांताचे वैशिष्ट्य लक्षांत घेऊन जंगल सत्याग्रहाची मोहीम सुरु करण्याचा घाट घातला. हा सत्याग्रह कोठें व कसा सुरुं करता येईल ह्याचा विचार करण्यासाठीं डॉ० खरे, श्री. बाबासाहेब देशमुख व श्री० आप्पासाहेब ढवळे ह्यांची कमिटी नेमण्यांत आली. ह्या कमिटीनें वर्धा, आर्वी, तळेगांव, कोंढाळी, काटोल, उमरेड येथें दौरा करुन पहाणी केली व तळेगांवच्या जंगलांत सत्याग्रह करण्याचें मुक्रर केलें. तळेगांव येथें सत्याग्रह शिबीर उघडण्याचें ठरविलें. आर्वी तळेगांव हा टपू सत्याग्रहासाठीं ठरविला. १७ जुलै रोजीं तळेगांव येथें सत्याग्रह शिबिरांत युद्धमंडळानें ध्वजारोपण केलें.

ह्याच युद्धमंडळानें द्रव्यनिधी जमविण्याची विशेष आवश्यकतेनें खटपट चालविली. सभांमधून श्रोते स्वयंस्फूर्तीनें द्रव्य देत. परंतु व्यापारी मंडळ व शहरांतील इतर नागरीक ह्यांच्याकडून निधी जमविण्याचें कार्यही युद्धमंडळानें जारीनें हातीं घेतलें. युद्धमंडळाचें ऑफीस व निरनिराळीं खातीं ह्यांची आखणी करुन त्यांवर निरनिराळ्या योग्य अशा कार्यकर्त्यांची योजना केली. बॅ. अभ्यंकरांच्या अटकेनंतर जे पावणेदोन महिने ह्या युद्धमंडळास मिळाले त्यांत तिनें महत्वाचें कार्य करुन व पुढील जंगल सत्याग्रहाचा भरभक्कम पाया भरुन ठेविला. अर्थात्‌च श्री० पुनमचंद रांका यांच्या युद्धमंडळानें कायदेभंगासाठीं केलेली स्पृहणीय कामगिरी हळुंहळूं सरकारच्या डोळ्यांत खुपूं लागली. मध्यप्रांत सरकार धीमेपणानें व आस्तेकदम अशीं पावलें टाकीत असले तरी ह्या तीव्रतेनें पसरणाऱ्या असंतोषास आळा घालणें त्यांस जरुरच वाटलें. २१ जुलै रोजी १२॥

वाजतां रात्रीं लोकक्षोभ टाळावा ह्या हेतूनें डॉ० खरे, बाबासाहेब देशमुख, शेठ पुनमचंद रांका, व आचार्य धर्माधिकारी ह्यांस अटक करण्यांत आली. २२ जुलै रोजीं नागपुरांत पूर्ण हरताळ पडला. २०००० लोकांची अजस्र मिरवणूक निघाली. शाळा व कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं तींत अहमहमिकतेनें भाग घेतला. श्री० रुईकर नायडू प्रभृती पुढारी नागपुरांतील कामकऱ्यांचे नायक होते. तेही कांग्रेसच्या चळवळीस आपल्या परिणामकारक व स्फूर्तिजनक वक्तृत्वानें सहाय्य करीत. श्री. रुईकर आपल्या कामगार अनुयायांसह अशा प्रसंगोपात निघणाऱ्या प्रचंड मिरवणुकींत सामील होत. प्रतिसहकारपक्षाचे पुढारी देखील हा अपूर्व उत्साह पाहून कांग्रेसच्या कार्यक्रमास साथ देत. ह्या प्रसंगीं नागपुरांतील बहुतेक कार्यकर्ते चिटणीस पार्कांत एकत्र झाले होते. सर्व चिटणीसपार्क माणसांनीं व स्त्रियांनीं फुलून गेले होते. स्त्रियांच्या व मुलांच्या उत्साहास भरती आली होती. दोन व्यासपीठें करावीं लागलीं. अशा सभा नागपूरच्या इतिहासांत क्वचितच भरल्या.

श्री० पुनमचंदजींनंतर श्री० गणपतराव टिकेकर हे अध्यक्षपदावर आरूढ झाले. व श्री० पटवर्धन श्री० ढवळे व श्री० टिकेकर ह्यांनीं आपलें युद्धमंडळ बनविलें. मागचे सर्वच सभासद गिरफ्तार झाले असल्यामुळें तीनच सभासदांची सुटसुटीत युद्धमंडळें आतां बनण्यास प्रारंभ झाला. श्री० टिकेकर हे महात्मा गांधींच्या तत्वज्ञानाचे व कार्यक्रमाचे पुरस्कर्ते, राष्ट्रीय शिक्षणाचे आधारस्तंभ खादीप्रेमी व शिस्तीचे भोक्ते ह्मणून नागपूर प्रांतांत प्रसिद्ध होते. गेले ४ महीनें खादी व टकळी ह्यांचा संदेश त्यांनीं प्रांतभर पसरविला होता. पिंपळगांवचे खादी केन्द्र निर्माण करून नागपूरला चरखा व टकळी यांच्या चढाओढीची योजना केली होती. त्यांनीं परदेशी कापडावरील पिकेटिंगचें धुरीणत्व स्वीकारलें होतें. जंगल सत्याग्रहाची जी योजना पूर्वीच्या युद्धमंडळानें केलेली होती तिच्या धुरा आतां श्री० टिकेकर व श्री० ढवळे यांच्यावर येऊन पडली. तद्नुसार येथील जंगल सत्याग्रहासाठीं २८ जणांचें एक प्रांतिक

तुकडी श्री टिकेकरांच्या नेतृत्वाखालीं २४ तारखेस नागपुरहून कूच करून १ आगष्टला तळेगांवास पोंचावी अशी योजना युद्धमंडळानें केली होती. त्याच कार्यक्रमास अनुसरून श्री. गणपतराव टिकेकर ह्यांनीं ह्या तुकडीचे नेतृत्व पत्करलें. ह्या तुकडींत महाराष्ट्राचे सहसंपादक श्री. माडखोलकरांनीं भाग घेतला. त्याच तुकडींत राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, दलित युद्धमंडळ, अनाथ विद्यार्थीगृह ह्यापैकीं एकेक स्वयंसेवक सामील होता. साम बँकर ह्या नांवाचे एक पारशी तरुण, पांडुरंगराव, तुळशीराम लोधी वगैरे गृहस्थांचीं नांवें ह्या तुकडींत झळकत होती. २४.तारखेस प्रचंड मिरवणूक निघाली व नागपूरकरांनीं मोठ्या समारंभानें तुकडीस निरोप दिला. वाटेंत गोंडखेरी, बाजारगांव, कोंढाळी, ठाणेगांव कारंजा सारवाडी येथें मुक्काम झाले. ह्या स्वयंसेवकांचें ठिकठिकाणीं मोठ्या उत्साहानें स्वागत करण्यांत आलें.

: सरकारी जंगलांतील गवत कापून आणणें व झाडपाला गोळा करणें येथेंच ह्या सत्याग्रहाचें स्वरूप असलें तरी ह्या सत्याग्रहाकडे सर्व प्रांतानें लक्ष पुरविलें. व ह्या सत्याग्रहानें सामान्य लोकांची, खेडेगांवांतील स्त्री पुरुषांची मनें उद्दीप्त झालीं. आर्वी येथील कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं सर्व मदार आपल्यावर आहे हें पाहून तळेगांवची निवड झाल्यानें जी जबाबदारी त्यांचेवर पडत होती ती लक्ष्यांत ठेऊनच कायदेभंगाची कडेकोट तयारी केली.

तळेगांवच्या जंगलांत सुमारें ३०००० लोक एकत्रित झाले होते. सरकारनेंही आपली जय्यत तयारी ठेवली होती. लोकांचा असंतोष इतका तीव्र होता की, पोलीस पार्टीला शिधा सामुग्रीहि मिळणें मुष्किलीचें झालें. पहिल्या आगष्टला श्री. टिकेकर, तुळसीराम लोधी, अब्दुल रफीक, लक्ष्मण गंभीरा ( हरिजन ) ह्यांस अटक झाली. हा सत्याग्रह एक महिनाभर सारखा चालू राहिला. आर्वी तालुक्यांतील सर्व महत्वाचे कार्यकर्ते ह्या जंगल सत्याग्रहात कामीं आले.

जंगल सत्याग्रहाची मोहीम सुरू झाल्यानंतर व जनतेची उत्सुकता, असंतोष व स्वार्थत्यागाची तयारी ही लक्षांत आल्यानंतर दडपशाहीचा वरवंटा प्रांतावर सारखा फिरूं लागला. जुलई अखेर ऑर्डिनन्सेसचें खरें राज्य सुरू झालें. आगष्ट महिन्यापासून पिकेटींगचे बळी पडूं लागले. गडांगावर पिकेटींग करणारे तसेंच जंगल सत्याग्रहांत सामील होणारे महत्वाचे कार्यकर्ते एकामागून एक असे पटापट जेलमध्यें जाऊं लागले. गणपतराव टिकेकरांस व त्यांच्या बरोबरच्या बहुतेक सर्व महत्वाच्या स्वयंसेवकांस अटक झाल्यावर श्री छगनलाल भरूका हे युद्धमंडळाचे अध्यक्ष झाले. श्री. आप्पासाहेब ढवळे ह्यांना देखील जंगल सत्याग्रहाच्या व्याख्यानावरून पकडण्यांत आलें.

श्री. छगनलाल भरूका स्वातंत्र्य दिनापासूनच कॉंग्रेस मतानुवर्ती झाले होते. कामठी वगैरे सारख्या ठिकाणीं जेथें त्यांचें विशेष वजन होतें तेथें मत प्रचाराच्या कामीं ह्यांचीच योजना मुख्यतः होई. आगष्टपासून अनेक स्वयंसेवक पिकेटिंग निमित्तानें पकडले गेले. श्री. दातार टिळक विद्यालयाचे प्रमुख हे ह्याच सुमारास पिकेटिंग पहाण्यास गेले असतांना धरले गेले. ६ आगष्टला पिकेटिंग दिन साजरा झाला. प्रत्येक गुरुवार सभा व्हावी. हा महिनाभर स्वयंसेवकांना सारखी अटक होऊं लागली. कांहीं दिवस अटक केलेल्यांची रोजची संख्या ३० पेक्षां अधिक असे. एकदां तर ४८ स्वयंसेवक एकदम पकडले गेले म्हणून कॉंग्रेसनें प्रत्येक गुरुवार १५-२० स्वयंसेवक देण्याचा प्रघात बंद करून चार चार स्वयंसेवक ठेवून अडविण्याचें धोरण ठरविलें.

श्री. छगनलाल भरूका, सेक्रेटरी श्री. पटवर्धन व श्री राजाभाऊ डांगरे ह्यांनीं आगष्टपासून युद्धमंडळाची जबाबदारी पत्करून प्रांतभर जंगल सत्याग्रह सुरु केला. नागपुरांत ३ आगष्ट ते १० आगष्ट पर्यंत बहिष्कारसप्ताह ऑब्सर्व्ह करण्यांत आला. झेंडा-दिन, बहिष्कार-दिन, पिकेटिंग-दिन, गांधी-दिन, स्त्रियांचा-दिवस, गढवाल दिन, राजबंदी-दिन असा कार्यक्रम ह्या सप्ताहांत आला होता. प्रत्येक दिवशीं मिरवणुकी, सभा, चरखा किंवा तकलीच्या चवा-

ओढी, घरोघर जाऊन बहिष्कार पत्रिकेवर सह्या मिळविणें वगैरे रीतीनें जनतेचा उत्साह जागृत करण्यांत येत होता. गढवालदिनाचे दृश्य तर नागपुरच्या स्मरणांतून कधींहि जाणें शक्य नाहीं. हा दिन साजरा होऊं नये ह्या करितां सरकारनें जितकी कांहीं रदबदली करावयाची होती तितकी केली. शेवटीं गढवाल-दिनाची मिरवणूक व सभा सरकारनें १४४ कलमान्वयें बेकायदा ठरविली. नागरिकांस दहशत बसावी ह्या हेतूनें ८ तारखेस सकाळीं घोडेस्वार व सशस्त्र फौजेच्या पलटणी शहरच्या मुख्य रस्त्यावरून मार्च करीत गेल्या. कॉंग्रेस ऑफिसच्या खालच्या रस्त्यावर दुपार पासून पोलीस शिपायांच्या पलटणी येऊन ठेपल्या. रस्त्यावर पोलीसांनीं नाकेबंदी करून ठेविली. श्री. भरुकांनीही २५ स्वयंसेवकांची आपली तुकडी जय्यत उभी केली. श्री. भरुका यांना श्री. नारायणराव वैद्य, श्री. खुशालचंदजी ह्यांनीं अतोनात सहाय्य केले. वेळ आणीबाणीची होती. श्री. नारायणराव वैद्य पूर्वीचे मतभेद बाजूस सारून या युद्धांत सामील झाले होते.

दुपारी ठरल्या वेळीं ३ वाजतां छगनलालजींच्या नेतृत्वाखालीं २५ स्वयंसेवकांची तुकडी कॉंग्रेस ऑफिसांतून बाहेर पडली. कोतवाली जवळ डेप्युटी कमिशनर, सुपरिंटेंडेंट वगैरे बड्याबड्या ऑफीसरांचा तांडा हजरच होता. त्यांनीं ती अडविली. आज नागपुरांत कांहीं तरी भयंकर प्रकार घडणार हें जाणून हजारों नागरिक कॉंग्रेस ऑफिस जवळ रस्त्यांत एकत्र झाले. २५ स्वयंसेवकांसह श्री. भरुका ह्यांस कोतवाली जवळ अटक झाली. क्षणोक्षणीं लाठी चार्ज होतो कीं काय असें जमलेल्या हजारों प्रेक्षकांस वाटे. त्यांच्या मागें तुरुंगांत जावयास तयार होणाऱ्या शेकडों लोकांची रांग लागली होती. श्री. नारायणराव वैद्य ह्यांस छगनलालजी बरोबरच पकडलें. चांदाचे शेठ खुशालचंदजी श्री. भरुका नंतर युद्धमंडळाचे अध्यक्ष होणार होते. ते पुढें होतांच पोलिसांनीं त्यांना अटक केली. आपाजी गांधी, स्वयंसैनिकांचे सेनापती हेही पकडले गेले. त्यानंतर शेकडों स्वयंसेवक व रस्ता अडविणारी पोलिसांची

पलटण असें भीषण दृश्य कॉंग्रेस ऑफिस समोर जमलेल्या हजारों प्रेक्षकांस दिसत होते. अडवलेली मिरवणूक शांतपणें मध्यरात्रीं पावेतों बसून राहिली होती. रात्रीं १२ च्या सुमारास पुन्हां लाठीवाज पोलीस आणून धाकदपटशा दाखविण्यांत आला. मिरवणूक मोडण्याचा पोलिसांनीं हुकूम केला. पण तो तों न मानतां रात्रीं १२ वाजतां ४ स्वयंसेवकांनीं (शामराव दामोधर, शंकरराव वादल, शंकर तुकाराम वैद्य व रामदास सोनार) वर्किंग कमिटीचा ६ वा ठराव वाचला. त्यांस तावडतोब अटक करण्यांत आली. १२ वाजल्या नंतर पोलिस काढून घेण्यांत आले व मिरवणूक रात्रीं चिटणीस पार्कांत गेली. अनेक डाक्टर दिवसरात्र आपली अम्ब्युलन्स मोटार घेऊन सज्ज होते.

कॉंग्रेस ऑफिस समोर हा प्रकार चालला असतांना शहरभर काळ्या पताका व झेंडे घेऊन आठ आठ दहा दहा स्वयंसेवकांनीं गढवाल दिनाच्या मिरवणुकी अनेक रस्त्यांनीं काढल्या. सगळे पोलिस एके ठिकाणीच एकत्रित झाल्यामुळें ह्या इतर मिरवणुकीस कोणीच अडथळा केला नाहीं; व प्रचाराचें कार्य निर्वेधपणें पार पडले.

श्री. भरूका नंतर श्री. कानेटकर हे युद्धमंडळाचे अध्यक्ष झाले. श्री. कानेटकर हे राष्ट्रीय शाळेतील एक शिक्षक, परिणामकारक वक्ते व लेखक म्हणून नागपूरच्या परिचयाचे होते. कॉलेज व शाळेच्या विद्यार्थ्यांनीं १९३० साली कॉंग्रेसचा पुष्कळच पाठपुरावा केला. १५ जुलै पासूनच विद्यार्थ्यांनी चळवळीत भाग घेण्याचें ठरविले होते व ते हरताळांत सामील होत. लॉ. कॉलेज, सायन्स कॉलेज ह्यांमध्यें झेंडावंदनाहि सुरूं झालेलें पाहून प्रिन्सिपालनें सायन्स कॉलेज ३१ जुलै पासून बंद केलें. त्या नंतर मॉरिस, एंजिनिअरींग, पटवर्धन हायस्कूल ही देखील बंद झालीं. लॉ. कॉलेज व हिस्लाप कॉलेज फक्त शिल्लक राहिले होते. श्री. कानेटकरांनी पत्रकें वाटून व व्याख्यानें देऊन विद्यार्थ्यांत प्रचार कार्य केलें व कॉलेज पिकेटिंग हातीं घेतलें. शेवटी लॉ. कॉलेज व हिस्लॉप कॉलेज हीं देखील बंद झालीं. अनेक स्त्रिया कॉलेजांवर पिकेटिंग करीत असलेल्या पाहून

विद्यार्थी सामील होत. ह्या कॉलेज पिकेटिंगच्या पायी श्री. कानेटकरांना गढवाल दिनाच्या बंदींचा खटला ऐकण्यास गेलें असतां १५ तारखेस पकडण्यांत आलें सुमारें १०० विद्यार्थ्यांनीं शाळा व कॉलेज सोडून प्रचार कार्य केलें ह्यांचें बरेंचसे श्रेय श्री. कानेटकर यांस दिलें पाहिजे.

श्री. कानेटकरा नंतर श्री. साळवे हे युद्धमंडळाचे अध्यक्ष झाले, व त्यांनीहि धडाडीनें कार्य पुढें चालविलें, जंगल सत्याग्रहाची मोहिम प्रांतभर चालू होतीच. आर्वी तहसिलींत मोहिमेस सुरुवात झालेली असली तरी लवकरच ती प्रांतभर पसरली. नागपूर, भंडारा, चांदा, वर्धा, ह्या जिल्ह्यांनीं फार व्यवस्थेशीर सत्याग्रह केला.

ह्या महिन्यांत जंगल सत्याग्रह सुरुं होता. सरकारनेंही उग्र स्वरुप धारण केलें. जंगल सत्याग्रह करणारास फटक्याची शिक्षा होईल असा धाक पोलिसांनीं घातला. जंगल सत्याग्रहींस दंड होऊं लागले होते व ते दंड बेदरकारपणानें वसूल होत. कांहीं ठिकाणीं प्यूनिटिव्ह पोलिस बसविण्यास सुरुवात झाली होती. ही सर्व पोलीसांची दंडेली श्री. साळवे ह्यांनी चव्हाट्यावर मांडण्याचें कार्य निर्भयपणानें केलें. २४ आगस्टला चांद्यास १० ते १७ वयाच्या १२ मुलांस छड्या मारण्यांत आल्या. सत्याग्रहाकडून दंड वसूल करतांना पोलिसांनीं गांवांवर जणूं कांहीं हल्लेच केले.

### अभ्यंकर—भगवानदिन—दिन

श्री. अभ्यंकर व श्री. भगवानदिनजी जेलमध्यें असतांना त्यांच्या आंगव्याचें ठसे मागण्यांत आले. श्री. अभ्यंकर व भगवानदीनजी ह्यांचे आंगठ्याचे ठसे पोलीस व सार्जंट ह्यांच्या सहाय्यानें जेलमध्यें जबरीनें घेण्यांत आले. ही बातमी युद्धमंडळास कळतांच २४ तारखेस अभ्यंकर—भगवानदीन—दिन साजरा करण्याचें युद्धमंडळानें ठरविलें. प्रांतभर खळबळ माजली ता. २४ ला अचाटप मिरवणूक निघाली. नंतर प्रचंड सभा भरली. या सभेंतही दोन व्यासपीठें उभारली गेलीं होती.

२५ तारखेस सर्व प्रांतभर सामुदायिक जंगल सत्याग्रह करण्यांत आला. हजारों लोक हा सत्याग्रह पहाण्यास जमत हें लक्षांत घेऊन श्री. पटवर्धन व डांगरे ह्यांनीं अविश्रांत मेहनत घेऊन सर्व प्रांत सामुदायिक सत्याग्रहासाठीं तयार केला. ह्या एकाच दिवशीं गांवांतून पाऊणलाख लोक तरी या सामुदायिक सत्याग्रहांत सामील झाले असतील असा अंदाज आहे. हा महिना अखेर पर्यंत जंगल सत्याग्रहानें सर्व प्रांत दुमदुमून गेला. व अनेक कार्यकर्ते जेलमध्यें गेले. श्री. राजाभाऊ डांगरे यांना १ सप्टेंबरला अटक झाली.

श्री साळवे हे अध्यक्ष असतांना एक हृदयद्रावक प्रसंग घडून आला. रामटेकचे नथ्थू कुणबी व पंचम गोंड ह्यांना अटक झाल्यानंतर नागपूर जेलमध्यें २५ फटके मारण्यांत आले व तशाच स्थितींत ह्या दोघा सत्याग्रहांस पायीं पायीं शहरांत ३ मैल जेलपासून यावें लागलें. डॉ. परांजपे यांच्या दवाखान्यांत त्यांना औषधोपचार करण्यांत आला. या असंतोषामुळें शहरांत कडक हरताळ पडला. सर्व गिरण्यांवर पिकेटिंग करण्यांत आलें व गिरण्या बंद पडल्या. त्या दिवशीं कोर्टावरहि पिकेटिंग करण्यांत आले. पुष्कळसे वकील व पक्षकार बाहेरच राहिले. कोर्टाच्या आवारांत लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमल्या. पोलिसांनीं यावेळीं लाठ्या चालविल्या व लोकांच्या गर्दीवर घोडे सोडण्यांत आले. लोकांस दुखापत झाली. दुखापत झालेले इसम कॉंग्रेस हॉस्पिटलमध्यें नेण्यांत आले. दुपारच्या वारला ह्या दोघा फटके मारलेल्या सत्याग्रहांची स्ट्रेचरवर मिरवणूक निघाली व अंगी जाहिर सभा भरली. तींत डॉ. परांजपे यांचे भाषण झालें. याच दिवशींच्या पिकेटिंगबद्दल श्री. साळवे, मार्तंडराव जोग, बजरंग ठेकेदार, गोविंदराव ठाकरे, पन्नालालजी, गजानन भिडे, यडकर, श्री. नायडू वकील असा अनेक प्रमुख कार्यकर्त्यांस शिक्षा झाली.

श्री. साळवे ह्यांच्या नंतर प्रो. जोगळेकर अध्यक्ष झाले. प्रो. जोगळेकर, हे नांदगांचे प्रसिद्ध कार्यकर्ते व कॉंग्रेसभक्त म्हणून जनतेस माहीत होते. श्री. डांगरे यांच्या मागून श्री. माणिकराव देशमुख युद्धमंडळाचे सभासद

झाले. त्यांना ९ तारखेस अटक होऊन शिक्षा झाल्यावर त्यांचे जागीं श्री. बळीरामपंत निमगांवकर यांची निवड झाली. त्यांनीं जंगल सत्याग्रह करितां जिल्ह्यांत दौरा काढून सत्याग्रह करितां जनतेची मनें तयार केली. श्री. पटवर्धन हे सेठ पूनमचंदजी नंतर सेक्रेटरी झाले होते. श्री. पटवर्धन टिळक विद्यालयाचे निरलस शिक्षक व कार्यकुशल सेक्रेटरी असत. त्यांनाही १५ तारखेस अटक झाली. श्री. निमगांवकरही १६ तारखेस लागलीच पकडले गेले. प्रो. ओगलेकरांच्या अध्यक्षपदांत गडंगावरील पिकेटिंग, दारु गुत्यावरील पिकेटिंग व जंगल सत्याग्रह प्रांतभर चालूच होता. कार्यकर्त्यांचे एक सुसंघटित मंडळ तयार झालेले असल्यामुळें युद्धमंडळाच्या सभासदांस जरी भराभर अटक झाली तरी कार्यांत व शिस्तीत खंड पडला नाहीं किंवा शिथिलताहि आली नाहीं.

याच सुमारास लोकमत लाथाडून श्री. तांबे व डॉ. मुंजे राऊंड टेबल परिषदेला गेले. त्यांचा प्रांतभर निषेध जाहीरसभांत झाला. व नागपुरासही एक जंगी निषेधपर मिरवणूक काढण्यांत येऊन वरील परिषदेवर विश्वास नसल्याबद्दल ठराव करण्यांत आला. प्रो. ओगलेकर ह्यांना २७ तारखेस अटक झाली. त्या नंतर श्री. शेरलेकर वकील हे अध्यक्ष झाले. त्यांनांहि अध्यक्षपद फार दिवस लाभलें नाहीं. ४ ऑक्टोबरलाच त्यांना तुरुंगवास पडला.

श्री. शेरलेकरांनंतर सौ. अनुसयाबाई काळे ह्या अध्यक्ष झाल्या व श्री. पटवर्धनानंतर श्री. धुले हे सेक्रेटरी बनले. आप्पासाहेब हळदे ह्यांची सभासद म्हणून निवड झाली. नागपुरांत युद्धमंडळाची अध्यक्ष एक स्त्री निवडली जाणें ही एक वैशिष्ट्य पूर्ण घटना होती. परंतु त्या वर्षी स्त्रियांनीं राष्ट्रीय चळवळीस व कायदेभंगाच्या वातावरणास जो सक्रिय व स्वार्थत्याग पूर्वक पाठिंबा दिला त्यामुळें स्त्रिया देखील सविनय कायदेभंगाच्या चळवळीत पुरुषांच्या खांद्यास खांदा लावून सरकारशीं लढूं शकतात हें सिद्ध झाले. १९३० सालीं स्त्रियांच्या दृष्टीकोनांत महात्मा गांधींनीं मोठीच क्रांती घडवून आणली. मिठाच्या कायदेभंगापासून ज्या घरकांचें नख देखील लोकांस दिसावयाचें नाहीं अशा पडदानशील बायका देखील

राष्ट्रीय चळवळीत सामील झाल्या. नागपूर येथें देशसेविका संघ व सुत कमिट्या स्थापन झाल्या होत्या. प्रभात फेऱ्यांत तर स्त्रियांच विशेषें करुन भाग घेऊं लागल्या. श्री. सौ. चंद्रभागाबाई पटवर्धन,सौ.सुशीलाबाई गाडगीळ, श्री. कमलाबाई हर्पाट, सौ.विद्यावतीबाई देवडिया,कु.वत्सला कर्णिक,कु विमलाताई अभ्यंकर श्री. गोदुताई जोगळेकर वगैरे स्त्रियांनीं चळवळीच्या आरंभापासून सभांमधून व्याख्यानें दिलीं व प्रचारकार्यास मदत केली सौ. सरस्वतीबाई टिकेकर,सौ लोकरे, सौ. लिलाबाई.ढवळे, सौ जानकीबाई बजाज, सौ गंगाबाई चौबे, चतुराबाई कोटक, प्रभृती अनेक स्त्रियांनीं संघटनेंत भाग घेतला.

कॉलेज पिकेटिंग व परदेशी कापडाचें पिकेटिंग याचें पुष्कळसें श्रेय नागपुरांतील स्त्री वर्गासच दिलें पाहिजे. सौ. अनुसूयाबाई अध्यक्ष पदावर आरुढ होतांच पोलिसांच्या भयंकर जुलुमाची एक क्षोभजनक वाब पुढें आली. ६ अक्टोबर रोजीं तिम्या व धान्या नांवाच्या गोंदिया तहसिलींतील कोन्हाडी गांवच्या दोन ढीवर बंधूंना पोलिसांनीं ठार मारल्याची बातमी येऊन ठेपली. ६ अक्टोबरला कोन्हाडीस जंगल सत्याग्रह करण्याचें ठरलें होतें व त्याच्या बंदोबस्ताकरितां १०।१२ पोलीसांची पार्टी तेथें गेली होती. पोलीस सरबराई करितां ढीवरांनीं येण्याचें नाकारल्यावरुन पोलीसांनीं रागानें त्यांस संगिनीनें भोंसकलें व त्या जखमांनीं त्यांचा अंत झाला.

९ आक्टोंबर.हा दिन ह्यां गरीब निरपराधी लोकांच्या स्मरणार्थ पाळण्याचें युद्धमंडळानें ठरविलें. हरताळ कडक पडला व जंगी जाहीर सभा झाली. हा कोन्हाडी–दिन प्रांतांतील महत्वाच्या ठिकाणीं पाळण्यांत आला. ह्या महिन्यांत सौ. अनुसूयाबाईस परदेशी कापडाच्या व बहिष्काराबावत नागपूरच्या व्यापाऱ्यांबरोबर पुन्हां वाटाघाटी कराव्या लागल्या. व्यापारी सील उघडण्यास चुळबुळ करूं लागले. दिपवाळी जवळ आल्यामुळें व्यापाऱ्यांची स्वार्थी दृष्टि बळावूं लागली होती परंतु सौ. अनुसुयाबाईच्या मागें स्त्रियांची पिकेटिंग करितां सज्ज होणारी सेना तयार होती. त्यामुळें व्यापारी वर्गानें पुन्हां

तीन महिन्यांचा वायदा केला.

- ह्या वर्षाची दिवाळी कायदेभंगाच्या वातावरणास साजेशी झाली. जनतेनें इतके राष्ट्रभक्त तुरुंगांत आहेत हें पाहून कायदेभंगास साजेशी वृत्ति धारण केली. तुरुंगांतील क वर्गाला सहानुभूति दाखविण्यासाठीं कॉंग्रेसनें जेल भोजनाचा कार्यक्रम केला.

१० नोव्हेंबरला प्रांतिक कौन्सिलाची निवडणूक होणार होती. ह्या वर्षीच्या कायदेभंगाच्या चळवळीपासून सर्व स्वराजिस्ट कौन्सिलर्सनीं राजीनामे दिलेच होते. श्री. आप्पासाहेब हळदे, श्री. हरकरे, श्री. वाचासुंदर, श्री. चैतन्यदास, कॉलेज सोडलेले अनेक प्रचारकार्य करणारे विद्यार्थी, पांडुरंग सावजी, नंदागवळी, श्री. होरमसजी, गजानन दांडेगे, कु. वत्सलाबाई कार्णिक, सौ. इंगळे व सौ. सुशीलाबाई गाडगीळ ह्या सर्वांनीं कौन्सिल बहिष्कारासाठीं मोठ्या धडाक्यानें मत प्रचार केला. ता. ९ नोव्हेंबरला काळ्या निशाणांची मिरवणूक निघून जंगी जाहीर सभा झाली. १० तारखेस सकाळीं ५ वाजेपासून पिकेटिंग सुरू झाले. सुमारें २०० स्वयंसेविका ४०० स्वयंसेवक व ५०० मुलांची वानर सेना निरनिराळ्या पोलिंग स्टेशनवर पिकेटिंग करीत होती. इंजिनियरिंग स्कूल, जिल्हाकचेरी, पटवर्धन हायस्कूल, दाजीस्कूल, वगैरे ठिकाणी फारच परिणाम कारक रीतीनें पिकेटिंग झालें. श्री. प्रधान, श्री पारख ह्यासारख्या उमेदवारांच्या वर्तनामुळें जनतेच्या मनांत मनस्वी तिटकारा उत्पन्न झाला. पोलिसांनीं ज्या प्रमाणें कोर्ट बहिष्कार किंवा कॉलेज बहिष्काराच्या वेळीं हमखास छड्यांचा उपयोग केला त्याच प्रमाणें ह्यावेळीं देखील त्यांनी असभ्यपणा व दंडुकेशाही गाजविली. सौ. अनुसूयाबाईस टाऊन–हॉल जवळ अटक झाली व तेथेंच पिकेटिंग करणाऱ्या स्वयंसेविका पकडण्यांत आल्या. वानरसेनेचे सेनापती श्री. प्रभाकर साखरदांडे ह्यांस चोप देण्यांत येऊन त्यांनाही पकडून नेलें. १२ तारखेस १७ कार्यकर्ते पकडण्यांत आले. त्यांत श्री. घुले, चैतन्यदास, वैद्य, मंगलचंद, वाचासुंदर, होरमसजी, मोतीसिंग, भोलासाव, मगनलाल पटणी, कृपाशंकर

नियोगी, निळकंठ दाते वगैरे मंडळी होती. पोलिंगच्यावेळीं नागपुरांतून २५००० मतांपैकीं केवळ ११३७ मतें पडली. इतवारी सारख्या पोलिंग बूथवर तर एकहि मत पडलें नाहीं. सर्व प्रांतभर कौन्सिल बहिष्काराच्या बाबतींत कॉंग्रेसला असेंच यश मिळालें. रामटेक येथील जागा तर शेवटपर्यंत रिकामीच राहिली. यावेळीं तरुण भारताचें पुनरुज्जीवन करण्यांत आलें व मत प्रचाराच्या कामीं ह्या पत्राचा फार उपयोग झाला. पुढें सावनेरचे वकील श्री. हरकरे हे युद्ध मंडळाचे अध्यक्ष झाले व श्री मामा कमावीसदार ह्यांची सेक्रेटरी ह्मणून निवड झाली. श्री. हरकरे ह्यांनी नागपुरांत १९२१ सालापासून ५।७ वर्षे राजकारणांत भाग घेतला होता. तरुण भारताचे हे सहसंपादकहि होते. श्री. कमाविसदार यांनी पं. मोतिलाल ह्यांच्या आज्ञेप्रमाणें सर्व प्रांतभर जवाहर–दिन साजरा केला. पं. जवाहरलाल अटकेंतून बाहेर येतांच पुन्हां त्यांना शिक्षा झाली होती. ह्मणून सर्व कॉंग्रेसनिष्ठ लोकांस जवाहिरलाल यांच्या बद्दल फार प्रेम वाटत होतें. टाविक आक्षिप्त मजकूर सभेंत वाचून दाखविण्याचा कार्यक्रम सर्व प्रांतांतून करण्यांत आला. व जवाहरदिन सर्व प्रांतभर उत्साहानें पार पडला.

## दारूलिलांव बहिष्कार पिकेटिंग

नोव्हेंबर २०-२१-२२ तारखेस दारूचे लिलांव करण्यांत यावयाचे होते. त्यावेळीं दारूबंदी करितां कसोशिनें खटपट करण्याचें युद्धमंडळानें ठरविलें. दारू दुकानांवर जारीनें पिकेटिंग करण्यांत आलें. जेथें जेथें ठेकेदार उतरण्याचा संभव होता तेथें तेथें देशसेविकांनीं पहाटेपासून ठाणें दिलें घरच्या घरींच ठेकेदार नजर कैदेंत पडल्या प्रमाणें झालें. श्री. बाबूलाल तंबोली यांनी यावर्षी दारूचा मक्ता सोडला व हजारों रुपयांचा तोटा सहन केला. कांग्रेसला त्यांनी १०१ रु. ची देणगीही दिली. त्याबद्दल त्यांचें जाहीर सभेंत अभिनंदनही करण्यांत आलें.मक्त्यांच्या लिलांवाच्या जागीं मक्तेदाराशिवाय कोणीही आंत येऊं नये असा सरकारनें कडेकोट बंदोबस्त ठेवला होता. तरी युक्तिप्रयुक्तीनें ठेकेदारांची मागें घेऊन कॉंग्रेसचे स्वयंसेवक मोठ्या धैर्यानें डेप्युटी कमिशनराच्या कचेरींत गेले.

व एकामागून एक तेथेंच दारुबंदीची व्याख्यानें देऊं लागले. पांडुरंग वडपल्लीवार, गोविंद तेली, बोरीकर, तारणेकर, नारायण तेली, शिवल मांडी, रामजी कुणबी, भाऊगीर सदाशिवगीर व पागे ह्यांनीं मोठ्या हिकमतीनें प्रवेश मिळवून लिलांवाचा पट अगदींच उधळून लावला. युद्धमंडळाची ही कारवाई सर्व नागपुरांत कौतुकाचा विषय बनली. शेवटीं सरकारनें लिलांवाचें कामही कसें तरी गुपचुप करून टाकलें. कॉंग्रेसच्या खटपटीनें ह्या वर्षी विदेशी दारूंत शेंकडा ३८, देशी दारूंत शेंकडा ४४, गांज्यांत ५२ व अफूत १९ टक्के तोटा आला.

२६ तारखेस श्री. हरकरे ह्यांस पकडण्यांत आलें. व त्यांना एक वर्षाची शिक्षा झाली. त्यानंतर आपासाहेब हळदे हे अध्यक्ष व सिटी हायस्कूलचे शिक्षक यादवराव देशमुख हे सभासद निवडण्यांत आले. नोव्हेंबर अखेर पिकेटिंग आर्डिनन्सची मुदत संपत आली होती हें जाणून इतवारी, महाल इत्यादि पेठेंतील व्यापारी सीलें तोडून विलायती माल विकण्यास उत्सुक झाले होते.. क्वचित चोरूनमारून परदेशी कापड विकण्यांत येई म्हणून मामा कमाविसदारांनीं पुन्हां पिकेटिंग सुरू केलें. प्रतिज्ञा पत्रकें तयार केलीं व परदेशी कापडाचा बहिष्कार तीव्रतेनें पुन्हां सुरू झाला. परदेशी व्यापाऱ्यांस १७५ रु. पर्यंत कॉंग्रेसला दंड देणें भाग पडलें. महाल व्यापारी संघ, इतवारी क्लाथ असोसिएशन ह्यांच्याकडून पुन्हां करारही करून घेण्यांत आले.

डिसेंबर ५ तारखेस गांधी दिन, १० तारखेचा स्त्री राजबंदी दिन हे दिवस सर्व प्रांतभर पाळण्यांत आले. पं. मोतीलाल हे ह्या सुमारास फार आजारी होते. १४ तारखेस प्रांतभर त्यांचें आयुरारोग्य चिंतण्यांत आलें.

## बारडोली—दिन

या सुमारास बारडोलीचे शेतकरी चळवळींत आपलें सर्वस्व गमावण्यास तयार झाले होते. त्यांनीं 'जिहाद' पुकारला होता. बारडोली येथें जो स्वाहाःकार

गुजराथी शेतकऱ्यांनीं मांडला त्याचें स्मरण नागपूरच्या जनतेस करून देण्याचें कार्य श्री. कमाविसदार व त्यांचें युद्धमंडळ यांनीं तारीख १५ पासून तो २१ पर्यंत करून देण्याचें ठरविलें व बारडोली-दिन साजरा केला. ठिकठिकाणीं, मोहल्या मोहल्यांतून व्याख्यानें झालीं. प्रांतभर ह्या गुजराथी शेतकऱ्यांच्या आत्मयज्ञाचा ध्वनी या युद्धमंडळानें घुमविला. त्यादिवशीं पूर्ण हरताळ पडला. अजंग्र मिरवणूक निघाली व हृदयस्पर्शी व्याख्यानें झालीं. श्री. कमाविसदार व श्री. यादवराव देशमुख ह्यांनी इतक्या कळकळीनें व्याख्यानें दिलीं कीं लवकरच २४ तारखेस त्यांची सरकारनें उचलबांगडी केली. नंतर श्री. पांढरीपांडे सेक्रेटरी झाले. श्री. पांढरीपांडे नाणावलेले शिक्षक व मराठी भाषेंतील जाणते गृहस्थ म्हणून नागपुरांत प्रसिद्ध होते. श्री. दत्तोपंत मारुळकर हे व्यायाम प्रेमी व एका सुप्रसिद्ध आखाड्याचे चालक युद्धमंडळाचे सभासद झाले. श्री. चिंतामणराव दौंड हे स्वयंसेवकांचे कप्तान होते.

जानेवारी महिन्यांत परदेशी कापडाचे पिकेटिंग पुन्हां सुरु करावें लागले. कारण कांहीं व्यापाऱ्यांनीं डिसेंबरअखेर पर्यंत कापडावर सीलें लावण्याचें कबूल केलें होते. ८–१० दुकानांवर ३ दिवस सारखे पिकेटिंग झाल्यानंतर दुकानदार वठणीस आले. सौ. गंगाबाई चौबे, व आठ स्वयंसेविका ह्यांना ह्या पिकेटिंगकरितां शिक्षा झाली. पुढें बापुगेण—दिन साजरा झाला व ह्या दिवशींच्या मिरवणुकींत १५०० स्त्रियांनीं भाग घेतला. नुकत्याच झालेल्या धरपकडीमुळें त्यांचा उत्साह वाढीला लागलाच होता. श्री. आवारी हे देखील तुरुंगांत उपवास करुं लागले. त्यामुळें त्यांच्या सन्मानार्थ अवारी-दिन साजरा झाला. श्री आप्पासाहेब हळदे यांनीं सारा तहकुबीची चळवळ या प्रांतांत सुरु केली. दुसऱ्या प्रांतांत करबंदीची चळवळ चालली होती, पण या प्रांतांत मालगुजारी पद्धत अस्तित्वांत असल्यानें नुसती सारा तहकुबीची चळवळ युद्धमंडळानें हातीं घेतली व शेतकऱ्यांची संघटना करण्याची खटपट केली. आप्पासाहेबांनीं ह्या कार्यासाठीं सर्व प्रांतभर दौरा केला. ९ जानेवारीला आप्पासाहेबांस कांग्रेस

बुलेटीन् शेवत पकडण्यांत आलें व तेव्हांपासून कांग्रेस बुलेटिन विकूं न देण्याची खटपट पोलिसांनीं चालविली. कांग्रेस बुलेटिन दररोज वेळेवर प्रसिद्ध होई. व कधी कधी तर दोन हजारपर्यंतहि बुलेटीनचा खप होई.

राजकीय कैदी जसजसे सुटून येऊं लागले तसतसे सी क्लास मधील कैद्यांचे कसे काय हाल होतात हीं वर्णनें वृत्तपत्रांतून देण्यास सुरवात केली. श्री० रानडे, वाघमारे, गवळे, प्रभृति आठ स्वयंसेवकांनीं जेलमध्यें वाईट तऱ्हेनें वागविल्यामुळें उपोषण केलें. सेठ पुनमचंद रांका ह्यांनी सी क्लाससाठीं फारच कष्ट सोसले, त्यांचे वजन अनशनामुळें ४० पौंड कमी झाले. श्री. अभ्यंकरांनींहि कांहीं दिवस सी क्लासचे अन्न घेतलें. ह्या राजबंद्यांच्या तक्रारी व जेलमधील कारभार ह्याबद्दल डॉ. खरे ह्यांनीं सुटून आल्यानंतर खरमरीत लेख लिहिले. श्री. माडखोलकर, ववळे वगैरे संपादक महाशयांनींहि कडक टीका केली.

श्री. पांढरीपांडे हे आप्पासाहेब हळदे यांचे नंतर अध्यक्ष झाले व दीनदयाल गुप्ता हे कॉलेज सोडलेले उत्साही तरुण सेक्रेटरी बनले. श्री. पांढरीपांडे ह्यांनीं स्वातंत्र्य–सप्ताह करण्याचें ठरविलें व त्याकरितां सर्व प्रांतभर धडाडीनें प्रचार केला; त्याचा परिणाम असा झाला कीं स्वातंत्र्यदिनाच्या पूर्वींच त्यांस व श्री गुप्ता यांस अटक झाली. कांग्रेस बुलेटीन करितां सखाराम जोशी हेही तुरुंगांत गेले.

श्री. पांढरीपांडे ह्यांस अटक झाल्यानंतर श्री. कालीचरण सराफ हे अध्यक्ष झाले, व श्री. व्यंकटेश वकील हे सेक्रेटरी निवडले गेले. श्री. कालीचरण हे एक संपन्न व्यापारी होते. ते धडाडीनें त्यावेळीं पुढें आले. स्वातंत्र्य सप्ताहाचें सर्व कार्य त्यांनीं पुढें चालविलें. २६ तारखेस स्वातंत्र्य-दिनाच्या दिवशींच श्री. नारायणराव वैद्य, सेट मुन्नालालजी पन्नालालजी व श्री. साळवे सुटून आल्यामुळें त्या दिवशींच्या सभेंत मनस्वी उत्साह दिसूं

लागला. ह्या स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीं सेक्रेटरीएट, डिस्ट्रीक्ट कोर्ट, पोस्ट ऑफीस, सिटी मॅजिस्ट्रेटचें कोर्ट, जुडिशियल कमीश्नरचें कोर्ट वगैरे महत्त्वाच्या सरकारी इमारतीवर मोठ्या धैर्यानें व हिकमतीनें राष्ट्रीय निशाणें उभारण्यांत आलीं.

ह्याच सुमारास महात्मा गांधी व वर्किंग कमिटीचे सभासद सुटल्या-मुळें राष्ट्रांत नवीन वातावरण निर्माण झालें. फेब्रुवारी महिन्यांत पं. मोतीलाल ५ तारखेस वारले. कांग्रेसवर हा जबरदस्त आघात झाला व सर्व देश त्या मृत्यूनें हळहळला. त्यांच्या स्मरणार्थ १५ तारखेस एक दिन साजरा करण्यांत आला. लोकांनी सर्व प्रांतभर हरताळ पाळला. गिरण्यादि बंद होत्या. उपवास केले. व महत्त्वाच्या लोकांनी महात्मा गांधींच्या सूचने प्रमाणें एका दिवसाचें उत्पन्न कांग्रेसला दिलें.

कॉंग्रेसचा सर्व कार्यक्रम चालूच होता पण देशांतील वातावरण सर-कार व कॉंग्रेस ह्यांमध्यें कांहीं नवीन घटना उत्पन्न होतें कीं काय हे समजून घेण्यास उत्सुक झालीं होती. तडजोडीचे बनाव घडून येण्यास फेब्रुवारी महि-न्यांत प्रारंभ झाला होता. या महिन्यांत श्री. रानडे यांनी स्वदेशी वस्तूंचे प्रदर्शन भरविलें. त्याचे उद्घाटन लोक नायक अणे ह्यांच्या हस्तें झालें. नागपु-रांत व सर्व प्रांतभर पं. मोतीलालदिन साजरा झाला व सर्व पक्षीय पुढाऱ्यांनी ह्या हिंदुस्थानच्या प्रमुख दिवंगत पुढाऱ्यांस तिलांजली दिली. हजारो लोक कन्हान नदीवर तिलांजली देण्यास गेले होते. खानेसुमारीवर बहिष्कार घाल-ण्याचा प्रश्न ह्याच महिन्यांत पुढे आला व युद्धमंडळानें त्यासाठीं सर्व प्रांतभर प्रचार कार्य केलें. तुरुंगांतून सुटून आलेल्या डॉ. खरे, साळवे, शेर-लेकर, तिजारे, मद्रवुद्दे, नारायणराव वैद्य व सौ. अनुसूयाबाई काळे ह्या मारख्या सर्व पुढाऱ्यांनी कॉंग्रेसला सर्व तऱ्हेनें मदत केली. श्री. कालीचरण सराफ व वकील प्रांग २३ तारखेस पकडण्यांत आले. श्री. लोणकर हा मारिस कॉलेज सोडलेल्या व सर्व वर्षभर कॉंग्रेसचें कार्य निष्ठेनें करणाऱ्या प्रमुख

विद्यार्थ्यांसहि बुलेटीनकरितां शिक्षा झाली. श्री. कालीचरण यांचे नंतर श्री. मारुल्कर अध्यक्ष झाले. परंतु दुसऱ्याच दिवशीं तेही पकडले गेले. श्री. शेरेलेकर वकील जेलमधून सुटून आल्यानंतर, लगेच फिरून पकडले गेले. त्यानंतर गोंदियाचे वैद्य पंडित शिवबालक द्विवेदी ह्यांची अध्यक्ष म्हणून व श्री. भा. म. देशमुख यांची सेक्रेटरी म्हणून निवड झाली. श्री. ल. के. देशपांडे ह्यांची सभासद म्हणून निवड करण्यांत आली. श्री. देशमुख व श्री. देशपांडे हे पदवीधर विद्यार्थी होते व सबंध वर्षभर कॉंग्रेसचे प्रचार कार्य निरनिराळ्या तऱ्हेनें निरलसतेनें करीत होते. श्री. गुप्ता, श्री. देशमुख ह्यांची युद्धमंडळांत होणारी निवड म्हणजे विद्यार्थीवर्गाच्या निःसीम सहाय्याची साक्षच होती. हेंच कायदेभंगाच्या चळवळीतील शेवटचें युद्धमंडळ होतें.

ह्या सर्व युद्धमंडळांच्या कार्यपद्धतींत सूत्रबद्धता राहिली. एकच धोरण कायम राखण्यांत आलें ह्याचें कारण स्पष्ट केलें पाहिजे. शेठ पुनमचंद रांका यांचें युद्धमंडळ अटकेंत पडल्यानंतर नागपूर येथील वयोवृद्ध व अनुभवीक पुढारी श्री. दादासाहेब उधोजी ह्यांच्याच सल्ल्यानें व त्यांच्याच निमंत्रणाखालीं युद्धमंडळाचें कार्य शेवटपर्यंत चाललें. श्री. दादासाहेबांच्याच परी अनेक वर्षे नागपूरचें राजकारण शिजलेलें होतें. नव्या जुन्या सर्व कार्यकर्त्यांची त्यांना चांगली माहिती होती. वयोमानाप्रमाणें व परिपक्व विचारांमुळें त्यांचा अधिकार मोठा होता व तो मानण्यास कार्यकर्ते तयारहि होते. त्यावेळीं जो कार्यकर्त्यांचा निरनिराळीं कार्यें करणारा गट बनला, किंवा त्यांच्या सल्ल्यानें बनविला गेला, त्यांत विद्वद्रत्न भाऊजी दप्तरी, हरीभाऊ मोहनी, भैय्याजी ढोल्के, याचासुंदर, वैद्य, राजाभाऊ डांगरे, भैय्याजी उधोजी, चैतन्यदास, घुले, दत्तोपंत वैद्य, नामा पुराणिक, यादवरावपंत निमगांवकर वगैरे, मंडळी मजुर होती. ह्यांपैकीं कांहीं कार्यकर्त्यांस मुद्दाम मागें ठेवण्यांत आलें होतें व कायदेभंग करून जेलमध्यें जाऊं नये अशी ही आज्ञा त्यांना मिळालेली होती. त्या सर्व कार्यकर्त्यांनीं घरादाराची मुळींच फिकीर न करितां आपला सर्व वेळ

दिलेला होता. ह्या कार्यकर्त्यांपैकीं श्री. भाऊजी दप्तरी यांच्या बहुमोल कामगिरिचा उल्लेख वॅ० अभ्यंकर ह्यानीं सुटून आल्यानंतर पहिल्या जाहिर सभेंत केलाही. श्री. भाऊजी दप्तरी ह्यांस, त्यांचा स्पृहणीय प्रामाणिकपणा लक्षांत घेऊन, हिशेब-ठेवण्याचे काम देण्यांत आले होते. वास्तविक त्यांच्या, हिंदुस्थानभर गाजलेल्या विद्वत्तेस साजेसें हें काम नव्हते तथापि त्यांनीं ही जबाबदारी खुषीनें पत्करली. आणखी एक संस्मरणीय उल्लेख मुद्दाम केला पाहिजे. प्रेस ऑर्डिनन्स व न्युजशीट ऑर्डिनन्स सरकारनें काढल्यामुळें कांग्रेसला वर्तमानपत्रच नाहींसें झालें; अशा वर्तमानपत्राचें महत्वाचें कार्य नागपूरच्या कॉंग्रेस बुलेटीननें केलें. सायक्लोस्टाइलवर ह्या बुलेटीनच्या दोन दोन हजार पर्यंत प्रती निघत, व जनताहि एक पैसा; ही त्याची किंमत देऊन आवडीनें हे पत्रक घेई. ह्यांत पेशावर कमिटीचा जप्त झालेला संबंध रिपोर्ट, ब्लॅक रेजीम ऑफ धारासना, इत्यादि पुस्तकें मुद्रित झालीं, व सरकारच्या अत्याचारांची अनेक वर्णनें आलीं. कधीं कधीं ह्यांत कार्टून्सहि येत. विशेष कौतुकाची गोष्ट ही कीं ह्या बुलेटीनचे मशीन शोधून काढण्याचा प्रयत्न पोलिस निकून करीत असताना पोलिसांस ह्याचा पत्ता शेवटपर्यंत लागला नाहीं. नागपूरच्या ह्या वक्तशीर निघणाऱ्या बुलेटीनची मनःपूर्वक स्तुती ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ऑफिसांत झाली व शेवटपर्यंत टिकाव धरून असें बुलेटीन इतर प्रांतांत क्वचितच निघालें असें प्रशंसापत्रहि त्याला मिळालें. ह्या यशाचें बहुतांशीं श्रेय श्री. दाते, सोवनी व कॉलेजच्या कांहीं निवडक विद्यार्थ्यांसच दिलें पाहिजे. ह्या बुलेटीनचा प्रसार करण्याचें कार्य वानरसेनेंतील विद्यार्थ्यांनींच केलें.

श्री. रुईकर सारख्या मजूरवर्गाच्या प्रमुख पुढाऱ्यांनीं, श्री. चोळकर, परांजपे प्रभृति प्रतिसहकारपक्षाच्या पुढाऱ्यांनीं, राष्ट्रीय स्वयं सेवक संघातील कांहीं व्यक्तींनीं व नागपूरच्या म्युनिसिपालिटीनें ह्या चळवळीस शक्य तें सहाय्य केलें; याबद्दल ह्या सर्वांचें ह्या महत्वाच्या प्रसंगीं अभिनंदन करणें जरूर आहे. महाराष्ट्रपत्रानें शक्य त्या प्रमाणांत मदत केली. मारवाडी प्रेसनेंही स्पृहणीय मदत केली. युद्धमंडळास पैशाची मदत कॉटनमार्केट, बगडगंज, संत्रा-

मार्केट, आटवडे–बाजार, तल व तूपाचे व्यापारी, सिनेमाचे चालक व नाटक कंपन्या, व्यापारीवर्ग ह्यांकडून दरावेक रुपानें मिळे. शिवाय वर्गणीच्या रुपानें देखील महत्वाची भर युद्धमंडळाच्या निधींत पडे. मार्चच्या दोन तारखेस गांधी-अर्यविन कराराच्या अटी ठरल्या व शेवटी उभय पक्षीं सन्माननीय तहनामा होऊन ५ मार्च १९३१ रोजीं ह्या प्रचंड चळवळीचा समारोप झाला. मराठी मध्यप्रांतांत तीनलाख लोकांनीं जंगलसत्याग्रह केला. सुमारें १५०० ते २००० लोकांनीं जेलमध्यें जाऊन स्वतःच्या आहुती या यज्ञांत दिल्या. मजूर, शेतकरी, व्यापारी, विद्यार्थी, मुलें, स्त्रिया आणि हरिजन ह्या सर्व वर्गांनीं कायदेभंगाच्या वातावरणास शक्य तें सहाय्य करुन सर्व जगाच्या इतिहासांत अनत्याचारी युद्ध ह्मणून गाजणाऱ्या ह्या चळवळींत अपूर्व यश मिळविलें.

ह्याच महिन्यांत श्री. मंचरशा आवारी ह्यांना सोडविण्याची खटपट झाली. स्वयंसेवकांनीं होममेंबरच्या दाराशी धरण धरलें. पं. अभ्यंकरांच्या प्रयत्नामुळें प्रथम त्यांस पागलखान्यांतून काढून जेलमध्यें नेवून तावडतोब सोडून दिले. ह्याच महिन्यांत नागपूरचे अनुभवीक पुढारी व सत्याग्रह चळवळींतील प्रमुख नेते, गढवाल-दिनाचे मुख्य अभियोजक, श्री. नारायणराव वैद्य यांस देवाज्ञा झाली. त्यांच्या मृत्यूनें सर्व नागपूर शहर हळहळलें. पुढील महिन्यांतील राष्ट्रीयसप्ताह सर्व प्रांतभर ह्या चळवळीच्या उत्साहास साजेसा झाला. मेच्या आरंभीं श्री. आवारींनीं अभ्यंकर वगैरे कार्यकर्त्यांच्या सल्याविरुद्ध स्वतःच्या जबाबदारीवर पिकेटिंग सुरु केलें. व लवकरच त्यांना दीड दीड वर्षांच्या शिक्षा दोन कलमाखालीं झाल्या. श्री. आवारीच्या शिक्षेमुळें कांग्रेस-भक्तांच्या हृदयांत विषण्णता उत्पन्न झाली.

जून महिन्यांत श्री. अच्युतराव कोल्हटकर ह्या नागपूरच्या सुविख्यात व महाराष्ट्रभर गाजलेल्या पुढाऱ्याचे निधन झालें. व नागपुरशीं त्यांचा एककाळीं घनिष्ट संबंध असल्यामुळें त्यांच्याबरोबर काम केलेल्या अनेक

लोकांस ह्यांच्या मृत्यूमुळें वाईट वाटलें.

ह्या पुढील महिन्यांत प्रांतिक कांग्रेस कमेटीने हिन्दुस्थानी सेवादलाची प्रांतांत संघटना करण्याचें कार्य हातीं घेतलें., श्री. सहस्रबुद्धे व रानडे ह्यांस सेवादलाचें मुद्दाम शिक्षण देऊन प्रांतांतील संघटनेचे संयोजक ह्यांस नेमण्यांत आलें होतें. त्यांनीं कांहीं ठिकाणीं आपल्या छावण्या स्थापून स्वयंसेवकांस शिक्षण देण्याचें कार्य हातीं घेतलें. आगष्ट महिन्यांत नागपूरचे वयोवृद्ध पुढारी श्री. दादासाहेब उधोजी हे स्वर्गवासी झाले. श्री. दादासाहेबांनीं सत्याग्रहाच्या चळवळींत जरी फार महत्वाची जबाबदारी पत्करली होती तरी जनतेपुढें त्यांचें कार्य नव्हतें. बॅ० अभ्यंकरासारख्या कार्यांची धुरा अंगावर घेणांऱ्या अनेक कार्यकर्त्यांस त्यांचें हें निधन ह्यावेळीं फारच जाणवलें व सार्वजनिक जीवनांतील आपला पाठिराखा, मित्र व प्रसंगविशेषीं शहाणपणाचा सल्लागार गमावला. ह्याचें बॅ० अभ्यंकरासारख्या लोकांस फार दुःख झालें. दुखवट्या निमित्त मोठी सभा भरली. व ह्या प्रसंगी डॉ० मुंजेप्रभृति प्रतिसहकारपक्षाच्या पुढाऱ्यांनीं तसेंच कांग्रेसभक्तांनीं दादासाहेबांच्या कार्याची ह्या जाहिर सभेंत मुक्तकंठानें प्रशंसा केली.

आगष्ट महिन्यांत टिळक विद्यालयाच्या विद्यमानें व मुख्यतः गांधी सेवा संघाच्या मदतीनें स्वराज्य विद्यालय नांवाची संस्था निघाली. ज्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं १९३० च्या सत्याग्रहाच्या चळवळींसाठीं कॉलेज सोडलेलीं होतीं, त्यांस राजकारणाचें पद्धतशीर शिक्षण देण्यासाठीं ही संस्था निघालेली होती. पांच महिनेंच ही संस्था चालली परंतु ह्या विद्यालयांतील कांही विद्यार्थ्यांनीं १९३२ पासून पुढे तीन वर्षे फार महत्त्वाचें कार्य केलें, ह्मणून मुद्दाम या संस्थेचा उल्लेख केला पाहिजे.

सेप्टेंबर महिन्यांत श्री. धर्माधिकारी ह्यांच्यावर बैतूल येथें भरलेल्या राजकीय परिषदेंत भाषण केल्यावरून खटला झाला. तो खटला बॅ. अभ्यंकरांनीं

स्वतःचेंच कार्य आहे, अशा आपलेपणाच्या भावनेनें चालविला. सूट, सारा-माफी, किंवा सारातहकुबी ह्या संबंधी कार्य श्री. आप्पासाहेब ढवळे, बाबासाहेब देशमुख यांच्या देखरेखीखालीं कांहीं महिनें चाललें. ह्या कार्यास स्वराज्य विद्यालयाच्याच विद्यार्थ्यांनीं मदत केली.

मालवण व बंगाल फ्लड रिलीफसाठीं या प्रांतानें जवळ जवळ पांच-हजार रूपये जमवून पाठविले. दसऱ्याचा मुहुर्तावर २० आक्टोबरला एक चिरस्मरणीय प्रसंग घडून आला. बॅ. अभ्यंकरांचे कार्य पाहून त्यांच्या चाहत्यांनीं व इतर कांग्रेसभक्तांनीं त्यांना एक मानपत्र, व त्यांच्या बहुविध कार्याचें अल्पस्वल्प पारितोषक म्हणून त्यांच्या कीर्तीस साजेशी थैली देण्याचें ठरविलें होते. श्री. दादासाहेब उधोजी, डॉ. खरे, डॉ. सोनकप्रभृती प्रांतांतिल पुढाऱ्यांनीं वर्गणी जमविण्याचें कार्य केलें. श्री. दादासाहेब मध्यंतरी वारले खरे, तरी ह्या कार्यांत डॉ. खरे ह्यांनीं शिथिलता येऊ न देतां हें कार्य तडीस लावलें. श्री. साळवे वकील ह्यांच्या अध्यक्षतेखालीं हा समारंभ साजरा झाला. त्याप्रसंगी प्रांतांतील महत्वाचे बहुतेक कार्यकर्ते नागपुरास एकत्र जमले. श्री. अभ्यंकरांस दहा हजार रुपयांची थैली समर्पण करण्यांत आली.

ह्याच वर्षी श्री. ओगले ह्यांच्यावर देशद्रोहाच्या आरोपावरुन खटला झाला होता त्यांना एक वर्षाची शिक्षा झाली होती, पण पुढें अपिलांत ते सुटले.

## कायदेभंगाची दुसरी मोहीम
## १९३२

वास्तवीक पाहूं गेल्यास गांधी–आयर्विन करारानंतर मराठी मध्य-प्रांतांतील कॉंग्रेस कार्यकर्ते निश्चिंतच होते. ८–९ महिन्यानंतर पुनः आपल्यास

सत्याग्रहांच्या मोहिमेसाठा कंबर कसून सज्ज व्हावें लागेल अशी धास्ती अटकळ नव्हती. ह्या प्रांतांत कॉंग्रेस व सरकार, ह्या दोन पक्षांत करारांचें पालन करण्याच्या बाबतींत श्री. धर्माधिकारी यांच्या वरील राजद्रोहाचा खटला व गोंदिया तहसिलीतील दंड वसूलांची बाब वगळल्यास कुरकुरी, तंटेभांडणें, किंवा चकमकी बहुतांशीं झाल्या नाहींत. वायव्यसरहद्द, संयुक्तप्रांत, बंगाल, गुजराथ इत्यादि प्रांतांत सरकार व कॉंग्रेस ह्यामध्यें कटकटी उत्पन्न झाल्या. सरकारनें, गांधी आयर्विन करार लागू असतांहि करारांचें तत्व बाजूस सारून दडपशाही सुरू केली असें कॉंग्रेसच्या धुरीणांस वाटलें. अपमान गिळावा किंवा सरकारच्या विश्वासघाताच्या धोरणास तोंड तरी द्यावें, ह्या कात्रींत कॉंग्रेसचे धुरीण सांपडले. १९३० ची चळवळ कार्यकर्त्यांच्या अटकेच्या बाहेर यशस्वी झाली होती, व त्यामुळें देश आपल्यास पुन्हा साथ देईल असा विश्वास कॉंग्रेसच्या धुरीणांस वाटला. महात्मा गांधी इंग्लंडहून परत येण्यापूर्वीच हमरीतुमरीवर गोष्ट येऊन पोंचलीच होती. महात्मा गांधींची सर्व मदार स्वार्थत्याग, कष्ट व स्वावलंबन ह्या तत्वांवर. वादग्रस्त बाबींवर म्हणजे बंगालमधील दडपशाही, सरहद्दप्रांतांतील खुदाईखिदमतगारांवरील चढाई व संयुक्तप्रांतांतील अरेरावी, ह्या प्रश्नावर गव्हर्नर जनरलसाहेब कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांशी बोलण्यासहि राजी नाहींत हें पाहून, ' दोंडी तुटो की पारंबी तुटो ' ' तर मग दोनहात होऊंच द्या ' अशा वृत्तीनें वर्किंग कमिटी व लॉर्ड विलिंग्डन ह्यामध्यें निर्वाणीचे खलिते रवाना झाले. इंग्लंडमध्यें अरेरावी पक्ष, राष्ट्र आर्थिक हलाखीच्या पेंच्यांत सांपडल्यामुळें अनपेक्षित रीतीनें एकदम अधिकारारूढ झाला होता. गांधी-आयर्विन कराराच्या वेळीं मजूर पक्षाचें अधिकारारूढ सरकार व कॉंग्रेस ह्यांमधील समतेचें नातें वें मिळामिळिल व सलोख्याचें धोरण ह्या पक्षास मुळींच पसंत नव्हतें. कॉंग्रेसचा नक्षा उतरविलाच पाहिजे असा विचार सॅम्युअल होअरनें राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतांच कान्झरव्हेटिव्ह पक्षाचें बलवान बहुमत असलेल्या नॅशनल गव्हर्नमेंटच्या विचारानें ठरविला व सबंध हिंदुस्थानभर भयंकर दडपशाही चालविण्याचा निश्चय केला.

४ जानेवारीपासून धरपकडीस आरंभ झाला. हिंदुस्थानभर अर्धवट लष्करी कायदाच सुरू झाला. इमर्जन्सी पॉवर्स आर्डिनंस, बेकायदा संस्थांचा वटहुकुम इत्यादि वटहुकुम जारी झाले. दोन महिन्यांतच काँग्रेसचे कंबरडे मोडून तिला हतबल करून टाकण्याचा सरकारनें चंग बांधला, व जानेवारी महिन्यांत शेकडों संस्था बेकायदेशीर ठरल्या व त्या सरकारच्या ताब्यांत गेल्या.

मराठी मध्यप्रांतांतहि ह्या दडपशाहीचें लोण येऊन पोंचलें. तारीख ४ पासून तारीख ७ पर्यंत जें कांहीं प्रचारकार्य पहिल्या युद्धमंडळास करतां आलें तेवढेंच उघडपणें प्रचारकार्य झालें. २ तारखेपासून सुभाषचंद्र बोस-प्रभृति महनीय पुढारी पकडले गेल्यापासून नागपुरास कडक हरताळ पडूं लागले. शाळा व गिरण्या बंद पडल्या. त्यानंतर लागलीच सरदार पटेल म. गांधी ह्यांच्या अटकेनंतर जी जंगी जाहिर सभा नागपुरांत भरली त्यांत सरकारचें आव्हान मराठी मध्यप्रांतानें स्वीकारलें आहे अशी जाहीर घोषणा झाली, आणि परदेशी कापडाच्या बहिष्काराचा कार्यक्रम ठरविण्यांत आला. अध्यक्ष डॅ. अभ्यंकर, सेक्रेटरी पूनमचंद रांका, कोषाध्यक्ष श्री. भगवानदीन, सभासद आचार्य धर्माधिकारी व राजाभाऊ डांगरे ह्यांचें प्रांतिक युद्धमंडळ जाहीर झालें. लागलीच प्रांतिक सरकारनें देखील तारीख सात व आठला आर्डिनन्स लागू केले.

तारीख ४ पासून नागपुरांत बहुधा दररोज सभा भरत होत्या व हजारों लोक त्या सभांस हजर रहात. पिकेटिंग करण्याचा कार्यक्रम जाहीर झाला होता व त्याकरितां ५० स्वयंसेवकांस गणवेष देण्याचें एका सभेंत डॉ. खरे ह्यांनीं कबूल केलें होतें.

परंतु पिकेटिंगला सुरुवात होते न होते तोंच पहिल्या युद्धमंडळास ९ तारखेस अटक झाली. त्याचे दिवशीं ह्या सभांत न बोलणाऱ्या सौ. विद्यावती-

देवी, सौ. चंद्रभागाबाई पटवर्धन व सौ. सुशीलाबाई गाडगीळ ह्यांना देखील पकडण्यांत आलें.

१० तारखेस नागपूरचें टिळक विद्यालय, काँग्रेस हाऊस व असहयोगाश्रम ह्या संस्था बेकायदेशीर ठरल्या. टिळक विद्यालयाच्या सभोंवतीं पोलिसांचा गराडा पडला व जणूकाय एखादा किल्लाच आपण सर करीत आहों असा दिमाख पोलिसांनीं दाखविला. त्यावेळीं विद्यालयाच्या इमारतींत असलेले ६४ स्वयंसेवक व १० स्वयंसेविका ह्यांनाहि गिरफदार करण्यांत आलें. विद्यालयाची चीजवस्त जप्त करण्यांत आली. पोलिसांचें ठाणें विद्यालयांत बसलें व सरकारच्या उग्र दडपशाहीचा नागपुरास प्रारंभ झाला. ह्या धरपकडींत नगर काँग्रेस कमिटीचे सेक्रेटरी श्री. मामा पुराणिक व श्री. दादा वाचासुंदर, भोलासिंग, बजरंग ठेकेदारप्रभृती काँग्रेसचे कार्य जीवतोडून करणारे कनेक सच्चे काँग्रेस कार्यकर्ते पहिल्या प्रथमच सरकारच्या क्षोभास बळी पडले.

११ तारखेस २४ स्वयंसेवक व ६ स्वयंसेविका ह्यांना पिकेटिंगकरितां पकडलें. पिकेटिंग पहाण्यास लोकांची गर्दी जमे ती मोडण्यासाठीं घोडेस्वार लोकांच्या अंगावर फेकण्याची प्रथा आतांपासून सुरू झाली. निःशस्त्र व असहाय लोकांवर हातांत दंड्या घेतलेले घोडेस्वार व सार्जंट बेमुर्वतीनें सुसाट चालून जात. शहरांत सिटी कोतवाली, तहसिल कचेरी व टिळक विद्यालय ह्या ठिकाणीं खाकी-पोलिसांचे तळ पडले. १५ तारखेच्या आंतच सुमारें सत्तरों लोक तुरुंगांत डांबण्यांत आले. लोकांस दहशत बसावी म्हणून युद्धमंडळाचे अध्यक्ष डॅा० अभ्यंकर व शेठ पूनमचंदजी यांस दहा हजार रुपये असे खुनशीपणाचे दंड झाले. सरकारनें अगदींच ताळतंत्र सोडला. इतर सभासदांस २१२ वर्षे शिक्षा व २००-३०० रुपयांपर्यंत दंडहि ठोठावण्यांत आला. १४ तारखेस वानरसेनेचे प्रमुख प्रभाकर सावरदांडे ह्यांनाहि अटक झाली. नंतरचे अध्यक्ष बाबासाहेब देशमुख, कर्मवीर पाटक व सौ. गंगाबाई चौबे यांनाहि एकामागून एक शिक्षा झाल्या.

ह्या भयंकर दंडामुळें बार असोसिएशननें डॉ. गौर ह्यांच्या अध्यक्षते-खालीं सभा भरवून ह्या उग्र दडपशाहीचा निषेध केला. श्री. काशीप्रसाद पांडे यांनीहि तहकुबीची सूचना कौन्सिलांत आणली. सराफबाजारहि तीन दिवस बंद राहिला. सर्व प्रांतांत दडपशाहीचा वरवंटा जोरानें फिरूं लागला. ठिक-ठिकाणचीं युद्धमंडळें तुरुंगांत डांबण्यांत आलीं. नागपूरांत मवाळांतले मवाळ गणले गेलेल्या लोकांनीहि मोठ्या सभा भरवून सरकारचा निषेध केला. पण सरकारनें जुमानलें नाहीं. सुसंस्कृत राष्ट्र ह्मणून जो कांहीं दिखाऊ लौकिक ब्रिटिश सरकारचा शिलक राहिलेला असेल तो देखिल या वर्षीच्या पहिल्या दोनचार महिन्यांतील क्रूर, भीषण आणि रानटी दडपशाहीमुळें ह्या सत्याग्रहयुद्धांत ब्रिटिश लोकांनीं घालविला. वायव्यसरहद्द, गुजराथ, मद्रास वगैरे अनेक प्रांतांत जे अत्याचार सरकारनें केले त्यांची विश्वसनीय हकीकत अधिकारी रीतीनें अद्याप जनते पुढें यावयाचीच आहे. डॉ‍र्टन, मिस् स्लेड, कादर गुलविन् फ्रेन्डस् ऑफ इंडिया सोसायटी इत्यादि इंग्रज लोकांच्या मुखानेंच ही हकीकत थोडी थोडी बाहेर आली व पार्लमेंटमध्यें त्याचा पुसट ध्वनि निघाला. १९३२ सालीं सुरू झालेली मुस्कटदाबी अद्याप १९३५ अखेर सुद्धां संपलेली नाहीं. ऑर्डिनन्सेसचेच राज्य मुख्य मुख्य प्रांतांत सुरू आहे. ह्मणून ब्रिटिश राज्य-कारभारावर काळीमा फांसणारी ही हकीकत अद्यापहि उजेडांत येऊं शकत नाहीं.

या वातावरणाचे प्रतिध्वनि नागपूर प्रांतांतहि उमटला. खादीचा पोशाख घालणाऱ्या स्वयंसेवकांस मोटारमधून प्रवास करणें मुष्किलीचें झालें. स्वयंसेवक एखाद्या सभ्य गृहस्थाकडे राहिल्यास त्या गृहस्थास तुरुंगांत खेच-ण्याची उदाहरणें घडलीं; सभास्थानांवर घोडेस्वार नाचूं लागले. गर्दी मोडण्यास दंड्यांचा उपयोग सर्रास व्हावयास लागला. लहान मुलांना कोतवालींत पोपण्यांत येऊं लागलें. टिळक विद्यालयाच्या कित्येक मुलांनीं हा प्रसंग मोठ्या धैर्यानें आणि निर्भीडपणें सोसला. ह्या प्रांतांत ठिकठिकाणीं लाठीमार झाले. वर्ध्याच्या लाठीमाराचा सोभाग्य इंग्रजांनिष्ठ आणि राजनिष्ठ गणल्या

गेलेल्या कौन्सिलरांनीं देखील केला. श्री. केदार यांचीं तहकुबीची सूचना पास झाली.

जानेवारीअखेर नागपुरास सभाच होईनाशा झाल्या. सत्याग्रहाच्या धोरणाप्रमाणें सभेची वेळ व स्थळ बुलेटीनमध्यें जाहीर होई; परंतु सभा भरण्यांच्या वेळीं पोलीस घोडेस्वार यांनीं सभास्थान रोखून ठेवण्यांत येई. चिटणीसपार्क, पटवर्धन ग्राऊंड, दाजीस्कूल इत्यादि सभास्थानांवर लोकांची गर्दी होऊं नये अशी पोलीस व घोडेस्वार दक्षता बाळगीत असत, व त्यांनी लोकांना बेमुर्वत चापून काढीत. इमर्जन्सी ऑर्डिनन्स जरी नागपुरांत जारी झाला नाहीं तरी दडपशाहीचा रागरंग कांहीं इतर प्रांतापेक्षां कमी तीव्र नव्हता.

१५ जानेवारी पासून नेहमीप्रमाणे बुलेटिन दररोज निघूं लागलें, व कॉंग्रेसचा कार्यक्रम त्यामधून जाहीर होऊं लागला. या वर्षी तर बुलेटिन उघडपणें विकणें हा गुन्हाच होता. म्हणून मागच्यावर्षी प्रमाणें एक पैसा ही किंमत न घेतां बुलेटीनचा गुप्तप्रचार कॉंग्रेसचें स्वयंसेवक करीत असत, व तें बुलेटीन व्यवस्थितपणानें व्यापारी व सद्गृहस्थ ह्यांच्याकडे पोंचविलें जाई. हें बुलेटिन जेथें छापविलें जाई ती जागा शोधून काढण्याकरितां पोलिसांनी जंगजंग पछाडलें. कॉंग्रेस कार्यकर्त्यांनांही अतोनात दक्षता बाळगावी लागली.

जानेवारी महिन्याच्या अखेरीस स्वांतत्र्य–दीन साजरा करण्याचा प्रयत्न झाला. सौ. साळवे यांच्यासारख्या सुशिक्षित स्त्रीनें हा समारंभ चिटणीसपार्कांत कांहीं स्वयंसेवकांच्या तुकडीसमवेत करण्याचा प्रयत्न केला. पण चिटणीसपार्कांत शिरण्याच्या आंतच त्यांना अटक करण्यांत आली. चिटणीसपार्कांत कांहीं स्वयंसेवकांनी हुलकावण्या देऊन प्रवेश करून घेतला आणि पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव वाचला. पण पोलिसांनी त्यांना बेदारमपणें चोपून काढलें. अशा महत्वाच्या दिवशीं चिटणीसपार्कच्या बाहेर पुष्कळ गर्दी जमत असे. परंतु ती बेकायदा जमाव समजून त्याच्यावर पोलीस हल्ले करीत. चिटणीस-

पार्कासमोरील रस्त्यावरून जाणाऱ्यांवर पोलिस सारखे तडाखे लावीत. सकाळ-पासून रात्रीं १० वाजेपर्यंत हा त्रास लोकांना सहन करावा लागला. सकाळी श्री. रुईकर, यांच्यावर चालून गेले व सायंकाळी भय्याजी डोळके, पाचपोर व बापुराव चिमोटे यांना पोलीसनें यथेच्छ चोप दिला. पेशावर-दिनाच्या दिवशीं लोकांनीं खुबच उत्साह दाखविला. कडक हरताळ पाळला. लाल पोषाख केलेल्या टिळक विद्यालयांतील मुलांनीं टोळ्याकरून शहरभर निरनिराळ्या मोहल्यां-तून मिरवणूकी काढल्या. त्यांना पकडण्यांत आलें. लहान मुलांचें धैर्य पाहून कोतवा-लींत डी. सी. नें तर आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें. पटवर्धनग्राउंडवर या दिना-साठीं सौ. गंधे, ठिकेकर, छत्रे, हेरलेकर, भरुका, श्री. छत्रे, घाटे, सौ. कानिटकर, गिरें वगैरे अनेक स्त्रियांच्या मिरवणूकींस पकडण्यांत आलें. स्वातंत्र्य-दिनाच्या दिवशी २१ जणांस अटक झाली, व पेशावर-दिनासाठीं ४७ स्त्री-पुरुषांना कैद करण्यांत आलें. त्यांत श्री. दातार, सहस्त्रबुद्धे, अप्पाजी गांधी, वाचासुंदर, दंढिगे, धोकर काळीकर हें प्रमुख होते. सौ. गंगाबाई चौथे, श्री. पांडुरंग साबजी, नवीनचंद्र साखरदांडे, वैद्य, रानडे वगैरें अनेक कार्यकर्त्यांस शिक्षा झाल्या. याच महिन्यांत २७ तारखेस श्री. भाऊजी दप्तरी, पटवर्धन, हरिभाऊ मोहनी, गोळवलकर, दातार यांच्या घरांच्या कॉंग्रेस बुलेटीनसाठीं, व फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत, श्री. चैतन्यदास, भय्याजी उधोजी, गोविंदराव दाढादाणी व पूनमचंदजी यांच्या घरांच्या कॉंग्रेसफंडासाठीं झडत्या घेण्यांत आल्या. या झडत्यामुळें श्री. अप्पाजी गांधी, पटवर्धन, भारळकर यांना पकडण्यांत आलें.

जानेवारीच्या अखेरीस अशी स्थिति आली कीं, कधीं थिएटरांत तर कधीं बाजारांत, कधीं सोन्या चांदीच्या ओळींत, तर कधीं कोणत्याहि चव्हाट्यावर कॉंग्रेसचा कार्यक्रम स्वयंसेवक जाहिर करीत आणि मधूनमधून व्याख्यानेही देत. सरकारास हुलकावण्या देणें आणि थोड्या बहुत गनिमीकाव्यानें चळवळ लांब-विणें कॉंग्रेस कार्यकर्त्यांस भागच होतें. तथापि तुरुंगांत स्वयंसेवक पाठ्यावया-चा कार्यक्रम बुलेटिनद्वारा व्यवस्थितपणानें जाहिर होई व त्या कार्यक्रमाप्रमाणें

पोलीसही त्या त्या ठराविक जागीं हजर राहत. बुलेटींन हेंच युद्धमंडळाच्या धोरणाचीं सूचना सरकारास देणारे जबाबदार साधन शेवटपर्यंत राहिलें. बुलेटिन सरकारच्या डोळयांत कसें सुपत राहिलें हें अनेक झडत्यावरून सिद्ध होतें. फेब्रुआरी महिन्यांच्या अखेर श्री. शंकरराव वैद्य, निळकंठराव दाते, शेलेकर वकील, चंपालाल बागडी, देविप्रसाद बाघसी यांच्याहीं घरांच्या झडत्या झाल्या. पण कोणाच्याच घरी कांहींही सांपडलें नाहीं. जवाहिर-दिनाचा कार्यक्रम छापण्याच्या संशयावरून देशसेवक व समर्थप्रेसचीही झडती झाली. पण हाही संशय फुकटच होता. कर्मवीर पाठक, गंगाबाई चौबे, पांडुरंग सावजी, श्री. मारूळकर ह्यांच्या नंतर डॉ. बारलिंग्यासारख्या पी. एच. डी. पदवी धारण करणाऱ्या ब्रॅरिस्टरानें डिक्टेटर ह्मणून पुढें येण्याचें ह्यावेळीं धारिष्ट दाखविलें. डॉ. बारलिंगे हे ह्या धैर्यामुळें कॉंग्रेसचे महत्वाचें कार्यकर्ते व प्रांतांतील पुढारी ह्मणून पुढें गणले गेले.

श्री. रमेशचंद्र, बिंदुमाधव पुराणिक हेही चळवळींत सामील झाले. ह्या सर्व कार्यकर्त्यांस निरनिराळ्या शिक्षा देण्यांत आल्या. डॅा. अभ्यंकर व शेठ पुनमचंद ह्यांच्या घरच्या, दंडासाठीं जप्त्या झाल्या. श्री. अण्णाजी वाचासुंदर ह्यांनीं असेसर होण्याचें नाकारल्यावरून त्यांना ६ महिन्यांची शिक्षा झाली. ह्या महिन्यांत कौन्सिल भरलें असतां कौन्सिलांत शिरून कॉंग्रेससंबंधी पत्रकें, आक्षिप्त मजकुर वाचून दाखविण्याचें धैर्य कॉंग्रेसच्या स्वयंसेवकांनीं दाखविलें. सेक्रेटरीएटमध्यें देखील बुलेटीन्स वाटल्यामुळें श्री. रूपालीकर तुरुंगांत गेले. डॅा. अभ्यंकरांच्या बंगल्यावर जप्ती गेल्या वेळीं दंड न भरल्यामुळें त्यांची मोटार जप्त झाली. पुढें त्यांच्या घरचें सामानही जप्त करुन नेण्यांत आलें. व लिलांव बोलण्यास कोणी पुढें न आल्यामुळें वाटेल त्या किंमतीत तें विकून टाकलें. परंतु चंपालाल राठीनीं शेठ पुनमचंद ह्यांचा दंड त्या वेळीं भरला. शेठ पुनमचंद व डॅा. अभ्यंकर ह्यांचा शिक्षेबद्दल फारच गवगवा झाल्यामुळें ह्यांची शिक्षा एका वर्षानें कमी झाली व डॅा. अभ्यंकर ह्यांचा दंड २५०० पर्यंत, व पुनमचंदांचा १५०० पर्यंत उतरला.

काँग्रेसच्या आखिल हिंदुस्थानच्या डिक्टेटरांकडून निरनिराळे दिन साजरे करण्याबद्दल फर्माने निघत व ते दिन किंवा तो कार्यक्रम म. म. युद्धमंडळाकडून पार पाडण्याचा कसोशीनें प्रयत्न करण्यांत येई. पिकेटिंगसाठीं स्वयंसेवकांची व्यवस्था गुप्तपणें करावी लागे. ह्या महिन्यांत गांधीदिन, दांडीदिन, मासिक झेंडावंदन ह्यासाठीं एकंदर ३५ स्वयंसेवकांस अटक झाली. बुलेटीनसाठीं अण्णा, लावा व मराठे ह्या ३ विद्यार्थ्यांस ३ आणि ४ वर्षांसाठीं रेफर्मेटरींत पाठविण्यांत आलें.

डिस्ट्रिक्ट कोर्टांत काँग्रेस बुलेटीन वाटण्यांत आलीं व सर तेजबहादूर सप्रु येथें आल्यावेळीं हायकोर्टांतही तानवा स्वयंसेवकानें सर्वांस व्याख्यान दिलें. हें धाडस पाहून जमलेल्या मंडळीस फारच आश्चर्य वाटलें. ह्या महिन्यांत पोस्टावरही पिकेटींग करण्यांत आलें. टिळक ज्ञानमंदिराची बुलेटीनसाठीं झडती घेण्यांत आली व श्री सोवनीच्या घराची झडती घेण्याचा पोलिसांनीं प्रयत्न केला.

सर्व प्रकारचें उघड प्रचारकार्य बंद झाल्यामुळें कार्यकर्त्यांस मोठ्या सुलभतेनें स्वयंसेवक मिळवावे लागत. जेथें जेथें १९३० सालीं मोठ्या जोमानें कार्य झालें होते तेथून स्वयंसेवक मिळविण्याचा प्रयत्न होई. व हें कार्य देखील व्यक्तिशः करावें लागे. तथापि कामठी, रामटेक, आर्वी, उमरेड ह्या गांवांतून अनेक स्वयंसेवक नागपूरला येऊन त्यांनी युद्धमंडळाचें कार्य पुढें चालविलें, स्थानिक लोकांचें सहाय्य तर होतेंच. हरताळ पाळले जात व युद्धमंडळास पैशाची मदत आपसुखीनें मिळे. सरकारनें काँग्रेसचें कार्य दोन महिन्यांतच बंद पाडण्याची घोषणा केली खरी परंतु ही घोषणा अगदीच वायफळ ठरली. स्वयंसेवक कोठून येतात, जेवतात कोठें ह्यांची हेटाळणी पोलिसांकडून होऊं लागली. क्रांतिकारकांचा छडा लावावयास ज्या प्रमाणें पोलिस जुंपतात त्याचप्रमाणें ह्या अनत्याचारी चळवळीवर व स्वयंसेवकांवर पोलि[illegible]
फिरली. मार्च महिन्यांत श्री. कालीचरण सराफ ह्यांना स्वयंसेवकांस [illegible]
दिले ह्या संशयानें त्यांच वहीखातें तपासण्यांत आलें. व [illegible]

होऊन शिक्षाही झाली. बुलेटीनचा प्रसार करणाऱ्यांस मारहाण, व स्वयंसेवकांस चोप देणें हाही प्रकार सुरुं राहिला. परंतु जनतेचा कॉंग्रेसला मदत देण्याचा नूर पालटला नाहीं. असंतोषाची तीव्रता कायमच राहिली. व्यापारांस हरताळ पाडूं नये ह्यासाठीं जरब घालण्यांत आली. गव्हर्नरांनीं कांहीं व्यापाऱ्यांस बोलावून समज दिली असें ह्मणतात परंतु पोलीसांच्या व सरकारच्या ह्या कारवाईनें कोणी दबून गेले नाहींत. एप्रीलमध्यें पांडोबा बापट व श्री. पाटील, ह्यांच्या घरांची बुलेटीन करितां झडती झाली. परंतु बुलेटीनमध्यें उत्तरोत्तर सुधारणाच झाली. तें मराठी टाइपावर निघूं लागलें. सरकारी अत्याचाराबद्दल मजकूर छापून निघूं लागला. गांधी-दिन व राष्ट्रियसप्ताहांत ३५ स्वयंसेवकांस अटक झाली. ह्याच महिन्यांत दिल्लीला कॉंग्रेस भरविण्याचा एक उत्साहवर्धक कार्यक्रम आंखण्यांत आला. एप्रील महिन्यांत नागपूरहून भाऊजी दप्तरी, श्री. मा. ज. कानेटकर, श्री. पी. एम. नायडू, श्री. जगन्नाथराव गोखलेप्रभृति १४ प्रतिनिधी गेले होते व ह्या पैकीं बहुतेकांस तेथें अटकहि झाली. दिल्लीची कॉंग्रेस, सरकारनें कडेकोट बंदोबस्त, कॉंग्रेस न भरावी ह्या हेतूनें केला असतांही अखेर भरविलीच, व हिंदुस्थानभर ह्या अपूर्व संघटनेची प्रशंसा झाली, व सरकारची तितकीच नाचक्की झाली. श्री. धर्मवार वकिल, श्री. लोगकर, सोवनी, ढोळके वगैरे अनेक कार्यकर्ते ह्या महिन्यांतील राष्ट्रीय सप्ताहांत तुरुंगांत गेले. दिल्लीची कॉंग्रेस यशस्वी रीतीनें भरली व जनतेचा उत्साह ह्या कार्यक्रमानें दुणावला हें पाहून प्रांतांतहि अशीच एक प्रांतिक कॉंग्रेस भरवावी असें कार्यकर्त्यांनी ठरविलें. वऱ्हाड, महाकोसल व मराठी मध्यप्रांत ह्या तीन्ही प्रांतांनीं एकत्र होऊन परिषद यशस्वी करण्याचा निश्चय केला व त्या प्रमाणें कार्यक्रम आंखण्यांत आला. हें कार्य अवाढव्य व कार्याची पद्धती गुप्ततेची—यामुळें नागपूरच्या कार्यकर्त्यांस फारच काळजीनें हा व्यूह रचावा लागला. मे महिनाभर ह्यांत रात्रंदिवस कार्यकर्ते व्यग्र होते. ह्या महिन्यांतील गांधी-दिना निमित्त ४ स्वयंसेवक व स्त्रियांना अटक झाली. त्यांतील एक स्त्री अटकेंत असतांच प्रसूत झाली.

प्रांतिक परिषद भरविण्याची खटपट चालू झाली, व नागपूरच्या अनुभविक कार्यकर्त्यांनीं सर्व जुळवाजुळव केली. हें जाहीर होतांच सरकारनें हें राजकीय परिषदेचें मंडळ बेकायदा ठरविलें. त्यापूर्वी श्री. देशपांडे, डॉ. सोनक, श्री. टिकेकर, श्री. रामभाऊ धोती, श्री. भारुका, दत्तोपंत वैद्य, नानाजी पुराणीक, श्री. हरीभाऊ मोहनी ह्यांच्या घरांचीं झडती झाली. राजकीय परिषद बेकायदा ठरवितांच खामगांवचे भीमराव देशपांडे, वाघमारे व इतर स्वयंसेवकांस स्वराज्य विद्यालयाच्या धंतोलीवरील टिळक स्मारक ज्ञानमंदीरांच्या इमारतींत, परिषदेच्या ऑफिसांत अटक झालीं व ती इमारत सरकारनें आपल्या ताब्यांत घेतली. ता. २८ ला झडत्यांचा फारच सुळसुळाट झाला २९ तारखेस परिषद भरणार असें जाहीर झालें होतें व सर्व नागपूरभर गुप्तपोलिसांचा बुजबुजाट झाला होता. २९ तारखेस १ वाजेपर्यंत १८९ माणसांची झडती झाली. परिषदेची वेळ कोणासच ठाऊक नव्हती. परिषदेसाठीं जमलेल्या प्रतिनिधींस देखील एकच तास अगाऊ कळविण्यांत आलें होतें. ह्यांतील कांहीं प्रतिनिधींस तर स्टेशनवरच अटक झाली. परिषदेचें संयोजक व स्वागतमंडळाचें अध्यक्ष श्री. भारुका हेही आगाऊच पकडलें गेलें. पूर्वी ठरल्याप्रमाणें इतवारी चौकांत बरोबर १ वाजतां ही परिषद भरली. ह्या दिवस बाजारचा व ही जागा ऐन मोक्यावर तेव्हां प्रतिनिधी भराभर जमले. दिल्लीच्या कॉंग्रेसचे ठराव वाचले गेले. तेव्हां कोठें पोलीस जागे झाले. ही परिषद इकडे यशस्वी व्हावी ह्यासाठीं सकाळ-पासून कॉटनमार्केट इत्यादि ठिकाणीं तुकड्या धाडण्यांत येतच होत्या.

ह्या परिषदेचे स्वागताध्यक्ष भारुका यांस दिलें. व अध्यक्ष दुगचे श्री. घनःशामसिंग गुप्त हे होते. परंतु यांना अगोदरच पकडल्यामुळें पं० छेदीलाल हें अध्यक्ष व मय्याजी उधोजी हे सेक्रेटरी निवडले गेलें. ही परिषद यशस्वी करण्याच्या कामीं श्री० भरूका ह्यांनीं पुष्कळच प्रचार सर्व प्रांतभर केला होता. एकंदर ३०० महत्वाचे लोक नागपुरांत एकत्र जमले होते. त्यापैकीं २२५ प्रति-निधींना अटक झाली. ता० २५ ते २८ पर्यंत ६० लोकांस ··

२९ तारखेस दत्तोपंत वैद्य यांना अटक झाली. ह्या परिषदेचा रिपोर्ट फोटोसह छापून प्रसिद्ध करण्यांत आला आहे. झंडावंदनाचे वेळीं ८ स्त्रिया व ७ पुरुष ह्यांना अटक झाली यांत सौ० गंगादेवी तिडके ह्या प्रमुख होत्या. पकडलेल्या पदाधिकाऱ्यांस मोठमोठ्या दंडाच्या शिक्षा झाल्या. ह्या परिषदेनंतर अशाच पद्धतीनें तालुका व जिल्हा परिषदा भरविण्यांत आल्या. ह्या परिषदेस महाकोसल प्रांतांतून ७६, वऱ्हाडांतून १९, व मराठी मध्यप्रांतांतून २१३ प्रतिनिधी नागपुरास एकत्र जमले होते. जूनमध्ये श्री. काळी व खेमचंद चोरडिया ह्यांना शिक्षा झाल्या. ह्या सहा-माहींत बॅ. अभ्यंकर, कर्मवीर पाठक, डॉ. वारलिंगे, शेंदुर्णीकर, धर्मावार भाऊसाहेब टेंभेकर, लोकरे, रुईकर, या सत्याग्रहांत शिक्षा झालेल्या वकिलांच्या सनदा रद्द झाल्या. ह्या वेळीं बॅ. अभ्यंकरांनीं आपली कैफियत निर्भयवृत्तीनें व धेडरपणानें हायकोर्टापुढे मांडली. “हिंदुस्थानांतील जनतेपुढे वकील ह्मणून मिरविण्यापेक्षां वकिलवर्गांत माणसाची किंमत समजणारा असा मनुष्य ह्मणवून घेणें मला अधिक पसंत आहे” हे त्यांचे वाक्य त्यांच्या जाज्वल्य स्वाभिमानाचें द्योतक ह्मणून अढळ टिकणारें आहे. सर प्रफुल्लचंद्र राय नागपुरास गांधीच्या फोटोच्या अनावरणप्रसंगीं आल्यावेळीं कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनीं पत्रकें वाटून आपला प्रभाव गाजविला. ह्या प्रसंगीं देखील स्वयंसेवकांच्या तुकडीस अटक होऊन मारहाण करण्यांत आली. रायपूर, जबलपूर, उमरावती, व चांदा जेलमध्यें राजकीय कैद्यांस फार अपमानानें वागविलें ह्मणून हाकाटी झाली.

युद्धमंडळानें पहिल्या सहामाहीचें विवरण हिशेबासह छापून काढलें. त्यावेळीं सत्याग्रहींची संख्या १५०० च्या वर गेल्याचें नमूद केलें आहे. १९३० सालाप्रमाणें कापडाचें गठ्ठे-व्यापाऱ्यांनीं बांधून ठेविलें होतें. पंडित मालवीय, मीराबाई, वीणादास यांचीं पत्रकें गुजराथ व वायव्यप्रांत ह्यांमधील भयंकर अत्याचार वर्णन करणारें वाङ्मय ह्यांच्या हजारो प्रती प्रांतभर वाटे

पात आला. सरकारी इमारतींवर मोठ्या बहादुरीनें स्वयंसेवकांनी राष्ट्रीय झेंडे लावले. डॉ. गोविंदराव देशमुख ह्यांनीं स्वदेशी प्रदर्शन व मिरवणुकि काढून बहिष्कारांच्या वातावरणास महत्वाचें सहाय्य केलें. या सहामाहींत झालेला ८००० रुपये खर्चहि जनतेनें स्वयंस्फूर्तीनें दिला व कॉंग्रेसनें आज्ञा देतांच कडक हरताळ पाळले. जुलै महिन्यांत पुन्हां आर्डिनन्सेस जारी झाले. या महिन्यांत अखिल भारतीय राजबंदी–दिन साजरा झाला. व त्यांत २५।३० इसमांस अटक झाली. स्वयंसेवकांनीं लॉर्ड विलिंगडनच्या पुतळ्याची मिरवणूक काढून निषेध व्यक्त केला. जिल्हाकचेरी वरील युनियन जॅक खालीं ओढलें. पोलिसांच्या ताब्यांत असलेल्या टिळक विद्यालयावर मोठ्या मर्दुमकीनें राष्ट्रीय निशाण लावलें. बाळकृष्ण देऊळे नांवाच्या तरुणांस निशाणाबद्दल फटक्याची शिक्षा झाली.

सरकारनें ताब्यांत घेतलेल्या इमारतीवर अनत्याचारी हल्ले चढवि-ण्याचा उत्साहवर्धक कार्यक्रम या सुमारास हातीं घेण्यांत आला, व त्यांसाठीं ३ वेळां अनेक स्वयंसेवकांचें धैर्य दृष्टोपत्तीस आलें. जंगल सत्याग्रहांसाठीं जुलै महिन्यांत मोहिम काढण्यांत आली. व तेलंगखेडीच्या जंगलांत शिरण्याचा उपक्रम करण्यांत आला. अमरावती तुरुंगांतील अत्याचारांची कहाणी ह्यावेळीं जगजाहिर झाली होती. सुटून आलेल्या सत्याग्रह्यांनीं आपल्या सह्यानिशीं हे अत्याचार प्रसिद्ध केले. कायदेमंडळांतहि ह्या अत्याचाराचें प्रकरण पुष्कळच रंगलें. टिळक विद्यालयांतील जवळजवळ दहा हजार रुपयांचा जप्त माल सरकारनें ६०० रुपयांस विकून टाकला व प्रां. कॉं. क. व टिळक विद्याल-याचे कागदपत्र नाहींसे करून टाकले. हिन्दुस्थानांत असा सुनशीपणा कोठेंच दृष्टविष्यांत आला नाहीं.

सप्टेंबर महिन्यांत महात्माजींच्या प्राणांतिक उपवासामुळे जनतेचें लक्ष जातीय निर्णयाकडे लागलें. पुणें करार होईपर्यंत या प्रांतांत सुमारें ३०० फों. विद्यार्थ्यांनी चरबुळ करून हरिजन चळवळीस जनतेचा पाठींबा संपादन के

टिकेकर व रामभाऊ श्रोती हेही व्हाइसरॉय आगमनाचे बहिष्काराचें वेळीं पकडलें गेलें. स्वातंत्र्य-दिनाचें वेळीं श्री. हरीभाऊ मोहनी व कर्मवीर पाठक ह्यांनीं स्वातंत्र्याचा ठराव वाचून-व्याख्यानें दिल्यामुळें शिक्षा झाली. कर्मवीर पाठक फक्त एक आठवडाच तुरुंगांच्याबाहेर राहिले होते. १९३३ मार्च मध्यें कॉंग्रेस सप्ताह साजरा झाला व कलकत्ता कॉंग्रेसची तयारी करण्यांत आली. ह्या कॉंग्रेसला जाणारे प्रतिनिधी नागपुरात प्रचार करीत एकत्र झाल्यामुळें पोलीसांनीं धरपकड सुरूं केली. श्री. तिजारे, राधाकिसन बजाज, नानाजी नल्ले, वामनराव दाणी वगैरे अनेक लोकांस अटक झाली. या कलकत्ता कॉंग्रेसला एकंदर ६८ प्रतिनिधी जाणार होते. श्री. नायडू बाकी लही या प्रतिनिधींत होते. नागपूरचें १५, नागपूर तहसिलींमधून १२, वर्धा तहसिलीचें ७, आर्वीचे २ हिंगणघाटचे ५ रामटेकचे १०, उमरेड, सावनेर, काटोल, प्रत्येकी २, गोंदियाचे ११ असे प्रतिनिधी गेले होते. कॉंग्रेस सप्ताह व कलकत्ता कॉंग्रेसचे प्रचार कार्य करीत असतां अनेक स्वयंसेवक ह्यावेळीं तुरुंगांत गेले. महात्मा गांधीनी पुन्हां उपवास केल्यामुळें मे महिन्यांत कायदेभंग तहकूब झाला, व त्या नंतर पुण्यास सर्व हिंदुस्थानांतील पुढारी एकत्र जमून त्यांनी विचार विनिमय केला. नागपुरांतून बॅ. अभ्यंकर, डॉ. खरे बाबासाहेब देशमुख कर्मवीर पाठक व सौ. अनुसूयाबाई काळे गेल्या होत्या. जुलै महिन्यांत सर्वाधिकारी बापूजी अणे यांनीं पुन्हा वैयक्तिक कायदेभंगाचे फर्मान काढलें. आगस्ट महिन्यांत महात्मा गांधी ३३ अनुयायांसह अमदाबादेस पकडले गेले. वैयक्तिक कायदेभंगानिमित्त नागपुरांत आपाजी तिजारे व हरिश्चंद्र यांस शिक्षा झाली. महात्मा गांधींस जेलमध्यें अस्पृश्यता निवारणाबाबत पूर्वीच्या सवलती न मिळाल्यामुळें त्यांनीं उपवास सुरूं केला, व शेवटीं सरकारानें त्यांस सोडलें. पुढें ते वर्ध्यास प्रकृती स्वास्थ्यासाठीं येऊन राहिले. तेव्हांपासून आजवर त्यांचें या प्रांतांत वास्तव्य राहिल्यामुळें आमचा प्रांत अखिल भारतीय कॉंग्रेस राजकारणाचें केंद्र बनला, व मोठ्या पुढाऱ्यांचीं वर्ध्यास रीघ सुरूं झाल्यामुळें प्रसंगोपात

निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या भेटी—आपणाच नागपुरला व इतर गांवांना लाभ मिळून जागृतिलाही मदत झाली.

१९३३ च्या डिसेंबरांत पुणें परिषदेच्या निर्णयाविरुद्ध शेठ पुनमचंद रांका व त्यांच्या बरोबरीच्या कांहीं स्वयंसेवकांनीं नागपूर नगर युद्धमंडळ स्थापन केलें व ब्रिटिश मालाचे बहिष्कारामुळें त्यांना शिक्षा झाली. त्यानंतर या प्रांतांत श्री. जमनलालजींच्या नेतृत्वाखालीं १९३४ च्या आरंभीं बहिष्कार-कमिटी स्थापन झाली, व तिनें प्रांतभर दौरा केला. तिचें ऑफिस पुढें नागपुरांतच आलें, व फेब्रुवारी महिन्यांत श्री. रामकृष्ण बजाज, हरीभाऊ मोहनी, श्री. मनोहर मेढे, दासानें वगैरे या बहिष्कार कमिटीचें कार्य करणाऱ्या सत्याग्रहींस शिक्षा झाली त्यासंबंधीं बचाव देण्यांत येऊन शेवटीं शिविजनमध्यें, ही मंडळी निर्दोष सुटली. खटल्याचें काम बॅ. गोविंदराव देशमुख यांनीं बॅ. अभ्यंकरांच्या सहाय्यानें केलें.

या दुसऱ्या मोहिमेंत नागपूर जिल्ह्यांतून ५३४, वर्ध्यांतून ५१२, भंडाऱ्यांतून ८२ व चांद्यांतून ४७ असे स्वयंसेवक जेलांत गेल्याचें युद्धसरकारी रिपोर्टांत नमूद आहे. याशिवाय कितीतरी स्वयंसेवकांना मारहाण करून सोडून देण्यांत आलें. मे महिन्यांत कायदेभंग तहकूब करण्यांत आला व जेलमधील सर्व राजकीय बंदी सोडण्यांत आले. अशा रीतीनें १९३२ पासून चाललेली सत्याग्रहाची दुसरी मोहिम समाप्त झाली.

ही मोहिम अत्यंत बिकट प्रसंगीं चालविण्याचें सर्व श्रेय डॉ. खरे व श्री. टिकेकर यानांच आहे. त्यांचे जोडीला हरीभाऊ मोहनी, डॉ. सोनक, रामभाऊ श्रौती, नानाजी पुराणिक व दत्तोपंत वैद्य हेही त्यावेळच्या मंत्रीमंडळांत असून यांनीं चळवळीचीं सूत्रें फार कौशल्यानें चालविलीं. ही १९३२—३३ ची चळवळ चालविण्यास १९३० च्या मानानें अधिक कौशल्याची गरज होती, कारण यावेळीं आर्डिनन्सेसचा अंमल फार कडक असल्यामुळें बहुतेक प्रमु

रीतीनें व नेहमीं धोरणांत राहून करावी लागत. म्हणून डॉ. खऱ्यांच्या नेतृत्वाचें व त्यांच्या सहकाऱ्यांच्या कर्तृत्वाचें महत्व विशेष आहे. तसेंच ऑ. इं. कां. कमेटीनें या चळवळीच्या खर्चासाठीं रक्कमहि देऊं केली पण तिचा स्वीकार न करितां या प्रांतानें नेहमींचे वहिवाटी प्रमाणें, सर्व खर्च स्वतंत्रपणें सोसला हाही एक महत्वाचा विशेष होय

ही परिस्थिती ऑ. इं. कां. कमिटीला माहित असल्यामुळें डॉ. खरे यांचें नांव ऑ. इ. कॉंग्रेसचे अध्यक्षांचे यादींत समाविष्ट केलें गेलें. व त्याप्रमाणें त्यावेळचे राष्ट्रपति लो. बापूजी अणे यांचेकडून तयारींत असण्याचें आज्ञापत्र आलेलें डॉ. खरे यांनीं स्वीकारिलेंही होतें; परंतु पुढील अध्यक्ष श्री. शार्दुलसिंग कवीश्वर ह्यांनीं ती प्रथा पुढें बंद केल्यामुळें तो योग घडून आला नाहीं.

तरी १९३३ च्या मार्च मध्यें अखिल हिंदुस्थानांत जेलमधून बाहेर सुटून आलेले निरनिराळ्याप्रांतांतील प्रमुख कॉंग्रेस पुढाऱ्यांची सभा पुढील परिस्थितीचा विचार करण्यासाठीं भरविण्यात्यें ठरून ती जबाबदारी आपले प्रांतावर देण्यांत आली. लगेच डॉ. खरे यांनीं प्रांतांत संदेश पाठविले व आपले बंगल्यांत ती बैठक घडवून आणली व तींत असें स्पष्ट आपलें मत दिलें कीं एकंदरीत परिस्थितीचा विचार करितां यापुढें कांग्रेस ही जर राजकीयदृष्ट्या वर्धिष्णुसंस्था म्हणून कायम ठेवावयाची असेल तर कार्यक्रमाशिवाय आतां गत्यंतर नाहीं.

१० वर्षांनीं पुनः पार्लमेंटरी बोर्ड अस्तित्वांत आलें. व यापुढें निदान कांहीं वर्षे पार्लमेंटरी बोर्ड हें कॉंग्रेसच्या राजकारणाचा मुख्य आखाडा राहील असा संभव दिसतो. १९२१ सालीं कट्टरपक्ष व स्वराज्यपक्ष ह्यांत जसा मतभेद होता तसा पार्लमेंटरीबोर्डाशीं मतभेद असणारे कॉंग्रेस कार्यकर्ते आजहीं आहेत. पण कॉंग्रेसनें स्वतःच्या चळवळींच्या अनेक शाखोपशाखा सुरू केल्या असून त्यांमध्यें त्यांच्या कर्तव्याला पुरेसा वाव आहे व म्हणूनच १९२१ च्या मानानें भिन्न मतांच्या कार्यकर्त्यांत आज अधिक सहकार्य आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या नव्या परिस्थितींत कॉंग्रेसपुढें स्वतःची संघटना दृढ करून विधायक कार्यक्रमावर जोर देणें व कायदेमंडळांतीलहि लढा सुरू ठेवणें हे दोनच विषय उरले, आणि त्याबाबतींत कॉंग्रेस पराकाष्ठा करीत आहे. सबब १९३३ ते आजपावेतों कॉंग्रेसच्या इतिहासांत विधायक कार्यक्रम व पार्लमेंटरी बोर्डाच्या हालचाली प्रामुख्यानें दिसाव्या हें फार स्वाभाविक आहे. हा अगदीं अलीकडचा वृत्तांत लोकांच्या स्मरणांत ताजा असल्यामुळें या कालांतील हकीकतीचा फक्त सारांशरूपानें उल्लेख केला म्हणजे पुरें होईल.

महात्मा गांधींनी प्रथम हरिजन कार्यावर जोर देण्याचें ठरवून अखील हिंदुस्थानांत दौरा करण्याचें ठरविलें व ता. ८ नोव्हेंबर १९३३ रोजीं नागपुर पासुनच या अखिल भारतीय दौर्‍यास सुरवात झाली. नागपुरांतील महात्माजींच्या स्वागताची सभा लोकांना अजून आठवते. १६ तारखेपावेतों महात्माजी या प्रांतांत फिरले व या दौर्‍यानें महात्माजी फार खुष झाले हें त्यांच्या हरिजन मधील स्वदस्तूरच्या पुढील लेखावरून स्पष्ट होईल. "डॉ. खरे व हरिजन कमीटीनें केलेली व्यवस्था व कार्यक्रम अभिनंदनीय होता. डॉ. खर्‍यांना नेहमींच्या हृद्रोगानें पछाडलें असूनही, त्यांनीं घेतलेली मेहनत व त्यांच्या सहकार्‍यांनीं केलेलें सहाय्य, यामुळेंच ठरलेला कार्यक्रम पार पडूं शकला. नागपूरच्या जंगी जाहिर सभेचा खर्च लोकांनी आपखुषीनें सोसला असें मी ऐकतों. टिकेकरांचें घर जणुं तात्पुरती धर्मशाळा बनली व टिकेकर बंधूंनीं

आमची बरीच मंडळी व इतर लोक यांची उत्कृष्ट सोय करण्यांत श्रम व खर्च यांकडे पाहिलें नाहीं. काँग्रेसवाले व इतर लोक यांनी तो दौरा पूर्णतः यशस्वी करण्यांत पूर्ण सहकार्य केलें. या प्रसंगीं केलेल्या श्रमांबद्दल डॉ. खरे व त्यांच्या अनुयायांचें अभिनंदन करतों. आपणांस अभिप्रेत असणाऱ्या आत्मशुद्धीच्या कार्यांत हा जो जागरूकपणा दाखविण्यांत आला तेवढी त्या कार्याची योग्यताही आहे.

ता. १५।१।३४ ला अकल्पितपणें विहार भूकंप झाला व जणूं काय या दैवी आपत्तीला तोंड देण्याकरितांच राजेंद्रबाबूंची याचवेळीं जेलमधून सुटका झाली. व तेहि लगेच त्या कामाला लागले. प्रांतोप्रांतीहून बाबूजीकडे मदत पाठविण्यांत आली व त्या प्रसंगी काँग्रेसनें विहार प्रांतांत जी अभिनंदनीय कामगिरी करून दाखविली ती सर्वश्रुत आहेच. आपले प्रांतांतही डॉ. खरे यांचे नेतृत्वाखालीं एक कमिटी स्थापन होऊन पैसे, कपडे, व सहचशुदे वगैरे कार्यकर्ते यांना पाठविण्यांत आले. विहार भूकंप अखिल भारतीय कमिटीवर डॉ. खरे हे सदस्य आहेत.

७ एप्रीलला महात्मा गांधींनी कायदेभंग सर्वस्वी तहकूब केला व त्याला २०।४।३४ च्या वर्किंग कमिटीनें मान्यता दिली. २ मेला रांचीस कौन्सिल-वालापक्ष स्थापन करण्यासाठीं सभा झाली, व नंतर पाटण्यास १८-१९ तारखेस सभा होऊन महात्मा गांधींचा कौन्सिलप्रवेशाला मान्यता देणारा ठराव पास झाला. याच सुमारास काँग्रेसच्या धोरणाचें समर्थन करणारे "निरुद्ध" पत्र नागपुरास १३ मे पासून सुरू झालें. १२ जूनला वर्ध्यास वर्किंग कमिटी भरून तेथें काँग्रेसनें पार्लमेंटरी बोर्डास सर्वतोपरी सहाय्य करण्याचें धोरण ठरविलें.

या नंतर जी असेंब्ली निवडणूक पुढें यावयाची होती तिला बॅ. अभ्यंकरांची प्रकृती चांगली-नसल्यामुळें प्रथम डॉ. खरे यांना प्रांतिक कमिटीनें उमेदवार निवडलें, पण पुढें वर्ध्यास बरीच वाटाघाट होऊन महात्मा गांधींच्या

आग्रहांमुळें ता. २६।१।३४-ला बॅ. अभ्यंकरांना उमेदवार म्हणून उभें राहणें भाग पडलें व सरदार वल्लभभाईनीं त्यांची उमेदवारी नागपुरास लगेच जाहिर केली. १७ नोव्हेंबरला बॅ. अभ्यंकर विजयी झाले व प्रांतभर या कॉंग्रेस विजया निमित्त सभा झाल्या. २१ नोव्हेंबरला चिटणीसपार्कमध्यें बॅ. अभ्यंकरांच्या अध्यक्षतेखालीं राजाजी, सरदार वल्लभभाई, दे. भ. गंगाधरराव देशपांडे व डॉ. खानसाहेब यांचीं भाषणें झालीं. या सभेंत अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण अभ्यंकरांचें अखेरचें जाहिर भाषण होय. त्यानंतर अभ्यंकरांची प्रकृति क्षपाट्यानें खालावत जाऊन मुंबईस ता. २ जानेवारी रोजीं मधुमेहाच्या विकारानें बॅ. अभ्यंकरांचा मृत्यु झाला व आमच्या प्रांतांतील राजकारणांत लवकर न भरून निघणारें खिंडार पडलें.

यानंतर डॉ. खरे पोटनिवडणुकींत बिनविरोध निवडून आले. ७ फेब्रुआरी ३५ ला नागपुरांस व प्रांतांत जॉइंटपार्लमेंटरी रिपोर्टाचा निषेध करण्यांत आला. २४ फेब्रुआरीला सीताबर्डीवरील खादी भांडार महात्मा गांधींच्या हस्तें उघडलें गेलें. १७ मार्चला राष्ट्राध्यक्ष राजेंद्रबाबुंनीं नागपुरांस भेट दिली व त्यांचें थाटानें स्वागत झालें. २३ जूनला कॉंग्रेसच्या आदेशानुसार येथें राजबंदिदिन व ३० जूनला केयादिन पाळण्यांत आला. १५ आगस्टला बॅ. अभ्यंकरांच्या स्मरणार्थ शेवडेबंधूंनीं स्वतःच्या प्रयत्नानें ' इंडिपेंडंट ' नांवाचें इंग्रजी साप्ताहिक सुरुं केलें. ३ नोव्हेंबरला नागपुरास कॉंग्रेस ज्युबिलीनिमित्त पहिली सभा झाली व तिच्या कार्यक्रमांतील एक भाग म्हणूनच हा प्रांतिक इतिहास प्रसिद्ध होत आहे. सर्व समारंभांची जय्यत तयारी चालू असतां ता. १० डिसेंबरला श्री. गणपतरावजी टिकेकर वारल्यामुळें प्रांतभर खेदाची छाया पसरली. परंतु या सुवर्ण महोत्सवांमध्यें गुंतलेल्या सर्व कार्यकर्त्यांनीं ही खेदाची व औदासिन्याची वृत्ति केवळ कर्तव्यबुद्धिनें व कॉंग्रेसनिष्ठेनें बाजूला सारून ज्युबिलीचा कार्यक्रम यशस्वीकरून दाखविण्याचा कसून प्रयत्न केला व ठराव ठरल्याप्रमाणें ता. १५ डिसेंबर रोजीं अखिल भारतीय खादी ग्रामोद्योग व स्वदेशी प्रदर्शन राष्ट्रपति बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या हस्तें उघडण्यांत आलें.

# वानरसेनेचें कार्य.

आरंभीं परदेशी येण्यांच्या होळ्या व प्रभातफेऱ्या या कार्यापासून सुरवात करून वानरसेनेनें हळूहळू परंतु व्यवस्थेशीर रीतीनें आपली संघटना करून दिवाळीच्या सुमारास युद्धमंडळाच्या अनेक विभागांत महत्वाचें स्थान पटकाविलें व यानंतरच्या कार्यक्रमांत अपूर्व कामगिरी करून युद्ध मंडळाकडून व जनतेकडून धन्य धन्य म्हणवून घेतलें.

चळवळीच्या उत्तरभागांत युद्धमंडळाच्या आधारस्तंभांत मोडणाऱ्या या विभागाचा उगम यु. मं. चें कॉंग्रेस बुलेटिन विकत घरोघर हिंडणाऱ्या लहान मोठ्या मुलांत होतें असें आढळून येतें. या बालवर्गानें होळ्या, मिरवणुकी सभा, प्रभातफेऱ्या, झेंडावंदनें बुलेटिन विक्री या कार्यक्रमांत उत्साहानें भाग घेतला. कॉंग्रेस स्वयंसेवक बनून कायदेभंग करून तुरुंगांत जाण्याची त्यांची तयारी असे परंतु वयाच्या अडीमुळें त्यांस हिरमुसलें व्हावें लागत असे! अनेकदां तर वय कमी असतांहि जास्त सांगून हीं मुलें तुरुंगांत गेल्याचीं उदाहरणें आहेत.

नागपुरांत वानरसेनेची १ ली स्वतंत्र मिरवणूक ऑक्टोबरच्या १ ल्या आठवड्यांत काढण्यांत आली या मिरवणुकीस सुमारें २०० मुलें हजर होतीं. दुसरे दिवसापासून वानरसेनेंतील स्वयंसेवक नोंदण्यास सुरवात झाली व लवकरच हा आंकडा १५० पर्यंत गेला. या मुलांना बुलेटिन विक्री करणें, निरोप पोंचविणें, दवंड्या देणें, वगैरे कामें दिली जात. यांपैकीं बहुतेक मुलें शाळांतून शिकत असल्यामुळें वरील सर्व काम तीं फावल्यावेळांत करीत असत, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. बुलेटिन विक्री करणारी कित्येक मुलें तर शाळेंत जातांना कॉंग्रेस ऑफिसांत येऊन बुलेटिनचे अंक घेऊन शाळेपर्यंत जातांना विक्री करीत व शिल्लक अंक शाळा चालू असतांना खिशांत ठेवून १० मिनिटांच्या सुटीतही विक्री करण्याकरितां बाहेर पडत.

श्री. करमरकर यांचे नेतृत्वाखालीं वानरसेनेनें परदेशी कापड पिकेटिंग, दारू पिकेटिंग, खानेसुमारीवरील बहिष्कार, होळीच्यावेळीं रंगावरील बहिष्कार या कार्यक्रमांत युद्धमंडळाला उत्तम प्रकारें मदत केली. दारू पिकेटिंग करण्याबाबत २ स्वयंसेवक, गंगाधर नारायण इंडे व मोतिराम खांडेकर यांना ता. ३१-१-१९३१ रोजीं अटक झाली. या शिवाय ता. ८-२-१९३१ रोजी वानरसेनेनें बालवीर स्मृतिदिन साजरा केला.

सन १९३१ मध्यें गांधी इर्विन तह झाला. ह्यामुळें जर पुढें युद्ध झालें तर त्यांत भाग घेता यावा ह्मणून या शांततेच्या काळांत वानरसेना कमिटी स्थापन करण्यांत आली. या कमिटीचे अध्यक्ष प्रभाकर साखरदांडे आणि सेक्रेटरीजू भावे आणि करमरकर हे होते. १९३२ मधें श्री. साखरदांडे यांना १ वर्ष सक्त मजूरी आणि १०० रु. दंड अशी शिक्षा झाली.

त्यांनंतर दुसरे अध्यक्ष श्री. इंडे ह्यांना दांडी-दिन पाळल्याबद्दल ५ वर्षांची शिक्षा देऊन रिफर्मेटरी स्कूलमध्यें पाठविण्यांत आलें. त्याचप्रमाणें मथुराप्रसाद पटवी यालाही त्याच आरोपावरून ४ वर्षांची शिक्षा सुनावण्यांत आली, आणि त्याला जबलपूरला पाठविण्यांत आलें. जवाहिर-दीनाबद्दल अन्ना लक्ष्मण आणि लव्हा या दोघांना चार वर्षांची शिक्षा देण्यांत आली. श्री. काशीनाथ मराठे ह्यांस बुलेटीन वाटल्याबद्दल पकडण्यांत येऊन ४ वर्षे शिक्षा सुनावण्यांत आली. वरील सर्व व्यक्तींना २॥ वर्षांच्या खडतर तुरुंगवासानंतर सरकारनें त्यांची सुटका केली.

वानरसेनेनें केलेली अपूर्व कामगिरी लक्ष्यांत आणून जनतेनें खालील वानरांना ता. ८।७।३४ रोजीं पदव्या दिल्या त्या
बालकेसरी-गंगाधर इंडे, बालभूषण-काशीनाथ मराठे, व बालरत्न-...

वानरसेनेची कल्पना अनेक ठिकाणीं उचलण्यांत आली. ठिकठिकाणच्या वानरसेनेचा वृत्तांत त्या त्या तालुक्यांत दिला आहे.

—※—

# भाग ४ था

# कांग्रेस चळवळीचा तहसीलवार इतिहास



## प्रकरण पहिलें

## नागपूर तहसील

या तहसिलीत कामठी, गुमगाव, चोरी, हिंगणा, बडोदा, बाजारगांव, आष्टा, म्याहार, कवडस इ० मोठीं गावें आहेत.

१९३० पूर्वी तहसिलीत ठिकठिकाणीं महत्त्वाचें वेगळें असें कार्य होत नसे. कामठीस नागपुराची प्रत्येक चळवळ प्रतिबिंबित होई आणि इतर लहान गावें नागपूरच्या चळवळींतच समभागी असतील असें मानण्यास हरकत नाहीं. १९३० सालच्या चळवळींत मात्र ठिकठिकाणीं खास चळवळ झाली.

१९३० चा महात्माजींचा मिठाचा सत्याग्रह सुरू झाला तेव्हा कामठी शहरात निरनिराळ्या लहान मोठ्या सभा होऊं लागल्या त्यानून प्रतिबंधित वाङ्मय वाचणें, बेकायदा मीठ विकणें इत्यादि काम सुरू झालें. यांत श्री. मनसुखलाल व श्री. सुंदरलालजी यांनीं पुढाकार घेतला होता. एका सभेंत रामकृष्ण रामनाथ अगरवाल यांनीं रायसाहेबी ग्रहण केली याचा निषेध करण्यांत आला. त्याचा परिणाम होऊन शेटजींनीं राय-

गेल्या होत्या. सुमारें ४० लोकांस अटक करण्यांत आली. त्यांपैकीं १० जणांस नागपुरास सेंट्रल जेलमध्यें पाठविण्यांत येऊन बाकीच्यांस सोडून देण्यांत आलें. ह्यांपैकीं प्रत्येकास ६ म. स. म. ची शिक्षा झाली.

ह्यानंतर निरनिराळे दिन पाळण्यांत आले. त्यांत जवाहरलाल व वल्लभभाई पटेल यांच्या अटकेनिमित्त सभा, मोतीलाल यांचें आयुरारोग्यचिंतन दिन, बारडोली दिन व राष्ट्रीय सप्ताह हे विशेष महत्त्वाचे होत. ह्या प्रत्येक वेळीं मिरवणूक, सभा, झेंडावंदन वगैरे कार्यक्रम होत असत.

राष्ट्रीय सप्ताह संपल्यानंतर करबंदीच्या चळवळीकरितां श्री. वैद्य –तालुका युद्धमंडळाचे अध्यक्ष–यांनीं दौरा काढला असतांना ते पकडले गेले. तेव्हां श्री. कोटपल्लीवार हे दुसरे अध्यक्ष झाले. यांनीं आपल्या हातीं दारू पिकेटिंगचें काम घेतल्यामुळें त्यानाही लौकरच पकडण्यांत आलें.

तारीख ३०।१।३१ लाच युद्धमंडळाचे सेक्रेटरी श्री. राधाकृष्ण पाटील यांच्या तुकडीस दारूगुत्त्यावर पिकेटिंग करीत असतांना पकडण्यांत आलें. यानंतर दुसरी तुकडी श्री. फजीतराव पैहेलवान यांच्या नेतृत्वाखालीं गेली. तिला तारीख ६।२।३१ ला पकडण्यांत आलें. ह्यानंतर तिसरी तुकडी संपतराव यांच्या नेतृत्वाखालीं तारीख २१।२।३१ ला पकडली गेली.

गोंदणी–टाकळी येथें ५।६ शें घोडेस्वारांनीं शेताची नासधूस केली. पोलीसांनीं प्युनिटिव्ह टॅक्स मागितला असतांना शेतकऱ्यांनीं देण्याचें नाकारलें म्हणून ही नासधूस करण्यांत आली.

अशा प्रकारें चळवळ चालू असतानाच गांधी-इर्विन करार झाला. त्याप्रमाणें युद्ध तहकूब करण्यांत आलें व युद्धमंडळ रद्द होऊन पुनी का. क. पुनः अधिकारारूढ झाली. ता. १८।९।३० पासून ता. ११।२।३१ पर्यंत एकंदर ६४ मोठ्या सभा झाल्या. ४१ लोक पकडले गेले. ७ कची कैद व बाकीचे शिक्षा भोगून आले. ४२९ रु. दंड वसूल करण्यांत आला.

साहेबी सोडल्याचें कमिटीला तीनचार दिवसांत कळविलें. तेव्हां त्यांच्या अभिनंदनार्थ चौथी सभा झाली. पांचवी सभा दे. भ. पुनमचंदजी रांका याना मानपत्र देण्याकरितां झाली होती.

ह्या चळवळीचें लोण तोंपावेतों खेडोपाडीं पोहोंचलें नसल्यामुळें प्रचारकार्याची फार आवश्यकता होती व त्याकरितां पंडित, परांजपे, गद्रे व दत्तोपंत वैद्य यांची योजना झाली व त्यांनीं उत्कृष्ट काम केलें.

प्रांतिक कॉं. क. च्या आज्ञेप्रमाणें २५ आगस्ट १९३० हा दिवस सार्वजनिक सत्याग्रहाचा ठरला होता. त्याप्रमाणें पुढील ठिकाणीं सामुदायिक जंगलसत्याग्रह करण्यात आला:—

**बुटीबोरी**–येथें नागपूरचे वसंत बाळकृष्ण बखले व श्री. द्वारकानाथ धोटे, B. A. ह्यांच्या नेतृत्वाखालीं सुमारें ५००० स्त्रीपुरुषांनी जंगलसत्याग्रह केला. श्री. बखले याना शिक्षा झाली.

**हिंगणा**–नागपूरचे निमगावकर यांचे नेतृत्वाखालीं ५०० स्त्रीपुरुषांनी सत्याग्रह केला.

**सुकली**–साकोलीचे जंगलांत सुमारें १४ गावच्या लोकांनीं जंगलसत्याग्रह केला.

**रामागांव** (खापाखुर्द)–येथें मालगुजार व स्त्रिया कायदेभंगांत प्रमुख होत्या.

**रिंगणाबोडी**–येथें गंगाबाई चौबे यांच्या नेतृत्वाखालीं १५ हजार लोकांनीं जंगलसत्याग्रह करून कायदेभंग केला.

अशा प्रकारें २५ आगस्टला सुमारें २२ हजार लोकांनीं सामुदायिक कायदेभंग करून कॉंग्रेसवरचा आपला विश्वास प्रगट केला.

आक्टोबर महिन्यांत कौन्सिल निवडणूक होणार होती व त्यावर बहिष्कार घालण्याचा हुकूम आला असल्यामुळें तयारी करण्यांत येऊन ता. १०।११।३० ला पोलिंग स्टेशनवर पिकेटिंग करण्यांत आलें. १५० स्वयंसेवक पिकेटिंग करण्याकरितां रुजू होते. नागपुराहून ॲंबुलन्स गाडी

गेल्या होत्या. सुमारें ४० लोकांस अटक करण्यांत आली. त्यापैकीं १० जणांस नागपुरास सेंट्रल जेलमध्यें पाठविण्यांत येऊन बाकीच्यांस सोडून देण्यांत आलें. ह्यापैकीं प्रत्येकास ६ म. स. म. ची शिक्षा झाली.

ह्यानंतर निरनिराळे दिन पाळण्यांत आले. त्यांत जवाहरलाल व वल्लभभाई पटेल यांच्या अटकेनिमित्त सभा, मोतीलाल यांचें आयुरारोग्यचिंतन दिन, बारडोली दिन व राष्ट्रीय सप्ताह हे विशेष महत्त्वाचे होत. ह्या प्रत्येक वेळीं मिरवणूक, सभा, झेंडावंदन वगैरे कार्यक्रम होत असत.

राष्ट्रीय सप्ताह संपल्यानंतर करबंदीच्या चळवळीकरितां श्री. वैद्य –तालुका युद्धमंडळाचे अध्यक्ष–यांनीं दौरा काढला असतांना ते पकडले गेले. तेव्हां श्री. कोटपल्लीवार हे दुसरे अध्यक्ष झाले. यांनीं आपल्या हातीं दारू पिकेटिंगचें काम घेतल्यामुळें त्यांनाही लौकरच पकडण्यांत आलें.

तारीख ३०।१।३१ लाच युद्धमंडळाचे सेक्रेटरी श्री. राधाकृष्ण पाटील यांच्या तुकडीस दारूगुत्त्यावर पिकेटिंग करीत असतांना पकडण्यांत आलें. यानंतर दुसरी तुकडी श्री. फजीतराव पैहेलवान यांच्या नेतृत्वाखालीं गेली. तिला तारीख ६।२।३१ ला पकडण्यात आलें. ह्यानंतर तिसरी तुकडी सपतराव यांच्या नेतृत्वाखालीं तारीख २१।२।३१ ला पकडली गेली.

गोंदणी–टाकळी येथें ५।६ रों घोडेस्वारांनीं शेताची नासधूस केली. पोलीसांनीं प्युनिटिव्ह टॅक्स मागितला असतांना शेतकऱ्यांनीं देण्याचें नाकारलें म्हणून ही नासधूस करण्यांत आली.

अशा प्रकारें चळवळ चालू असतानाच गांधी-इर्विन करार झाला. त्याप्रमाणें युद्ध तहकूब करण्यात आलें व युद्धमंडळ रद्द होऊन जुनी का. क. पुनः अधिकारारूढ झाली. ता. १८।९।३० पासून ता. ११।२।३१ पर्यंत एकंदर ६४ मोठ्या सभा झाल्या. ४१ लोक पकडले गेले. ७ कच्ची कैद व बाकीचे शिक्षा भोगून आले. ४२९ रु. दंड वसूल करण्यांत आला.

युद्ध थांबल्यापासून ४।१।३२ पर्यंत विशेष महत्त्वाचें कार्य झालें नाहीं. ४।१।३२ ला श्री. वैद्य यांचे अध्यक्षतेखालीं सभा होऊन लोकांना पुन्हा युद्धाला तयार होण्याचा इशारा दिला गेला. ह्या सभेंत झालेल्या भाषणाबद्दल श्री. वैद्य आणि सेनानायक कामथ यांना अटक करण्यांत येऊन नागपुरास पाठविण्यात आलें. ता. १०।१।३२ ला दुसरे अध्यक्ष कोटपल्लीवार व सुगनचंद लोढा यास अटक झाली. लागोपाठ ३ रे अध्यक्ष नंदलाल शर्मा व ४ थे अध्यक्ष व्यंकटलाल जोशी यांस अटक झाली. ह्या सर्वांस उमरावतीस ठेवण्यात आलें होतें.

त्याचप्रमाणें दारू पिकेटिंगकरितां ४ जणांना अटक झाली. त्यास नागपुरास ठेवण्यांत आलें होतें.

नागपुरास २९ मे १९३२ ला राजकीय परिषद झाली असतांना कामठीहून दोन स्त्रिया आणि १३ पुरुष गेले होते. पैकीं स्त्रियाना सोडून देण्यांत आलें व पुरुषास २० दिवस कच्च्या कैदेंत ठेवून सोडून दिलें.

कामठीचे रफीक मिया ह्यांस ४८ वे डिक्टेटर म्हणून मुंबईस पकडण्यात आलें होतें व श्री. उद्धव पुरड मुंबई सत्याग्रहात पकडले जाऊन येरवड्यात होते.

अशा प्रकारें १९३२ च्या युद्धांत ३५ लोक पकडले गेले, १९ शिक्षा भोगून आले, २० कच्ची कैद सोसून आले, २५ रु. दंडादाखल भरण्यांत आले.

महात्माजींच्या प्राणांतिक प्रायोपवेशनानिमित्त कमिटी स्थापन होऊन ठिकठिकाणीं प्रचार करण्यात आला. कामठीचे श्री. के. रामचद्रराव मोदी यांनीं विडीकारखान्यात असलेलें आपले देवालय अस्पृश्याकरितां मोकळें करून दिलें. त्याचप्रमाणें महात्मा गांधी हरिजन दौऱ्यावर असतांना त्याचें स्वागत करण्यात येऊन त्याना एक थैली अर्पण करण्यात आली.

पुढें असेंब्ली निवडणुकींतही ह्या तहसिलीनें पुष्कळ काम करून दाखविलें. त्याची कल्पना बॅ. अभ्यंकर व डॉ. मुंजे याना मिळालेल्या मतसंख्येवरून सहज करतां येईल.

---

# प्रकरण दुसरें

## काटोल तहसील

या तहसिलींत मुख्य गांवें काटोल, मोवाड, नरखेड, जलाल-खेडा, कोंढाळी, बेलोना, सावरगांव, पारडसिंगा, कचारीसांवगा, देमस इ. आहेत.

१९०० सालापासून काटोलमध्यें सार्वजनिक कार्याची आवड दसून येते. सेठ रामचंद्र, श्री. हरिकृष्णराव, श्री. लक्ष्मणराव सोनक, श्री. रामकृष्णराव जोग, श्री. कृष्णाजी पिलाजी घरत, श्री. सकरू पाटील, गोविंदराव देशमुख व श्री. लक्ष्मणराव पांचखेडे हे त्या काळचे मुख कार्यकर्ते होत.

१९०६ पासून काटोल ता. का. क. कार्य करीत आहे. श्री. भाऊसाहेब घाटे हे पहिले अध्यक्ष होते. १९२९ पर्यंत श्री. भाऊसाहेब अध्यक्ष राहिले. १९०८ सालीं जी चळवळ झाली तिच्यांत याही तालुक्यानें आपल्या परीनें भाग घेतला. व त्या वेळीं श्री. मारुति चालरे, त्रिंबकराव गुर्जर, बाळाभाऊ पांचखेडे व कै. माधोराव पाडे यांना शिक्षा भोगाव्या लागल्या. यानंतर १९११-१२ मध्येंही कै. डॉ. भीमनराव पांचखेडे आणि डॉ. देशमुख यांना शिक्षा भोगाव्या लागल्या. १९१८ सालीं लोकमान्यांनीं या तालुक्यात दौरा काढला होता. त्या वेळीं . घाटे यांनीं या तालुक्यातून सरासरी दहा हजार रुपये जमवून दिले. १९२० सालीं श्री. घाटे यांनीं एक वर्षभर वकिली सोडली. याच सुमारास काटोलास राष्ट्रीय शाळा स्थापना झाली. तिच्यात ३-४ वर्षेंत ६०-७० विद्यार्थी शिकत असत.

लाचे निवडणुकींत या ठिकाणाहून काँग्रेसचे उमेदवारांस बरीच मदत झाली. १९१७ सालीं आर्यहितवर्धक वाचनालय व खादीभांडार सुरु करण्यांत आले. १९२७ पासूनच्या लोकजागृति व राजकीय चळवळीचे बहुतेक श्रेय भीकूलालजी यांनाच आहे. १९३०-३२ च्या कायदेभंगांत ह्या गांवानें बराच उत्साह दाखविला. प्रभातफेऱ्या, व्याख्याने, मिरवणुकी, हरताळ, गढवालदिन वगैरे कांग्रेसचे कार्यक्रम उत्तम रीतीनें करण्यात आले. कर्मवीर पाठक याचे हस्तें सॅनिटेशन कमिटीवर राष्ट्रीय झेंडा लावण्यात आला. परदेशी कापडाचे गठ्ठे बांधून १९३३ फेब्रुआरी पर्यंत येथे परदेशी कापडाची विक्री बंद होती. दारू पीकेटिंग बंद करण्यांत आले. परिणामतः दारूचें दुकान १९३० ते ३३ पर्यंत बंद होतें. जटामखोरा जंगल सत्याग्रह ता. ८ आगस्ट व २० सतेंबर १९३० ला करण्यात आला. या वेळीं पुढें ८ जणांना पकडून शिक्षा देण्यांत आली. दुसऱ्या सत्याग्रहांत तिघासच पकडण्यात आलें.

१९३१ मध्यें सेठ पूनमचंद यांना मानपत्र देण्यात येऊन ना. बॅ. अभ्यंकराना ५०१ रुपयांची थैली अर्पण करण्यांत आली. बिहार भूकम्पपीडित सहायक फंडाकरिता येथून २००रु. बगैरी राजेन्द्रफंडास पाठविण्यात आली. रा. राजेन्द्रप्रसाद व म. गांधी यानांही देण्यांत आलेल्या थैल्यांत या गांवानें बरीच मदत केली. येथे एक हरिजन शाळा व एक व्यायामशाळा चालू आहे. अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळींत या गांवानें फार कामगिरी केली.

**मोहपा**—टिळकस्वराज्यफंड व होमरूललीगचे चळवळीपासून हें गांव फार जोमानें व उत्साहानें भाग घेत आहे. १९२० नंतरही या गांवानें प्रत्येक चळवळींत उत्सहानें कार्य केलें. प्रभातफेऱ्या, व्याख्यानें वगैरे द्वारें लोकजागृति करण्याचें कार्य करण्यांत आलें. तालुक्यातील कार्यक्रमाकरिता स्वयंसेवक व पैसा हिस्साप्रमाणें देण्यांत हें गांव प्रमुख आहे. १९३० सालीं तालुक्यांतील अनेक ठिकाणच्या सत्याग्रहं

दा दन्द पडल्या. शेवाची परिषद- १९३१ डिसेंबरमध्यें सावनेर येथें दे. निळकंटराव (बाबासाहेब) देशमुख याचे अध्यक्षतेखालीं भरली.

१९३३ मध्यें महात्माजींनीं सर्व देशभर हरिजन दौरा काढला. आतां त्या दौऱ्यांत या तहसिली तर्फे म. गांधीजींचें ९ नवंबर ३३ ला सावनेर येथें जंगी स्वागत करण्यांत आलें होतें. माहत्माजींना जनतेतर्फे व हरिजनातर्फे दोन मानपत्रें देण्यांत आलीं व तहसिली तर्फे १ हजार रुपयांची थैली अर्पण करण्यांत आली.

१९३५ च्या जूनमध्यें राष्ट्रपति राजेंद्रप्रसाद याचें सावनेर तालुक्यातर्फे खापा येथें जंगी स्वागत करण्यात आलें व त्याना १०१ रु.ची थैली अर्पण करण्यात आली. १९३१ ते ३४ पर्यंत सावनेर तालुक्यांत केळोद, मोहपा, खुमारी, सावनेर येथें गांवकाँग्रेस कमिट्या काम करीत होत्या. सेठ मिकुलालजी १९२८ ते १९३५ पर्यंत तालुका काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष असून ३२ च्या कायदेभंगाच्या वेळेस तालुका युद्धमंडळाचे पहिले अध्यक्ष होते.

# प्रकरण चवथें

# रामटेक तालुका

नगरधन, रामटेक, पारसिवनी, मनसळ, कोंदामेंढी, मौंदा, व मोहाळी हीं प्रमुख गावें आहेत. पौराणिक काळांत रामटेकचें नाव सिंदुरगिरी होतें, नंतर वनवासी राम येथें एकदा घटकाभर टेंकले म्हणून त्याला पुढें रामटेक हें नाव पडलें. प्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ नागार्जुनाची प्रसिद्ध प्रयोगशाळा येथें होती. हें हिंदूंचें अत्यंत महत्त्वाचें तीर्थक्षेत्र असून रामटेकचीं विड्याचीं पानें फार प्रसिद्ध आहेत. नगरधन हें या तालुक्यांतील अत्यंत प्राचीन व इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे.

१९२० सालापूर्वी लो० टिळकांच्या राजकारणवर्टीत श्री. भय्यासाहेब तोतडे, कल्याणकर, बेंडे, गोविंदराव पाटील वगैरे मंडळी काम करीत. १९२० नंतर कल्याणकर, कै. लिमिये वकील प्रभृति मंडळी उत्साहानें काम करूं लागली. १९२० ते १९३० पावेतों या तालुक्यानें आपल्या शक्तिप्रमाणें कांग्रेसच्या कार्यांत भाग घेतला व त्या काळांतील प्रांतिक राजकारणाचे प्रतिध्वनि येथेंही उमटले. १९२३ सालच्या झेंडा सत्याग्रहांतही या तालुक्यानें भाग घेतला होता त्याचें श्रेय चिंतामणराव निडके यांच्याकडे आहे.

## १९३० चें युद्ध

श्री. भरूका हे नागपुरास डिक्टेटर असतां रामटेकास प्रथम पुढील युद्धमंडळ स्थापण्यांत आलें.

अध्यक्षः—दादाजी संत

कोषाध्यक्षः—नारायणराव कटकमवार

सेक्रेटरी व सेनापती } :–शंकरराव कटकमवार

ह्या शिवाय दामोदरपंत किंमतकार, गोविंदराव संत, पंचमराव कोल्हे, शंकरराव पणके वगैरे मंडळी मदतनीस म्हणून असत.

प्रांतिक कांग्रेस कमेटीकडून २५–८–३० ला सामुदायिक जंगल-सत्याग्रह करण्याचा हुकूम आल्यामुळें ठिकठिकाणीं जंगल सत्याग्रह करण्यांत आला. त्याची माहिती येणेंप्रमाणें:—

**पवनी**–येथें शंकरराव कटमवार यांचे नेतृत्वाखालीं जंगल सत्याग्रह होऊन कटकमवार, केशवराव पाटील, यशवंतराव पाटील व इतर कांहीं सत्याग्रहींस पकडण्यात येऊन प्रत्येकास ८ म. स. म. ची शिक्षा झाली.

**चारगांव**– चिन्तामणराव तिडके यांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह झाला. सुमारें १०००० लोकांनी भाग घेतला होता. चिन्तामणराव माडोकर, पंजाबराव पाटील वगैरेंस अटक करण्यांत आली. तिडके यास २॥ वर्षे सक्त मजूरीची शिक्षा झाली होती. गंगारामजी कटकमवार यानाही पकडण्यांत आलें.

येथील गडंगावर (वेअरहाऊस) पिकेटिंग करण्याचें ठरून कटकमवार यांचे नेतृत्वाखालीं पहिली स्वयंसेवकाची तुकडी रवाना झाली. त्यानंतर एकामागून एक पथकें रवाना होत व पकडलीं जात. तारीख ९–९–३० ला जरा मजेचा प्रकार घडला. ह्या दिवशीं गडंगाच्या अधिकाऱ्यांनी भिन्तीवरून दारूचें पिप उलटवून मागल्याबाजूने बाहेर नेण्याचा प्रयत्न केला. परंतु सत्याग्रहींना वेळेवर बातमी लागल्यामुळे ते आडवे पडले व पिप पुढे ढकलणें दुरापास्त झालें, यामुळे पिप त्यांचे अंगावरून नेण्यांत आलें व मारहाण करण्यात आली.

१९-१०-३० ला पहिलें युद्धमंडळ पकडण्यांत आल्यामुळें

अध्यक्षः—नारायणराव मोकरे.

सेक्रेटरीः—सदाशिवराव टोंगसे.

सेनापतिः—भास्करराव सोनकुसरे

असें दुसरें युद्धमंडळ स्थापन झालें. या मंडळानें कौंसिलबहिष्काराचा कार्यक्रम यशस्वी केला. येथें उमेदवार न मिळाल्यामुळें येथील जागा अखेरपावेतो रिकामी राहिली.

नंतर गांधी-इर्विन करार होऊन नरकेसरी अभ्यंकर यांना सोडण्यांत आलें व चळवळ थांबली.

दुसऱ्या युद्धांत तारीख ५-१-३२ रोजीं नरकेसरी अभ्यंकर, प्रांतीय अध्यक्ष, यांनीं केलेल्या घोषणेप्रमाणें ता. कॉं. क. तर्हे करण्यांत येऊन युद्धमंडळाची स्थापना झाली.

अध्यक्षः—नारायणराव मोकरे

युद्धमंत्रीः—शंकरराव कटकमवार

सेनापतिः—भास्करराव सोनकुसरे

तारीख १५ पर्यंत सर्व युद्धमंडळास व पारशिवनीचे तिडके आणि इतर कार्यकर्ते ह्यांस अटक होऊन शिक्षा झाली.

ह्यानंतर श्री. गंगारामजी कटकमवार यांचे अध्यक्षतेखालीं नवीन युद्धमंडळ स्थापन होऊन कार्यास पूर्वीप्रमाणें सुरुवात झाली.

तारीख २५।८।३२ जंगलसत्याग्रह-स्मृतिदिन पाळला गेला व अनेक ठिकाणीं सत्याग्रह यशस्वी रीतीनें करण्यांत आला. बऱ्याच सत्याग्रहींस व मुलांस वेतानें बेदम मारण्यांत आलें. श्री. कोल्हे, श्री. अलोणी वगैरे लोकांस अटक करण्यांत आली.

ह्यानंतर गढवाल दिन, पेशावर दिन, लाला लजपतराय दिन वगैरे पाळण्यांत आले. त्या वेळीं पोलिसांनीं घोडे अंगावर आणणें, लाठ्या,

वेत मारणें वगैरे प्रकार केले. लवकरच सौ. गंगाबाई तिडके यांना अटक होऊन ३ म. स. म. ची शिक्षा देण्यांत आली.

दुसरें युद्ध स्थगित झाल्यावर नेहमींप्रमाणें काम सुरू झालें. या तालुक्यानें राष्ट्रीय शिक्षण, अस्पृश्यतानिवारण वगैरे चळवळी जोमानें केल्या असून पथरई व पारसिवनी येथें राष्ट्रीय शाळा आहेत. त्याच-प्रमाणें रामटेक व पारसिवनी येथें हरिजनांकरिताही शाळा चालू आहेत. रामटेकच्या कार्यकर्त्यांपैकीं श्री. गंगारामजी कटकमवार नुकतेच कांहीं महिन्यांपूर्वीं मरण पावले. त्यांचेबद्दल सर्व तालुक्याला हळहळ वाटत आहे. १९३० पासून आजवर झालेल्या या तालुक्यांतील चळवळींचें श्रेय श्री. देवरस वकील व स्वामी सच्चिदानंद महाराज अवधूत, चिंता-मणराव तिडके, पंचम कोल्हे, गंगारामजी व शंकरराव कटकमवार पितापुत्र, नारायणराव भोकरे, कुळकर्णी, दीक्षित इत्यादि मंडळीला आहे.



## प्रकरण पांचवें

# उमरेड तालुका

या तहसिलींत उमरेड, भिवापूर, कुही, अंभोरा, मकरधोकडा, मांढळ, वेलपूर, बेला इ० मोठीं गांवें आहेत. उमरेडला गोंड राजांच्या वेळचा एक किल्ला असून अंभोरा हें यात्रेचें ठिकाण आहे. रेशीमकांठी धोतर-उपरण्याकरितां उमरेड फार जुन्या काळापासून प्रसिद्ध आहे. या तालुक्यांत स्वदेशी चळवळीच्या काळांत बरेंच काम झालें व टिळकांच्या दौऱ्याच्या वेळीं त्यांस एक थैली अर्पण करण्यांत आली. १९१८ सालीं श्री. भवानीशंकर यांच्या अध्यक्षतेखालीं एक परिषद भरून तिनें एका विणकर शाळेची मागणी केली होती. त्या जुन्या काळच्या कार्यकर्त्यांत श्री. नाईक, दलाल, देशमुख प्रभृति मालगुजार मंडळी प्रमुख होती.

१९२० च्या नंतरच्या काळांत या तालुक्यांत प्रतिसहकारपक्षाची छाप असल्यामुळें कांग्रेसच्या नव्या कार्यक्रमाला जोर मिळाला नाहीं. तरी १९२३ सालीं नररत्न डेकाटे हे नागपूरच्या झंडा सत्याग्रहांत गेल्यामुळें त्यांस ६ म०ची शिक्षा झाली. त्यामुळें बरीच खळबळ झाली. व हळूहळू कांग्रेसचें नवें वातावरण तेथेंही निर्माण होऊं लागलें.

ता. २६ जानेवारी १९३० हा स्वातंत्र्यदिन पाळण्यांत येऊन मिरवणुकीनंतर सभा करण्यांत आल्या व पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव वाचून दाखविण्यांत आला. हा कार्यक्रम उमरेड येथें डेकाटे यांच्या अध्यक्षतेखालीं, कुही येथें भगवतमास्तर यांच्या अध्यक्षतेखालीं आणि बेला येथें ताबेकर यांचे अध्यक्षतेखालीं झाला. इतरत्रही असेच कार्यक्रम झाले.

यानंतरचा महत्त्वाचा कार्यक्रम **"मिठाचा कायदेभंग व जप्त वाङ्मयवाचन"** हा होय.

उमरेड–तारील १३–४–३० रोजीं नररत्न डेकाटे यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा होऊन मिठाच्या पुड्या विकण्यांत आल्या. खरेदींत १०० लोकांनीं भाग घेतला. दुसऱ्या दिवशीं दे. म. पूनमचंद रांका यांच्या अध्यक्षतेखालीं बॅ. अभ्यंकर, महात्मा भगवानदीनजी वगैरेंचीं मिठाच्या सत्याग्रहासंबंधीं भाषणें झालीं. ता. १–५–३० रोजीं मीठ तयार करण्याचा कार्यक्रम पार पडला.

कुहीं–येथें भगतमास्तर यांनीं व ता. १२–५–३० रोजीं नररत्न डेकाटे यांनीं मिठाच्या पुड्या विकल्या.

जनवाङ्मयवाचनांत विशेषेंकरून 'भारतमें अंग्रेजी राज' आणि सावरकर यांचें 'मॅझिनीचें चरित्र' ह्या दोन पुस्तकांचा उपयोग केला जात असे. हा कार्यक्रम बहुधा रोज करण्यांत येत असे.

दारूबंदी व दारू पिकेटिंग या तहसिलींत फारच जोरांत करण्यांत आलें. ता. १–७–३० पासून दारूच्या गडंगावर पिकेटिंग सुरू झाल्यामुळें सर्व तालुक्यांत दारू मिळणें अशक्य झालें. शिवाय निरनिराळ्या ठिकाणीं पिकेटिंग होत असल्यामुळें सर्व गुत्ते चळवळ चालू असेपर्यंत जवळपास बंदच होते. जातीपंचायतीची स्थापना होऊन सामाजिक बहिष्कार टाकल्यामुळें दारूविक्रीवर फारच परिणाम होऊन सरकारचें फार नुकसान झालें. त्याचा बरोबर अंदाज पुढील कोष्टकावरून येईल.

| गांव | पूर्वीचा मक्ता रु० | १९३१ नंतरचा मक्ता रु० |
|---|---|---|
| उमरेड | ३००० | ७०० |
| कुही | १००० | ३०० |
| बेला | १९०० | ८०० |

ह्या दारूबंदीच्या चळवळींत गडंगावरचें पिकेटिंग फार त्रासदायक झालें. ह्या पिकेटिंगला सुरुवात १–७–३० पासून नररत्न डेकाटे यांच्या नेतृत्वाखालीं झाली. लोकसमुदाय ५००० असेल. पाऊस पडत

होता तरी स्वयंसेवक शांतपणें पिकेटिंग करीत. पावसामुळें डेकाटे यांस ताप आला व तशांतच ते पकडले गेले. त्यानंतर लोकरे वकील व जालमसिंह यांचे नेतृत्वाखालीं पिकेटिंग चालू राहिलें. अखेरीस कांग्रेसचा विजय होऊन गडंग बंद करण्यांत आलें. त्याशिवाय शिन्दीचीं झाडें तोडण्यांत आलीं.

तारीख ८-८-३० रोजीं चक्रीघाटांत (उमरेड) सेनापति जालमसिंह यांचे नेतृत्वाखालीं सामुदायिक जंगलसत्याग्रह करण्यात आला. सौ. लक्ष्मीबाई लोकरे यांचें ५००० वर जनसमुदायापुढें भाषण झालें. धरपकड झाली नाहीं. बेला येथेंही त्याच तारखेस सत्याग्रह करण्यांत आला. २००० लोक हजर होते.

२५-८-३० रोजीं सर्व तालुकाभर सामुदायिक जंगलसत्याग्रह झाला. त्यांत बेला, शिरशी, पिपरा, महालगाव नांद, वगैरे गांवांनीं भाग घेतला. मकरधोकडा येथें श्री. पोहळे यांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह झाला. २००० ते २५०० लोक हजर होते. तारीख १४-९-३० ला तारणा येथील जंगलांत सत्याग्रह झाला.

परदेशी कापडांचे दुकानावर पिकेटिंग करण्यांत आल्याबरोबर सर्व दुकानदारांनीं आपापल्या दुकानांतील विदेशी कापडाच्या गठ्ठयांवर सीलें करवून घेतलीं. उमरेड येथें २५००रु., कुही येथें ७५ रु. व बेला येथें १००० रु. चा माल होता. त्याशिवाय श्री. डेकाटे यांच्या प्रयत्नामुळें कोष्टी लोकांचें मंडळ स्थापन होऊन त्यानें विदेशी सूत व रेशीम वापरूं नये असें ठरविलें. हा नियम मोडल्यास १०१ रु. दंड ठेवण्यांत आला होता.

त्याशिवाय परदेशी साखर, सिगारेट्स, बांगड्या वगैरेंवर बहिष्कार टाकल्यामुळें त्यांची विक्री पार कमी झाली होती.

कौंसिल निवडणुकीच्या १५ दिवस आधींपासून प्रचारकार्य चालू झालें. त्यानंतर निवडणुकीच्या दिवशीं म्हणजे ७-११-३० ला

उमरेड, बेला, कुही आणि वेलतूर ह्या ठिकाणीं पिकेटिंग करण्यांत आलें. सुमारें १२-१३ शें मतांपैकीं फक्त १३ मतें पडलीं. यानंतर खानेसुमारीवर बहिष्कार टाकण्याची चळवळ झाली. वर दिलेल्या कार्यक्रमाखेरीज इतर महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे नागपूर युद्धमंडळानें नेमलेले दिन होत.

## स्त्रिया व मुलें

पुरुषांबरोबर स्त्रिया व मुलेंही उत्साहानें भाग घेत असत. सौ. लोकरे व सौ. डेकाटे यांच्या प्रयत्नांमुळें स्त्रियांमध्यें जागृति करण्यात आली. प्रभातफेऱ्या, पिकेटिंग, सूत कातणें, जंगल सत्याग्रह वगैरे कार्यक्रमांत त्या हौसेनें भाग घेत असत. मुलांची वानरसेना तयार झाली होती. ती फटाक्यांचा बहिष्कार, कापडपिकेटिंग वगैरेंच्या फार उपयोगी पडली.

स्वयंसेवकांना मारहाण, अन्नपाणी न देणें, शिवीगाळी, जबरदस्तीनें दंडवसुली, विनावारंट पकडून नेणें, राष्ट्रीय निशाणाचा अपमान करणें वगैरे नेहमीचे प्रकार येथेंही करण्यांत आले व लोकांकडूनही योग्य तो प्रतिकार करण्यांत आला.

१९३० साली उमरेडला पांच, कुहीला दोन व वेल्यास तीन युद्धमंडळें स्थापन झालीं. याशिवाय पिपरा, शिरसी, मकरधोकडा, नांद व महालगांव येथेंही युद्धमंडळें स्थापन झालीं होतीं. या युद्धमंडळांच्या अध्यक्षांचीं नांवें येणेंप्रमाणें:--डेकाटे, लोकरे, कुहीकर, चैनी, पांडुरंग वादई (उमरेड), भगत, गुलाबपुरी रतनपुरी गोस्वामी (कुही), तावेकर, धीमे, अंकुरवार, (वेला); जुमडे, पोतदार, महादेव बनू, नारायण पंचाळे व राउत. वरील चळवळींत एकंदर ९६९ स्वयंसेवक नोंदले गेले; पैकीं७९ लोकांस अटक झाली.

जनतेकडून पैसा, धान्य वगैरेंच्या रूपानें सुमारें १५०० रु. ची मदत झाली.

१९३२ साली युद्धाला पुन्हा सुरुवात झाली. परंतु एकदम धर-पकड सुरू झाल्यामुळें कायदेभंग करून जेलमध्यें जाण्यापलीकडे विशेष कार्य झालें नाहीं.

महात्माजींच्या उपवासानंतर येथेंही अस्पृश्यतानिवारणाची चळ-वळ करण्यांत येऊन बरेंच काम झालें. असेंब्ली निवडणुकींतही शक्य तो प्रयत्न करून कांग्रेसवरील लोकांचा विश्वास पुन्हा एकदा लोकांनीं निदर्शनास आणून दिला.

मागील युद्धांत झालेल्या दगदगीमुळें म्हणा अगर ईश्वरेच्छेमुळें म्हणा येथील प्रसिद्ध कार्यकर्ते नररत्न डेकाटे हे स्वर्गवासी झाले व त्यामुळें ह्या तालुक्याचा फार तोटा झाला. श्री. डेकाटे हे स्वतः कोष्टी असून त्यांनीं उमरेड व नागपूर येथील कोष्टीसमाजाच्या संघटनेचा व त्याच्या सुधारणेचा फार प्रयत्न केला. हे उत्कृष्ट वक्ते व चिकाटीचे कार्यकर्ते होते.

# प्रकरण सहावें

## वर्धा तालुका

१८८६ मध्यें जिल्ह्याचें ठिकाण कवठाहून पालकवाडीस (वर्ध्याचें प्राचीन नांव) परिवर्तित करण्यात आलें. देवळीच्या ताम्रपत्रावरून हें सिद्ध होतें कीं हा भाग प्राचीन काळीं राष्ट्रकूट वंशाच्या राजसत्तेखालीं होता. सार्वजनिक आणि व्यापारी दृष्टीनें या जिल्ह्याचें महत्त्व नागपूरच्या खालोखाल आहे. येथील केशवराव कावळे वकील आरंभापासून राजकीय चळवळींत भाग घेत असत. येथें "वर्धालहरी" नांवाचें एक शिलामुद्रित वर्तमानपत्र निघत असे. "न्यायदर्पण" नावाचें कायद्यासंबंधीं मासिकही येथें निघत असे.

राष्ट्रीय महासभेची स्थापना झाल्यापासून तिला वर्धा जिल्ह्यांतून प्रतिनिधी गेलेले आढळतात. नागपूरच्या लोकसभेची एक शाखा येथें होती. नागपूर गोरक्षणसभेची एक वर्षेस शाखा होती. टिळकांचें तेजस्वी राजकारण राष्ट्रीय सभेंत उदय पावेपर्यंत येथें नेमस्तपक्षाचें प्राबल्य असे. हरिभाऊ केळकर, रा. ब. दामोदरपंत खरे, पुरुषोत्तमराव परांजपे हे त्या वेळीं राष्ट्रीय सभेचे स्थानिक कार्यकर्ते समजले जात. लक्ष्मणराव अत्रे टिळकांच्या अनुयायांत मोडत. १९०४ च्या बंगालच्या फाळणीच्या वेळीं या तहसिलींत जोराची चळवळ झाली. स्वदेशी व बहिष्काराचा ध्वनि तालुकाभर पसरला व अनेकांनीं स्वदेशी शपथा घेतल्या. हल्लीं अमेरिकेंत असलेले निर्वासित पांडुरंगराव खानखोजे वगैरे तरुणांनीं देशसेवेंत वाहून घेण्याचें व्रत पतकरलें. नीळकंठराव देशमुखांच्या अध्यक्षतेखालीं तरुणांचें "कृषिक-मण्डल" स्थापन झालें. त्यांपैकीं दामोदरराव देशपांडे, हिंगणीचे दादासाहेब सुभेदार, त्र्यंबकराव

देशपांडे, शंकरराव दद्, गणपतराव जोशी, शंकरराव उपदेव, तुकाराम-पंत वसु, चंपतराव देंडे, नामदेवराव घोपटे वगैरे मंडळीवर सरकारचा फार डोळा होता. ह्याच सुमारास वर्धा जिल्ह्यांत "मालगुजारी सभा" स्थापन झाली होती.

पुढें तुकारामपंत केदार, मनोहरपंत देशपांडे, डॉ. गंगाधरराव देशमुख, गोविंदराव पांडे इ० नवश दमाची वकील मंडळी राजकारणांत आस्थापूर्वक मन घालूं लागली. लोकमान्यांच्या होमरूलच्या चळवळींत हा तालुका अग्रेसर होता. प्रचारकार्यासाठीं "सुमति" पत्र काढण्यांत आलें. एकट्या तुकाराम वसूंनीं ६०० सभासद नोंदले. रसद व बिगार याविरुद्ध चळवळ सुरू झाली. डिस्ट्रिक्ट कौन्सिल आणि म्युनिसि-पालिट्या लोकपक्षीयांच्या हातीं असत.

१९२० साली येथील अनेक वकिलांनीं वकीली सोडली. आचार्य विनोबा भावे ह्यांच्या प्रमुखत्वाखालीं वर्धा येथें सत्याग्रहाश्रम स्थपना झाला. सरकारी आणि निमसरकारी शाळांतून १२०० विद्यार्थ्यांनीं असहयोगाच्या कार्यक्रमाला अनुसरून शाळा सोडल्या. तालुक्यांत एकंदर २२ राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या. मारवाडी हायस्कूलनें सर्वस्वीं राष्ट्रीय शिक्षणाचा अभ्यासक्रम सुरू केला. तालुक्यांत १६ ठिकाणीं लवादकोर्टें स्थापन झालीं. ह्यात २१ स्वयंसेवकमंडळें स्थापन झालीं होतीं. १९२१ साली तालुक्यांत ७९४६ काँग्रेस सभासद नोंदले गेले होते. जमनालालजींची १ लाखाची देणगी सोडून १७८१०।=।।। टिळक स्वराज्य फंड जमा झाला होता. तालुक्यांत १३८१ चरखे चालू झाले. ह्याशिवाय हिंगणी व आंजी ह्या दोन गांवांत ६५५ शेर सूत काढलें गेलें. ११०५ वार खादी तयार झाली. परदेशी कापड बोलावणार नाहीं अशा १०३ कापड दुकानदा-रांनीं प्रतिज्ञा केल्या. निव्वळ खादीच विकणारें एक दुकान निघालें. तालुक्यांतील ५ मॅजिस्ट्रेटांनीं मॅजिस्ट्रेट्या सोडल्या. २० गांवांत परदेशी कपड्याच्या होळ्या झाल्या. तालुकाभर जोराचें दारूचें पिकेटिंग आणि

वर्धा येथें प्रत्यक्ष कायदेभंगाच्या लढाईला २७-४-३० रोजीं तोंड लागलें. थत्ते याच्या अध्यक्षतेखालीं दहीहांड्यावरून आणवलेल्या खाऱ्या पाण्याचे कन्हयालाल भैया, अडकोजी पटेल, तेजराम गहलोत, इ. मंडळींनीं कायदा मोडून मीठ तयार करून विकलें. ता. कां. कमेटी-चे अध्यक्ष शिवराज चूडीवाले यांनीं दौरा काढून तालुक्यांत अनेक ठिकाणीं कार्यक्रम केला. परंतु सरकारने कोठेंही धरपकड केली नाहीं. पुढें राजद्रोही वाङ्मय वाचण्याचा कायदेभंगाचा कार्यक्रम हातीं घेण्यांत आला. परदेशी कापडावर, दारूवर व ताडीवर पिकेटिंगची मोहीम करण्यांत आली आणि तालुकाभर तिची विक्री फारच खालावली.

यानंतर असहकारितेचा पुरस्कार करिण्याकरितां राजस्थानकेसरी (सं. सत्यदेव विद्यालंकार) सुबोधमाला (सं. नीळकंठराव देशमुख) व तरुणभारत (सं. धा. ज. घोरपडे) हीं वृत्तपत्रें वर्ध्याहून निघूं लागलीं. आचार्य विनोबांनीं "महाराष्ट्र धर्म" मासिक सुरू केलें. या तालुक्यां-तही नागपूरप्रमाणें टिळक तत्वज्ञान व गांधी तत्वज्ञानाचे अनुयायी असत म्हणून १९२२ सालीं तालुका कांग्रेस कमेटी कोणाच्या ताब्यांत असावी याबद्दल स्पर्धा सुरू झाली. १९२३ सालीं झेंडा सत्याग्रह सुरू झाला. त्यांत या तालुक्यानें पुष्कळच भाग घेतला. (झेंडा सत्याग्रह पहा)

१९२४-२५ साल कांग्रेसच्या परस्पर विरोधी राजकीय पक्षांच्या खेचाखेचींत गेलें, तथापि जमनालाल पक्षाचा विजय होऊन प्रां. कांग्रेस कमिटीची मुख्य कचेरी वर्धेस आणिली गेली व ती कचेरी येथें कांहीं कालपर्यंत होती. राष्ट्रीय महासभेनें कायदेमंडळावरील बहिष्कार काढून घेतल्यामुळें १९२६ सालीं कांग्रेसतर्फे उभे राहिलेल्या स्थानिक कायदे कौंसिलच्या व असेंब्ली उमेदवारांना इतर पंथीय उमेदवारांपेक्षां अधिक मतें मिळालीं. या सुमारास दुर्दैवानें ब्राह्मण व ब्राह्मणेतर भावनेनें जोर धरला व येथें ब्राह्मणेतर परिषद भरून रा. ब. नायडूंच्या नेतृत्वाखालीं तो पक्ष स्थापन करण्यांत आला.

गांधी युगाच्या आरंभापासून या तालुक्यांत हिंदु मुसलमानांचे संबंध सलोख्याचे होते. एकहि झगडा झाला नाहीं असें म्हणतां येईल. राष्ट्रीय सप्ताह, लोकमान्यांची पुण्यतिथि, म. गांधींचा जन्मदिन, इ. सर्व कार्यक्रम स्वयंस्फूर्तीनें पाळण्यांत आले. सायमन कमिशनचा ह्या प्रांतांत दौरा आला त्या दिवशीं तालुकाभर हरताळ पाळण्यांत आला व जंगी मिरवणूक निघाली. अ. इं. कां. क. च्या आज्ञेनुसार या तालुक्यांत पुष्कळ ठिकाणीं स्वातंत्र्यदिन मोठ्या उत्साहानें पाळण्यांत आला. नंतर लवकरच विदेशी वस्त्र बहिष्काराच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली. विदेशी कपडे गोळा करून गांवोगांव त्यांच्या होळ्या केल्या.

रामनाथ हरिवक्षानीं आपल्या दुकानांतील विदेशी कापडाचे गठ्ठे बांधलेले पाहून इतर दुकानदारांनीं त्याचा कित्ता गिरविला. ८० हजार किंमतीच्या कापडाचे गठ्ठे तीन महिन्यांकरिता बांधून ठेवण्यांत आले. ताडीच्या व दारूच्या दुकानाची विक्री १००-१२५ वरून १८ = पावेतों खालीं आली. सर्वांत उत्साही पठाण स्वयंसेवक लालखानखां ह्याला त्या संबंधानें ३५० कलमाखालीं पकडण्यांत येऊन १॥ वर्षाची शिक्षा झाली.

धारसनाच्या मीठ सत्याग्रहांत केशवराव जंगमवार, किटकुले, घासीरामजी, गणपतराव उपदेव व रामचंद्रराव परशराम रवाना झाले. देशांतील लष्करी शिपायांना आणि पोलिस नोकरांना उद्देशून काँग्रेसनें काढलेलीं पत्रकें वर्धेंत वाटण्यांत आलीं. त्याबद्दल तालुक्याचे सेक्रेटरी तेजराम गहलोत यांना ४ महिने स. म. ची शिक्षा देण्यांत आली. त्यामुळें जिकडे तिकडे प्रभातफेऱ्या निघूं लागल्या, स्त्रियासुद्धा प्रभात-फेऱ्या वगैरेंत अहमहमिकेनें भाग घेऊं लागल्या.

तळेगांवच्या जंगलसत्याग्रहासाठीं ८ जुलै रोजीं श्रीधरराव दाते यांच्या अधिपत्याखालीं एक तुकडी पाठविण्यांत आली. त्यांना ३-४ महिन्यांच्या शिक्षा झाल्या. २-८-३० रोजी वर्धेंत युद्धमंडळ स्थापन झालें, शिवराजजी अध्यक्ष होते. तालुक्यांत चुडीवाले पिंजरकर,

कन्हैयालाल भैया, यांनीं व्याख्यानांचा दौरा काढला. त्यांना दंड व शिक्षा झाली. ८–८–३०रोजीं काशीनाथराव दलालांनीं केळझरला जंगल सत्याग्रह केला. त्यांत देवळीचे अमृतराव देशमुख, नागोराव पोटदुखे, नरके, घोंगडी, तात्याजी उपदेव इ० मंडळी होती. २५ आगस्ट रोजीं ३ ठिकाणीं सामुदायिक जंगलसत्याग्रह करण्यात आला. हिंगणी येथें नागोरावांनीं सत्याग्रह केला. त्यांना ४०० रु. दंड व ४ महिने शिक्षा झाली.

ता. २-९-३० रोजीं साळवे वकिलांच्या अध्यक्षतेखालीं स्वयंसेवक परिषद भरली. पांचशें स्वयंसेवक हजर होते. दुसऱ्या दिवशीं बॅ. गोविंदराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं मालगुजार व मुकदमांची परिषद झाली. तींत मालगुजारांनीं ताडीचे ठेके न घेण्याबद्दल ठेकेदारांची समजूत घालावी व त्यांनीं न ऐकल्यास त्यांना गांवांत दुकानाकरितां जागा देऊं नये व त्यांना सामाजिक बहिष्कार घालावा असें ठराव झाले. ७–९–३० रोजीं केळझरच्या जंगलांत ५०० लोकांसह युद्धमंडळाचे अध्यक्ष चिरंजीलाल यांनीं सत्याग्रह केला. २० हजार लोक जमले होते. तेव्हां ९६ जणांस पकडण्यात आलें व त्यापैकीं फक्त ४६ जणांवर खटले करण्यांत आले. शिक्षा झालेल्यांत वडजाते, भुसारी, मोघे, वालुंजकर, काळे, रामदास, छोटेलाल, धारपुरे, काशीकर, सोनटक्के, मिश्रा, कावळे आदिकरून मंडळी होती. पुढें स्वयंसेवकाचे सेनापति मोतीलाल बाबू यांना पकडण्यांत आलें. सालईचा पहिला जंगलसत्याग्रह २५।८।३० रोजीं झाला. त्यांत मंडीलाल, आडकोवा पटेल वगैरे पकडले जाऊन त्यांना ६ महिने ते १ वर्षाची सजा झाली. ता. ८ सप्टेंबर रोजीं गढवाल दिन पाळण्यात आला. मिरवणुकींत तालुक्यांतील २० हजार लोकांनीं भाग घेतला होता. सालईचा दुसरा सत्याग्रह १५।९।३०ला भर पावसांत झाला. त्यात सिद्धकरण सुराणा, किसन मणीराम, धायवट वगैरे मंडळी होती. पोलीसांनीं लाठीमार केला. धायवट, किसन मणीराम, जामनीचे २ स्वयं.

सेवक, वडगांवचे दोन इसम व शामराव मराठा घायाळ झाले. ह्या सत्या-ग्रहाला उत्तेजन देण्याबद्दल पुनमचंद बांठिया व नानाजी देशपांडे यांना शिक्षा व दंड ठोठावण्यांत आले.

याच सुमारास कायदे कौंसिलच्या निवडणुकी झाल्या. नानाजी लोटलीकर यांच्या नेतृत्वाखाली जोराचें पिकेटिंग झालें. त्यांत स्त्रियांनीं-ही भाग घेतला होता. फक्त शेंकडा १२ मतदारांनीं मतें दिलीं, लोट-लीकर, जगन, गोपाळ गजानन यांना या बाबतींत शिक्षा झाली. 'निवड-णुकीच्या पर्वानंतर लागलीच २७ ला आबकारी लिलावांचा प्रसंग उद्भ-वला. त्या दिवशीं त्यावर मोठें जोराचें पिकेटिंग झालें. त्यांत गुलाबबाई, केशरबाई, लक्ष्मीबाई, चंद्राबाई, गंगाबाई मुधारी ह्या महिलानीं भाग घेतला होता. लिलांवात सरकारला शेंकडा ४० तूट आली. डिसेंबरात निरनिराळया जातींच्या अंदाजें १००० स्त्री–पुरुष स्वयंसेवकानीं सहभो-जनाचा समारंभ केला. सेट जमनालालजी, दे. भ. अभ्यंकर, नीळकंठराव देशमुख सुटून आल्यावर वर्धेनें त्यांचें प्रचंड स्वागत केलें. पुलगांव म्युनि-सिपालिटी आणि देवळी म्युनिसिपालिटयानीं कचेऱ्यांवर राष्ट्रीय निशाणें चढविलीं. देवळी येथें दारूवर व ताडीवर पिकेटिंग झालें; त्यामुळें ताडीचें दुकान दोन महिने बंद पडलें. कांग्रेस कमिटीचे अध्यक्ष यशेश्वर-राव भागवत, मल्हारराव देशमुख, घाडगे आदिकरून मंडळींनीं मोठ्या आस्थेनें काम केलें. वर्ध्यांत व तालुक्यात "सर्व दिन" व्यवस्थित पाळले गेले. वानरसेना व मांजरसेना निर्माण झाली. त्यांनीं पत्र्यावाक्यांवर बहि-ष्कार घालण्याचें काम मोठ्या तडफीनें केलें. अॅम्बुलंसचें काम डॉ. धिसाड, पिंगळे व डॉ. वऱ्हाडपांडे यांजकडे होतें. बुलेटिनचें काम व्यं. शं. वकील यांनी फार चांगलें केलें. श्रीकृष्णदासजी जाजूंनीं खादीप्रचाराचें काम संघटित रूपानें केले. मुसलमान कार्यकर्ते हसनअली, शेरमुहंमद वगैरे बंधूंनीं पिकेटिंगच्या कामांत पुढाकार घेतला होता.

वानरसेनेची महत्वाची कामगिरी शिरगणतीच्या बाबतींतील काय-देभंग होय. त्यांचे तीन कप्तान पकडण्यात आले. कमलनयन बजाज व

१४ मुलांना पकडून सोडून देण्यांत आलें. प्रल्हाद पोद्दार (१६ वर्षे) व बुद्धसेन (वय १२) या दोघांना ट्रेसपास खालीं जेलमध्यें रवाना करण्यांत आलें. तालुका युद्धमंडळातर्फे शिरगणतीचा बहिष्कारदिन पाळण्यांत आला. जंगी मिरवणूक काढण्यांत आली. तींत सौ. जानकीबाई बजाज आपल्या मुलीसह सामील झाल्या होत्या.

१९३२ सालची या तालुक्यांतील युद्धाची मोहीम तालुक्यांत शिबिरें स्थापन करण्यापासून झाली. त्याचा उपक्रम सत्याग्रहाश्रमाच्या मंडळीकडून झाला. ७ जानेवारीपासून तेजरामजी यांच्या नेतृत्वाखालीं दारूच्या गुत्त्यांवरील पिकेटिंग सुरू झालें. त्याबरोबर विदेशी कापडावरील पिकेटिंगचें काम गणपतराव उमरे यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झालें. त्यानिमित्त बरेचसे स्त्रीपुरुष स्वयंसेवक पकडण्यांत आले. ता. १७–२–३२ ला काशिनाथराव महाकाळकरांच्या नेतृत्वखालीं ५ हजार लोकाची प्रचंड मिरवणूक निघाली. दारूदुकानासमोरील चौरस्त्यावर राष्ट्राधिकारी सरदार शार्दूलसिंगांचा संदेश वाचून दाखविण्यांत आला. त्या वेळीं लाठीबाज पोलिसासह सब'डि० मॅजिस्ट्रेट डोंगरे हजर होते. त्यांनीं जनतेला पांगापांग (Disperse) करण्याबद्दल हुकूम दिला. लोक पूर्णपणें शांतीनें वागत होते. तो हुकूम-न ऐकल्यामुळें लोकांवर लाठीमार करण्यांत आला. १७ स्त्रिया, २२ मुलेंमुली आणि ५५ पुरुष घायाळ झाले! १८ जणाना जागच्या जागीं गिरफदार करण्यांत आलें. तेजरामजी आणि डॉ. वऱ्हाडपांडे यांनाही पकडण्यांत आलें. तेथून कांहीं दिवसांनीं पुन: एकदां लाठीचार्ज करण्यात येऊन लोकांना बेदम चोपण्यांत आलें. रामाधीन नावाचा स्वयंसेवक फार घायाळ झाला. पण लोक घाबरले नाहीत. लागलीच एक दिवस जिल्हा कचेरीवर, सर्व कचेऱ्या चालू असतां जिल्हा कोर्टाच्या इमारतीवर एकाएकीं कॉंग्रेसचा 'तिरंगी ऊंचा झेंडा' फडकूं लागला. कचेरींतील लोक आणि सरकारी अधिकारी आश्चर्यमूढ होऊन पाहूं लागले. इमा[illegible] [illegible] पहेलवान होता. त्याला त्यानीं गिरफदार केलें

ह्यानंतर आर्डिनन्स चालू असतांना वर्धा येथें वर्धा जिल्हा परिषद भरविण्यांत आली. जारी असलेल्या आर्डिनन्सच्या कारवाई-विरुद्ध ही बाब असल्यामुळें पोलीसनें परिषदेचें काम चाललें असतांना तिच्यावर आक्रमण केलें. आणि नारायणराव बाप व चंपतराव पानबुडे यांना गिरफदार केलें.

त्यानंतर आर्डिनन्स चालू असतांना वर्धा येथें वर्धा जिल्हा परिषद भरविण्यांत आली. जारी असलेल्या आर्डिनन्सच्या कारवाई-विरुद्ध ही बाब असल्यामुळें पोलीसनें परिषदेचें काम चाललें असतांना तिच्यावर आक्रमण केलें आणि नारायणराव बाप व चंपतराव पानबुडे यांना गिरफदार केलें.

१९३२ सालांत वर्धा तालुक्यांत सेलूवर्धा, पुलगांव व देवळी येथें शिबिरांची स्थापना करण्यांत आली. वर्धेचा सत्याग्रहाश्रम जप्त करण्यांत आला. जमनालालजींचा सिव्हिल स्टेशनमधील राहता बंगला, बगीचा आणि बगिच्यांतील हजारों रुपयांच्या किंमतीच्या इमारती आर्डिनन्सच्या बरबंट्याखालीं जप्त करण्यांत आल्या. १९३२ सालीं वर्धा तालुक्यांतून सरासरी ५०० पुरुष आणि ७५ स्त्रिया तुरुंगांत गेल्या, ह्यापैकीं चाळीस वर्धा शहरांतल्या असून ३५ तालुक्यांतील होत्या. त्यांतील सगळ्यांत अधिक संख्या नागझरी गावची होती. १९३२मध्यें एकंदर वर्धा तालुक्याचे ३६ सर्वाधिकारी (डिक्टेटर) झाले. त्यांत २७ पुरुष व ९ स्त्रिया होत्या. सामुदायिक कायदेभंग मागें घेण्यात आल्यावर ७ आगस्टपासून १५ सप्टेंबरपर्यंत याच तुकड्यांनीं जंगलसत्याग्रह केला.

सत्याग्रहाश्रमाचे बाबाजी मोघे, सेजरामजी आणि आश्रमाची मंडळी हे या तुकडीचे नेते होते. कलकत्ता येथें आर्डिनन्सच्या काळांत भरणाऱ्या कांग्रेससाठीं वर्धा येथून गणपतराव बोकडे, राधाकृष्ण बजाज, नानाजी वळगे, नामदेवराव मानकर, वामनराव दाणी अशी मंडळी

पायींच नागपुरास जाण्यास निघाली. त्यांना पकडण्यांत येऊन नंतर सोडून देण्यांत आलें.

व्यक्तिगत सत्याग्रह शिथिल झाल्यावर जमनलाल बजाज यांनीं विदेशी वस्त्रबहिष्काराला हात घातला. विदेशी वस्त्रबहिष्कारमंडळ स्थापन करण्यात आलें. या चळवळींत पिकेटिंगचा समावेश नव्हता तरी राधाकृष्ण बजाज यांच्या नेतृत्वाखालीं ९ जणांचें पथक पकडण्यांत आलें. त्यांत हरिभाऊ मोहनी व छोटेलालजी होते. त्यांना मार्चमध्यें शिक्षा झाली. यांनीं कोर्टात बचाव केला व ते अखेरीस रिव्हिजनमध्यें सुटल्याचें मार्गी आले आहेच. त्यानंतर पुन्हा दोन टोळ्या पकडण्यांत आल्या. पुढें हें काम मदन मोहन चतुर्वेदी यांच्या नेतृत्वाखाली एप्रील अखेरपर्यंत चालू होतें. १९३३ सालच्या व्यक्तिग्रह सत्याग्रहांत २८ जणाना शिक्षा झाली.

म. गांधींनीं अखिल भारतीय ग्रामोद्योग संघाची स्थापना केल्या-वर त्याचें मुख्य केंद्र आणि त्यांचें स्वतःचें निवासस्थान त्यांनीं वर्धा हें केल्यापासून वर्धेकडे सगळ्या जगाची दृष्टी लागून राहिली असल्यास नवल काय ! ग्रामोद्योग संघाच्या मध्यवर्ती कमिटीचें अध्यक्षपदही वर्धेचे श्रीकृष्णदासजी जाजू ह्यांना देण्यांत आलें. वर्धा तहसिलीची खेड्यापा-ड्यांची संघटना, वर्ध्यांच्या सत्याग्रहाश्रमाची कार्यकर्ती मंडळी बरेच दिवसांपासून करीत असल्यामुळें ग्रामोद्योगाचें खेरटें ह्या तहशिलींत नीट-पणें वाढीस लागलेलें आहे. १९३४–३५ नापिकीचें वर्ष असल्याहूलें वर्धा तालुक्याच्या मेटाकुटीस आलेल्या शेतकऱ्यांत सहजासहजीं जागृति झाली. निळकंठराव देशमुखाच्या अध्यक्षतेखालीं वर्धा जिल्हा शेतकरी सभा स्थापन झाली. तिच्या विद्यमानें वर्धा येथें आणि तालुक्यांत अनेक शेतकरी परिषदा भरल्या. त्यांमुळें सरकारला आपल्या आणेवारीच्या रिपोर्टांची फेर तपासणी करावी लागली आणि बऱ्याचशा गांवात अंशतः

सारा वसुली तहकूब करण्यांत आली. शेतकऱ्यांच्या कांहीं प्रश्नांसंबंधानें वर्धा जिल्ह्यांतील सर्व-तहशिलींतील शेतकऱ्यांनीं, कौन्सिल हॉल समोर धरणें देण्याकरितां नागपुरास कूच केलें. नागपुरास आल्यानंतर देवाण घेवाण होऊन अधिकाऱ्यांनीं त्यांच्यांशीं तडजोड केली. त्यानंतर कांग्रेसच्या नवीन घटनेप्रमाणें वर्धा तालुक्यांत सभासद करण्याकरितां तालुका कांग्रेस क०चे अध्यक्ष शिवराजजी चुडीवाले, ग्रामसेवा मंडळाचे अध्यक्ष राधाकृष्ण बजाज व तालुका कां० क०चे सेक्रेटरी तेजरामजी गहलोत यांनीं तालुक्यांत दौरा करून कांग्रेसचे १३०० सभासद केले.

---

## प्रकरण सातवें

# आर्वी तालुका

आर्वी तालुका प्राचीन काळीं 'अरम्मी' नांवानें प्रसिद्ध होता. तो एक प्रांत होता. त्यांची मर्यादा चांदूर पावेतों होती. येथें वाकाटकाचें राज्य होतें असें ताम्रपत्रावरून दिसतें. येथें भोसल्याचे वेळेस कमाविसदार असे. इंग्रजी अंमल चालू झाल्यापासून हें तहसिलीचें ठिकाण बनलें. येथील जुनी लायब्ररी लक्ष्मण गोविंद देऊसकर यांनीं स्थापन केली होती. नागपूर गोरक्षण सभेची एक शाला येथेंही होती. १८८९ साली काग्रेसच्या अधिवेशनाला या तालुक्यातून प्रतिनिधी गेले होते. व १८९७ सालीं अमरावती काग्रेसला बरेच प्रतिनिधी गेले होते.

१९०४ च्या बंगालच्या फाळणीनंतर या तालुक्यांतील रामभाऊ अभ्यंकर (धनोडी) विनायकराव देशमुख (वाढोणा) नीळकंठराव देशमुख (विरुळ) ही मंडळी भाग घेत असत. स्वदेशी वस्तूंचा प्रचार आणि विलायती कापडाचा बहिष्कार येथें त्या वेळीं बऱ्याच प्रमाणात पाळला जाई. सेठ सालिग्रामजींच्या प्रोत्साहनानें मोरस साखरेचा बहिष्कार झाला. नंतर सुरत येथें भरलेल्या काग्रेसच्या ऐतिहासिक अधिवेशनाला वासुदेवराव देशमुख, रामभाऊ अभ्यंकर, महादेवराव होनाडे वगैरे मंडळी गेली होती.

होमरूल लीगच्या प्रीत्यर्थ लो० टिळकाच्या दौरा झाला त्या वेळीं येथून २ हजाराची थैली अर्पण करण्यांत आली. ह्यावेळीं पुरुषोत्तमराव चिपळूणकर, परशुरामपंत यत्ते, पंढरीनाथ वर्तक, सेठ खुशालचंद, वसंतराव कदम मंडळींनीं फार परिश्रम केले होते. १९२० मध्यें आर्वी

तालुका काँग्रेस कमिटीची पद्धतशीर स्थापना करण्यांत आली. नागपूर काँग्रेसकरितां फंड जमविण्यासाठीं एक वजनदार कमिटी नेमण्यांत आली. कलकत्ता जादा काँग्रेसच्या ठरावान्वयें आर्वी, हिंगणघाट विभागातर्फे प्रांतिक कायदे कौन्सिलच्या निवणुकीसाठीं उभे असलेले उमेदवार नीळकंठराव देशमूख यांनीं आपली उमेदवारी परत घेतली.

१९२१ च्या मार्च महिन्यांत आर्वी परगणा परिषद भरविण्यात आली. तिचे अध्यक्ष चांदाचे बळवंतराव देशमुख होते. परिषदेंत जागच्या जागीं २ हजार रुपये टिळक स्वराज्यफंडासाठीं जमले. आर्वी येथें सर फ्रँक स्लाय गव्हर्नर आले होते तेव्हां त्याच्या आगमनावरील बहिष्काराची चळवळ करण्यात आली. खरागणा येथें अर्जुनलालजी सेठी यांच्या अध्यक्षतेखालीं परगणा परिषद भरविण्यात आली. अर्जुनलालजी, सुंदरलालजी व डॉ. हेडगेवार यांना परिषदेंतील भाषणाबद्दल शिक्षा देण्यांत आल्या. नागपूर काँग्रेसच्या कार्यक्रमाला अनुसरून कालेज सोडलेल्या कन्हैयालाल भैया, नारायणराव पाटील यांनीं फार मेहनत घेतली. जागोबा मालगुजार यांनी बिगार न दिल्यामुळें त्यांना दंड करण्यांत आला.

तालुकाभर दारू पिकेटिंगची चळवळ जोराने करण्यांत आली. याप्रीत्यर्थ दडपशाही करण्यात आली. आर्वी येथें १९२१ सालीं लवाद कोर्ट आणि सूत काढण्याचा व खादी विणण्याचा कारखाना काढण्यात आला. १२ हजारांवर टिळक फंड जमविण्यांत आला. १९२१ ते १९२३ सालोंसाल या तालुक्यात भिन्न ठिकाणीं परिषदा झाल्या व तालुकाभर सतत चळवळ चालू होती.

१९३२ सालीं भारसवाडा येथें आष्टा परगणा परिषदेचें अधिवेशन निळकंठराव देशमुख यांचें अध्यक्षतेखालीं भरलें. १९२३ सालीं ईस्टरचे सुटींत पं. सुन्दरलालजींचे अध्यक्षतेखालीं जिल्हा परिषद भरली. स्वागत मंडळाचे अध्यक्ष गोपाळदासजी राठी होते. १९२३

साली नागपूर येथील जंगल सत्याग्रहाला या तालुक्यांतून बरीच मंडळी गेली. १९२६ साली स्थानिक कायदेकौन्सिल भरलें. हिंगणघाट आणि आर्वी विभागातर्फे ब्राह्मणेतर पक्षाचे रा. ब. नायडू, मुंजे पक्षाचे नांगडे आणि कांग्रेस पक्षाचे सेठ गोपालदास उमेदवार उभे होते. १९२६ साली हिंदु मुसलमानांचा जो भीषण दंगा झाला त्या संबंधानें तालुका कांग्रेस कमिटीचे उपाध्यक्ष डॉ. मोहरील व सेक्रेटरी जळीत हे पकडण्यांत येऊन डॉ. मोहरीलला जन्मठेपेची आणि जळितांना ४ वर्षांची सजा देण्यांत आली. १९२५ सालीं तेढ निर्माण होईपर्यंत शेखलाल वगैरे स्थानिक मुसलमान गृहस्थ कांग्रेसचे सभासद होते.

१९२७ साली या तालुक्यांत खादीभांडार उघडण्यांत आलें. अस्पृश्य वर्गासंबंधानें २७–२८–२९ सालांत रघुनाथराव मांडे, थत्ते वगैरे मंडळींनी आस्थापूर्वक काम केलें. हरिजनांच्या गणेशोत्सवांमध्यें हरिजन आणि सवर्ण हिंदु खेळीमेळीनें एकत्र होऊन मोठ्या उत्साहानें समारंभ पार पाडीत. गांवांतील म्यु० शाळांत व सार्वजनिक नळांवर सुद्धां अस्पृश्यांना मनाई करण्यांत येत नाहीं.

२६–१–३० रोजीं तालुका कांग्रेस कमिटीनें कांग्रेसच्या आज्ञेप्रमाणें सबंध तहसीलभर स्वातंत्र्यदिन पाळला. नंतर प्रांतिक पुढाऱ्यांनीं या तालुक्यांत दौरा काढला. १३–४–३० रोजीं मिठाचा कायदेभंग करण्यात आला. श्री. वानखेडे व रामभाऊ श्रोत्री यांनीं हा सत्याग्रह केला व नंतर तालुकाभर कार्यक्रमाला सुरवात झाली. मिठाचा सत्याग्रह भिन्न भिन्न गांवीं श्री. जळीत, वल्लभदास जाजु, बाबूराव देशपांडे, तुकाराम चव्हान, चंपतराव पानबुडे, रामभाऊ गायकवाड, नारायणराव वाघ, पं. सोमदत्त, केशवराव भुसारी, जनार्दनपन्त देशमुख या लोकांनीं प्रामुख्यानें केला. परंतु यांत कोणाचीही धरपकड करण्यांत आली नाहीं. ह्या नंतर प्रांतिक युद्धमंडळाकडून जंगल तोडण्याच्या कायदेभंगाचा हुकूम आला. त्यांत श्री. यत्ते वकील, श्रोत्री, डॉ. आपटे, नारायणराव वाघ,

केशवराव भुसारी, कृष्णराव भोसले, मारोतराव जळीत, महादेवराव रानो-ड्कार, शंकरलाल आचार्य यांनी भाग घेतला. तालुकाभर जप्त वाङ्मयाच्या २० हजार प्रती छापून खेडोपाडी वाटण्यांत आल्या. वार्किंग कमिटीचा फौजी आणि पोलीस-शिपायाना उद्देशून, निघालेल्या ठराव नंबर ६ च्या ही हजारों प्रति छापून वाटण्यात आल्या. हें काम चंपतराव पानबुडेकडे सोंपविलें होतें. यानंतर तानाबाई पानबुडे, सौ. ताराबाई लिमये, कु. कमलाताई देशमुख यांच्या प्रयत्नानें प्रभातफेऱ्या आणि कापडाचें पिकेटिंग करण्यांत आलें. १ महिन्यांत १० हजार किंमतीचें परदेशी कापड आर्वी येथें गोळा करण्यांत आलें. ११६।३० ला कु. विमलाताई अभ्यंकर ( नरकेसरी अभ्यंकराची कन्या ) यांचे हस्तें या कापडाची प्रचंड होळी करण्यांत आली.

ता. २६।६।३० रोजी आर्वा तालुक्यांत आर्वा येथें, स्वयंसेवक परिषद भरविण्यांत आली व तळेगांवाला जंगलसत्याग्रहाची मूहूर्तमेढ रोवण्यांत आली.

ह्या वेळीं आर्वा तालुक्याच्या युद्धमंडळाचे अध्यक्ष बळीरामपंत जळीत- व वल्लभदास जाजु सेक्रेटरी होते. खरांगणा केंद्र युद्धमंडळाचे अध्यक्ष नारायणराव वाघ व कारंजा केंद्र युद्धमंडळाचे अध्यक्ष केशवराव भुसारी होते. या शिवाय अनेक उपकेंद्रांत युद्धमंडळें होतीं. सरकारच्या दडपशाहीमुळें युद्धमंडळांत अनेक स्थित्यंतरें होऊन आर्वी युद्धमंडळाचे शेवटले अध्यक्ष नारायणराव विजवे-व सेक्रेटरी रामभाऊ गायकवाड होते. नागपूर येथील प्रांतिक युद्धमंडळानें जंगलसत्याग्रहाकरितां पहिल्या प्रांतीय केन्द्राकरितां तळेगांवची निवड केली.

आर्वा तालुका कांग्रेस क०नें या सत्याग्रहाच्या केंद्रांतील खर्चाची आर्थिक जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. गोपाळदास राठी यांनीं शिबिराकरितां तळेगांव येथें जागा मिळवून दिली. त्या जागेवर १७।७।३० रोजीं लो० टिळकांचे जयंतीचे सुमुहूर्तावर विमूनी ..

यांचे हस्तें ध्वजारोपण करण्यात आलें. आणि त्याच जागेवर बाबासाहेब देशमुख यांचे अध्यक्षतेखालीं प्रचंड सभा होऊन डॉ. खरे, ढवळे वकील, भोंसले, वल्लभदास जाजु, चंपतराव पानबुडे यांचीं स्फूर्तीदायक भाषणें झालीं. लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या मुहूर्तावर १ आगष्ट १९३० रोजीं तळेगाव येथील सरकारी जंगलात कायदेभंग करण्याचें ठरलें. सरकारी अधिकाऱ्यांनीं तळेगावास तळ दिला. परंतु त्यांची खाण्या-पिण्याची फार गैरसोय झाली. पैसे खर्चावयास तयार असूनही त्यांना रसद मिळेना. त्यामुळें चिडून त्यानीं वल्लभदास जाजु, कृष्णराव भोंसले, चंपतराव पानबुडे यांना पूर्वीच पकडलें. श्री. ढवळे यांनाही अटक झाली. तारीख १ पहाटे ४ वाजतां स्नान वगैरे उरकून टेकडीवरील दत्तात्रयाचें दर्शन घेऊन ६ वाजता सेनापती टिकेकरानीं आपल्या सेनेसह झेंडावंदन केलें. सेनानायकाला आणि सैनिकांना सौ. लक्ष्मीबाई देशमुख, विरुळ यांनीं ओवाळलें व सत्याग्रही तुकडीनें कूच केलें. सत्याग्रहाचे वेळीं प्रेक्षकसमुदाय ६०–७० हजार होता. समोरच्या टेकडीवर डेप्युटी कमिश्नर, डी. एस. पी. व जङ्गल खात्याचे अधिकारी आपापल्या लोकां-सह सज्ज होते. ८॥ वाजता मिरवणूक युद्धभूमीवर आली. स्वयंसेव-कांनीं लष्कर पोलिसाला उद्देशून काढलेला वर्किंग कमिटीचा ठराव नं. ६ सर्व अधिकारी व सरकारी नोकर यांच्या हातीं दिला. अधि-काऱ्यांनीं त्यांना जङ्गलाचा पास आहे काय ? असें विचारलें. त्याचें नकारार्थी उत्तर देऊन हें सैन्य पुढें गेलें व गवत कापूं लागलें. त्या वेळीं सर्व टेकड्यावरून जयजयकाराचा तुमुल रणध्वनि उठला. गवत कापून सैनिक परतले असता टिकेकरजी, तुळशीरामजी लोधी, अबदूल रफीज व लक्ष्मण गंभीर (हरिजन) याना पकडून मोटारींतून अधिकाऱ्यांनीं रवाना केलें. सरकारी अधिकाऱ्यांनीं दुसरे दिवशी सत्याग्रह बंद पाडण्या-चा प्रतिज्ञेचा विडा उचलला परंतु ३०–८–३० पावेतों सत्याग्रह चालू राहिला. मधले विश्रांतीचे ७ दिवस वजा जाता २३ तुकड्यांनीं सत्याग्रह

केला व तेव्हांपासून तळेगांवचें नांव तळेगांव शिबिर असें पडलें. ता. २-८-३३ रोजीं तालुका युद्धमंडळाचे अध्यक्ष बळीरामपंत जळीत यांना भूल्यापणानें आर्वीहून तळेगांवला फक्त भेटीला बोलावण्यांत आलें व पोलिस ठाण्यांत पकडून वर्धेला रवाना करण्यांत आलें. श्री. थत्ते व श्रौती यांना शिबिरांतूनच ता. १३-८-३० ला पकडलें.

ता. ३-८-३० ला तळेगावचे प्रमुख नागरीक व देवस्थान कमिटीचे सेक्रेटरी पांडुरंग रंगळे यांना पकडून शिक्षा देण्यांत आली. पुढें सत्याग्रहाचें रणक्षेत्र प्रांतिक युद्धमंडळाचे परवानगीनें बदलण्यांत आलें आणि आर्वी-वर्धा रोडवरील सरकारी जंगलांत ८-८-३० ला सत्याग्रह झाला. त्यांत १८ सैनिक आणि गोपाळराव राठी सेनानायक होते. आर्वी केंद्रांत एकंदर ७ तुकड्या गेल्या परंतु त्यांतून फक्त ९ जणांनाच पकडण्यांत आलें. खरांगणा येथें १६।८ ते २२।८ पावेतो सत्याग्रहसप्ताह करण्यांत आला. त्यांत बापूराव डमकत व महादेव मास्तर हे प्रमुख होते. तेथील विजयाश्रमाच्या मंडळींनीं त्या भागांत विलक्षण जागृती केली.

या मोहिमेंत आर्वी तालुक्यांत कमींत कमी ५०० वर स्वयंसेवकांस अटक करण्यांत आली. त्यापैकीं २२९ जणाना शिक्षा ठोठावण्यांत आली. सर्वांना मिळून १२७६ रुपये दंड झाला. त्यापैकीं ७०००रुपये वसूलहि झाला. या तालुक्यांत बऱ्याच ठिकाणीं जादा पोलिस बसविले गेले व १८०००रुपये जादा कर बसविण्यांत आला. त्यापैकीं ११ हजार वसूल झाले. या करवसुलींत प्रमाणबद्धता नव्हती. सरकारी मर्जींतले कांहीं श्रीमंत लोक सुटले व हलाखीच्या लोकाना भुर्दंड द्यावा लागला. जादा पोलिसांच्या जुलमांची चवकशी करण्यासाठीं ता. कां. कमिटीनें एक कमिटी नेमली तींत वालिंगे व भाडे यांना समाविष्ट करून घेण्यांत आलें. त्या चवकशींत नानाप्रकारचे पोलिसअत्याचाराचे किळसवाणे प्रकार उघडकीस आले.

आर्वी, खरांगणा, कारंजा, आष्टी, जळगांव व भारसवाडा येथील एकूण ९७ कापड दुकानदारांनीं ६९ हजार किमतीच्या विदेशी कापडाच्या गठ्याला मोहरा लावल्या. त्याचें श्रेय प्रभातफेरींतील भगिनींना आहे. बहिष्काराच्या चळवळीसाठीं मांडे वकील, नगरकर वकील व डॉ. आपटे यांची पोटकमिटी नेमण्यांत आली. इतर अनेक परदेशी वस्तूंच्या बहिष्काराचें यशस्वी कार्य झालें.

दारूबंदीसाठीं चंपतराव पानबुडे, बाबूराव देशपांडे आदिकरून मंडळींनीं जातवार पंचायती स्थापन करून प्रयत्न केले. तांडी व दारूच्या दुकानांवर आर्वीच्या अगोदर जळगांव, खरांगणा, विरुळ व कारंजा येथें पिकेटिंग सुरू झालें. दुकानदारानीं कायद्यानें ठरविलेली वेळ सोडून अवेळीं दारू खपविण्यास सुरुवात केली. त्याविरुद्ध म्यु. मेंबर नेमीचंद यांनीं आबकारी अधिकाऱ्याकडे कांगाळी केली होती. आबकारी लिलावासाठीं डॉ. वानखेडे व सीताराम सावजी स्वयंसेवक घेऊन वर्धेस गेले होते. विरुळला स्वतः लक्ष्मीबाई देशमुख पिकेटिंग करीत. त्यामुळे दुकान अजिबात बंद पडलें. सौ. जानकीबाई ह्यांनीं गांवोगांव व्याख्यानें देऊन स्त्रियांत अपूर्व जागृति केली व सर्व कार्यक्रमांत भाग घेतला.

मुसलमान बांधवानीं स्पृहणीय शांतता ठेविली. त्यांपैकी महंमद अमीन ह्यांनीं काहीं सभांत भाषणें केलीं.

१३-४-३० रोजीं जमनालालजी बजाज ह्यांचे हस्तें गांधी चौकांत तिरंगी झेंडा फडकावण्यांत आला. म्युनिसिपालिटीच्या ठरावास अनुसरून बाबासाहेब देशमुख यांच्या हस्तें म्युनिसिपल कचेरींत तिरंगी झेंडा चढविण्यांत आला. लो० ना. अणे याच्या हस्तें लोकलबोर्ड कचेरीवर झेंडा लावण्यांत आला. आष्टी येथील सरकारी मिडलस्कूल सोडून तालुक्यांतील सर्व शाळांवर राष्ट्रीय झेंडे फडकूं लागले होते. खरांगणा, विरुळ, तळेगाव, आष्टी, कारंजा, जळगांव इ० गांवांत

निरनिराळ्या प्रमुख गृहस्थांकडून समारंभपूर्वक राष्ट्रीय ध्वजारोपण करण्यांत आलें होतें.

वल्लभदासजी पकडले गेले तेव्हांपासून आर्वीस "बुलेटिन" सुरू झालें. त्याचे ७२ अंक व कांहीं जादा अंक काढण्यांत आले. तें १३-१२-३० पर्यंत अव्याहत चालू होतें.

१९३२ च्या दुसऱ्या युद्धाच्या सुरुवातीस बाबासाहेब देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं पुनः युद्धमंडळ स्थापन करण्यांत आलें. ते नागपुरास पकडले गेल्यानंतर डॉ. वानखेडे युद्धाध्यक्ष बनले.

ता. ११ जानेवारी रोजीं मध्यप्रांत सरकारनें जादा गॅझेट काढून आर्वी तालुका युद्धमंडळ बेकायदा ठरविलें आणि तुमचें युद्धमंडळ बेकायदा असल्यामुळें फंड आमचे स्वाधीन करा अशी नोटीस बजावली. पण सरकारला अखेरपर्यंत त्याचा पत्ता लागला नाहीं. तळेगांव, खरांगणा, कारंजा, मांडवा, दहेगांव गोंडी येथें नियमितपणें प्रभातफेऱ्या सुरू झाल्या. सर्वाधिकारी वानखेडे यांच्या विनंतीवरून आर्वी येथील कापडाचे व्यापाऱ्यांनीं परदेशी कापड विकण्याचें बंद केलें व त्याचे गठ्ठे बांधून ठेविले. ता. २६ रोजीं स्वातंत्र्य दिनानिमित्त मिरवणूक व झेंडावंदन होऊन शिवदासजी डांगे यांचे अध्यक्षतेखालीं चंपतराव पानबुडे यांनीं स्वातंत्र्याचा जाहिरनामा वाचून दाखविला.

आर्वी शहराच्या आसपासच्या १५ खेड्यांत एका छोटेखानी स्वयंसेवक प्रचारक दलानें ४ दिवसात १२९४ लोकांच्या स्वदेशी मताच्या व दारूबंदीच्या प्रतिज्ञापत्रकांवर सह्या घेतल्या.

पुनः दारूपिकेटिंग, परदेशी कापडपिकेटिंग इत्यादि कार्यक्रम सुरू झाले व तुरुंगाबाहेर असलेली मंडळी नव्या जोमानें कामास लागली आणि सरकारी दडपशाही पूर्वीपेक्षांही जास्त जोरानें सुरू झाली.

१९३२ च्या दुसऱ्या युद्धांत सुरुवातीलाच बाबासाहेब देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं युद्धमंडळ स्थापन करण्यांत आलें. प्रांताधिकारी

न० के० अभ्यंकर ९ जानेवारी रोजीं पकडले गेले. त्यांच्यानंतर प्रांताधिकाराची पाळी बाबासाहेब देशमुख त्यांच्यावर येऊन १० जानेवारी रोजीं तेही नागपूर येथें पकडले गेले. त्यांना ३०० रुपये दंड व एक वर्षाची स. म. ची शिक्षा देण्यांत आली. त्यानंतर आर्वीचे युद्धमंडळाचे अध्यक्ष डॉ. वानखेडे झाले.

ता. १६ फेब्रुवारी १९३२ रोजीं वर्धा येथें जो अमानुष लाठीहल्ला करण्यात आला त्या निमित्तानें १६ मार्च रोजीं आर्वी येथें वर्धादिन पाळण्यांत आला. आर्वी म्यु०नें ता. २३ मार्च रोजीं क्राथमार्केटचें नांव बदलून त्याला नेहरू मार्केट असें नांव दिलें. सर रेजिनाल्ड क्रॅडॉक हे मध्यप्रांताचे चीफकमिशनर होते तेव्हा १९११ सालीं त्यांचे हातून त्याचा उद्घाटन समारंभ झालेला होता. ता. २५ मार्च रोजीं आर्वीचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते वल्लभदास जाजु यांचे घरास १०–१२ पोलिसांनीं गराडा घातला व त्यांच्या गैरहजेरींत घराची कसून झडती घेतली व १९३० मध्यें प्रसिद्ध झालेलें 'क्रांतीके गझलें,' या हिंदी पद्यावलीच्या २ हजार प्रती जप्त केल्या.

१९३२ साली नागपूर येथील सत्याग्रहाचे मोहिमेंत आर्वी येथून पुष्कळशा स्वयंसेवकांचीं व काहीं अंशीं पैशाची कुमक पोहोंचविण्यांत आल्यामुळें आर्वीचा त्याम वृत्तात वेगळा सांपडत नाहीं ! तानबा गोंडानें मात्र नागपूर ज्यु०क० च्या कोर्टात सर तेजबहादूर सप्रू हे खटला चालविण्यास उभे असतां भर कोर्टात बुलेटिन वाटून भाषण केलें. खरांगण्याहून नारायणराव वाघाच्या प्रयत्नानें रेल्वे पिकेटिंगकरितां वर्धा येथें चार बायाना पाठविण्यांत आलें. त्यातील दोघीजणी गोंड जातीच्या होत्या; एक नारायणराव वाघांची वृद्ध आई व खेड्यांतली बाई होती. त्या सर्वांना प्रत्येकीं ४–४ महिन्याची शिक्षा झाली. माडव्याच्या माधवराव देशमुखांना ४०० रुपये दंड ठोठण्यांत आला. कलकत्ता येथील कांग्रेसमध्यें केशवराव भुसारी व दहीगावचे नारायणराव वाघ हे प्रतिनिधी म्हणून पाठविण्यात आले. ते आणि प्रांतांतील इतर ठिकाणचे

प्रतिनिधि मिळून २४-३-३३ रोजीं नागपुरांत अप्पाजी तिजारे यांचे नेतृत्वाखालीं मिरवणुकींत निघाले व त्यांना लवकरच पकडण्यांत आलें.

म. गांधींच्या प्राणांतिक उपवासानंतर आर्वी तालुक्यांत हरिजन चळवळीला सुरवात झाली व हळूहळू विहिरी व देवळें अस्पृश्यांस मोकळीं होऊं लागलीं.

१९३४ चे आरंभीं जमनालाल बजाज यांनीं वर्धा येथें प्रांतांत जागृति करण्याचे उद्देशानें विदेशी-वस्त्र-बहिष्कार-मंडळ स्थापन केलें. त्याचा त्यासंबंधानें आर्वी तालुक्यांत जानेवारी महिन्याचे पूर्वार्धात आर्वी, खरांगणा व विरुळ येथें दौरा झाला. १९३४ सालीं काँग्रेसच्या आज्ञेला अनुसरून नरकेसरी मोरोपंत अभ्यंकर हे उमेदवार उभे राहिले. हे या तहशिलींतील धनोडी गांवचे रहिवाशी आणि मालगुजार होते. निवडणुकीच्या मोहिमेप्रीत्यर्थ अभ्यंकराचा या तहशिलीतील आष्टी, तळेगाव शिधिर, ठाणेगांव, कारंजा, खरांगणा, वाढोणा, पिंपळखुटा आणि आर्वी खास या गांवीं दौरा झाला. निवडणुकीनंतर मताची मोजदाद झाली त्या वेळीं आर्वी तालुक्यातून अपेक्षेबाहेर बहुमत मिळालें. खरांगणा केंद्रातील झामाजी व दमडूजी, तळेगांव केंद्रांतील इंगळे मंडळी व त्यांचे सहकारी आणि कारंजा केंद्रांतील केशवराव मुसारी, पांडुरंगजी वगैरे मंडळी काँग्रेसच्या हाकेला नेहमीं ओ द्यावयाला तयार असत व पुढेंही त्यांच्याकडून तीच अपेक्षा आहे.

# प्रकरण आठवें

## हिंगणघाट तहसील

तालुक्याचें हें मुख्य ठिकाण वण नदीवर असून हिंगण झाडा-वरून त्याचें हें नाव पडलें असावें. पूर्वी येथें बनी नांवाचा फार लांब ताग्याचा कापूस होत असे व एंप्रेसमिल या कापसाचें कापड मुद्दाम 'हिंगणघाटी रुइना बनावेला माल' असें वर्णन करून बाजारात पाठवी. पुढे जेंझिया कापसाचा कृत्रिम प्रचार करून बनी कापसाची गळचेपी करण्यांत आली.

१९१५ पूर्वी येथें सार्वजनिक चळवळ विशेष जोरांत नव्हती. श्री. नागले वकील यांनीं त्या सालीं एका लायब्ररीस सुरुवात केली. नंतर लो० टिळकाच्या होमरूल दौऱ्यांत या तहसिलीनें भाग घेतला. १९२१ सालीं श्री. नागले व श्री. चिंगरू यानीं वकिली सोडली.१९२३ च्या झेंडासत्याग्रहात श्री. घटवाई व श्री. अंबादासपंत देशपांडे यांच्या खटपटीमुळें एकंदर पासष्ट स्वयंसेवक नागपुरास गेले. १९२४ सालीं येथें एक राष्ट्रीय शाळा स्थापन करण्यात आली. १९२१ पासून पुढें आज-पावेतों हा तालुका काँग्रेसचा नेटमीं पाठपुरावा करीत आला व या तालुक्यातील जागृतीचें श्रेय बहुतांशीं श्री. नी. मु. घटवाई यांस आहे.

२६ जानेवारी १९३० चा स्वातंत्र्यदिन गोविंदराव खत्री यांचे अध्यक्षतेखालीं पाळण्यात आला व पुरुषोत्तमराव देशपांडे वकील यानीं स्वातंत्र्याचा ठराव सभेतील ५ हजार लोकांकडून म्हणवून घेऊन पास केला. १३ एप्रिलला कमलाबाई दातार यांचे अध्यक्षतेखाली ३० स्त्रियांनीं मिठाचा कायदेभंग केला. त्याच रात्रीं घटवाई यांचे अध्यक्षते-खालीं आचार्य विनोबाजी भावे यांनीं गैरकायदा मिठाच्या ७० पुड्या

विकल्या. या तालुक्यांतील घरोडा, वडनेर, पोहना, अल्लिपुर ह्या गावीं घटवाई, बाबासाहेब देशमुख यांचे हस्तें मिठाच्या पुड्या विकण्यांत आल्या. पुढें जप्त वाङ्मयाचा सत्याग्रह करण्यांत आला. त्यांत भीमनवार आदिकरून मंडळींनीं मुख्यत्वें भाग घेतला.

पहिले सर्वाधिकारी वर्धाश्रमाचे थत्ते होते. त्यानंतर युद्धमंडळ स्थापन झालें, त्याचे पहिले अध्यक्ष गोविंदराव खत्री होत. बाबूराव हे सेक्रेटरी होते. भगवंतराव चौधरी, गोवर्धन जाजुडिया हे सभासद होते. यानंतर डॉ. मुजुमदार यांनीं चळवळीचें नेतृत्व पत्करलें. देशसेविकासंघ स्थापन करण्यांत आला त्यांत ४० देशसेविका होत्या. स्वयंसेवक मंडळांत १२०० स्वयंसेवक होते. तळेगांवच्या पहिल्या जंगलसत्याग्रहाला रामभाऊ येवलेकरांच्या सेनापतित्वाखालीं ५ जणांची तुकडी पाठविण्यांत आली. ९–३–३० रोजीं परदेशी कापडावर पिकेटिंग सुरू झालें. तें ८ दिवस चाललें होतें. व्यापाऱ्यांनीं दिवाळीपावेतों परदेशी कापडाचे गठ्ठे बांधून ठेवले. विलायती वस्तू बहिष्कारामुळें ३६ इसमावर २६ जी. प्रमाणें खटले होऊन त्यांना शिक्षा झाल्या. मालतीबाई थत्ते यांना जंगलसत्याग्रहास उत्तेजन देण्याबद्दल अटक करण्यात आली व पुढें त्यांस शिक्षा झाली. २६–८–३० रोजीं त्यांना ५० रुपये दंड झाला. बालवीर मुंजे यांनाही दंडाची शिक्षा झाली. दंड न दिल्यामुळें त्यांना २ महिने शिक्षा भोगावी लागली. श्री. द. थत्ते यांना ३०।९।३० रोजीं अटक होऊन शिक्षा झाली. याच आरोपाखालीं कृष्णराव देशपांडे व महादेवराव सोनकुसरे यांना शिक्षा देण्यात आली.

१६–१०–३० ला कुळकर्णी यांचे हस्तें प्रथम प्रदर्शन उघडण्यांत आलें. २१–११–३०ला दुसरें प्रदर्शन डॉ. मुजुमदार यांचे हस्तें उघडलें. दिवाळीची मुदत संपल्यानंतर कापडाच्या व्यापाऱ्यांनीं सील तोडून विदेशी कपड्याचे गठ्ठे मोकळे केले म्हणून पुनः पिकेटिंग सुरू झालें. तीन इसमांनीं दोन दिवस पावेतों उपवास केला. शेवटीं एकदाचें

बेमुदत सील लावण्यांत आलें. २९-७-३० पासून दारू पिकेटिंग सुरू झालें. त्यामुळें दारूची विक्री अजिबात बंद झाली. २७-१०-३० रोजीं वर्धा येथें दारूचे लिलांव होते. त्यासाटीं ७ प्रमुख कार्यकर्ते, १५ स्वयंसेवक आणि २२ स्वयंसेविका गेल्या होत्या. त्यांना अटक करून मागाहून सोडून देण्यांत आलें होतें. तेली पंचायत, गोवारी पंचायत, मेहतर पंचायत, गोंड पंचायत, मांग पंचायत, तशा जाती पंचायती स्थापन करण्यांत आल्या. अनेक गांवांतून सारा तहकुबीकरितां अर्ज करण्यांत आले.

कौंसिल पिकेटिंगच्या वेळीं ता. १०।११।३१ रोजीं पोलिसांनीं ३ वेळां लाठी चालविली. दोन इसमांस जबर जखमा झाल्या. खेडोपाडीं हाच कार्यक्रम चालू असे. त्यासाठीं सावली, नंदोरी, वडनेर, टेंभा, पोना, सेकापुर, दोडकी, गिरड, अल्लीपूर समुद्रपुर माडगांव हीं केन्द्रें करण्यांत आलीं होतीं.

दुसऱ्या युद्धांत ४ जानेवारी १९३२ रोजीं म. गांधींना पकडल्यानंतर तालुक्यातील चळवळीनें पुनः उचल खाल्ली. हिंगणघाट तालुक्यातील पहिली गिरफदारी १९ जानेवारी १९३२ रोजीं झाली. तो प्रसंग मोठा चमत्कारिक होता. नागपुराहून आलेले सशस्त्र पोलिस सार्जन्ट व अधिकाऱ्यांच्या ३ लॉन्श रात्रीं २ वाजतां येऊन थडकल्या. सकाळपासून सशस्त्र पोलिसांचें गांवात भ्रमण सुरू झालें. रस्त्यात कोणी दिसला कीं त्याला अडवून चावकाचे तडाके लगावायचे असा धूमधडाका चालू केला. सतत ३ महिने गिरफदाऱ्या व सजा चालू होत्या. पुढें सरकारनें शिक्षा सुनावण्याचें सोडून देऊन फक्त अटक करून नंतर सोडून द्यावयाचें हें धोरण स्वीकारलें. वासी येथें भरलेल्या शेतकरी परिषदेंत श्री. धटवाई यांनीं शेतकऱ्यांना सारा माफ करण्यांत यावा अशा अर्थाचें भाषण केलें. त्याबद्दल त्यांना १२४ अ कलम लागू करून तीन वर्षांची सक्त मजूरीची शिक्षा देण्यांत आली. फेब्रुवारी ता. १५ पासून येथें जादा

पोलीस बसविण्यांत आलें. त्याचा ११ हजार रुपये खर्च ४११ इसमांजवळून वसूल केला. जादा पोलीसनें या ६ महिन्यांत लोकांना नानाप्रकारें छळलें. त्यामुळें सभा भरवणें सुद्धां कठीण झालें होतें. सर्व कामें पोलीसला चुकवून करावीं लागत असत. येथें खादीभांडार असून रामदास पाटील त्याची व्यवस्था पाहातात. वर्षाकांठीं विक्री २ हजार रुपये होते. सेन्दू येथें हरिजन केंद्र आहे. तेथें कृष्णराव देशपांडे काम पाहातात. येथें एक शाळा असून हरिजन मुलें व मुली शिकतात. प्रौढ हरिजनांना रात्रौ शिक्षण देण्यांत येतें. या केंद्रांतून आसपासच्या ५।६ खेड्यांतल्या हरिजन रोग्यांना मोफत औषध वाटण्यात येतें. हिंगणघाट येथेंही गेल्या २॥ वर्षांपासून हरिजन बोर्डिंग असून त्यांत हल्लीं ९ मुलें आहेत.

१९३३ सालीं येथें अनेक सभा झाल्या. त्यांपैकीं ८-३-३३ ची सभा महत्त्वाची होती. शिवनी जेलमध्यें पुनमचंदजी रांका यानीं राजकीय कैद्यांच्या वर्गीकरणाच्या निषेधार्थ उपवास सुरू केला होता. त्यांच्या बरोबर हिंगणघाट तालुक्याचे पहिले डिक्टेटर डॉ० मुजुमदार यांनींही सहानुभूतिपर उपवास सुरू केला होता. त्याबद्दल आणि उमरावती जेलमधील राजकीय कैद्यावरील झालेल्या अत्याचाराबद्दल ह्या सभेंत सडकून निषेध केला. कलकत्ता येथील आर्डिनन्सच्या काळांतील कांग्रेसकरितां बुलेटिनमध्यें आपलें प्रतिनिधित्व जाहीर करून सौ० रंगुबाई भानकर, महादेवराव सोनकुसरे, हिरालाल आर्य, रामदास पाटील, व विनायकराव चौधरी नागपुरास गेले होते. त्याना नागपुरास जाईपर्यंत अटक करण्यांत आली नाहीं. ज्या ज्या वेळीं असेंब्लीच्या किंवा कायदे कौंसिलच्या निवडणुकी येथें झाल्या त्या त्या वेळीं या तालुक्यांतून कायदे कौंसिलकरिता व असेंब्लीकरिता उभे राहिलेल्या उमेदवाराना मतें मिळविण्यासाठीं या तालुक्यातून प्रत्येक वेळीं कसोशीनें काम करण्यांत येई. या तालुका कॉंग्रेस कमिटीचे पहिले अध्यक्ष चेपे होते आणि सेक्रेटरी चौधरी होते. पुढें युद्धकाळांत डॉ. मुजुमदार अध्यक्ष होते. हल्लीं निळ-

कंठराव घटवाई अध्यक्ष असून भगवंतराव चौधरी उपाध्यक्ष आहेत. भीम-नवार आणि क्षिरसागर हे सेक्रेटरी आहेत आणि गोविंदराव खत्री खजिनदार आहेत. घटवाईंचा त्याग, आणि वीरवृत्ती हीं तर महत्त्वाचीच आहेत. परंतु त्यांना चौधरी, भीमराव रामदास पाटील, गोविंदराव खत्री इत्यादि कार्यकर्त्यांची जोड मिळाली हें विशेष होय. वर्धाश्रमाचे श्री. ह. थत्ते आणि मालतीबाई थत्ते ह्यांचा हिंगणघाटच्या कायदेभंग युगांत महत्त्वाचा वांटा होता. हिंगणघाटचे धनिक वर्गाचें काँग्रेसच्या कार्याला गरजेप्रमाणें खात्रीचें साहाय्य मिळतें. यंदा नवीन घटनेप्रमाणें काँग्रेसचे सभासद करण्याचें काम कठीण असूनही हिंगणघाट तालुक्यानें १ हजारावर सभासद केले. नुकत्याच झालेल्या गिरणीच्या संपाच्या तडजोडीचें श्रेयही येथील काँग्रेस कार्यकर्त्यांस आहे.

# प्रकरण नववें
## भंडारा तहसील

भंडारा हें जुनें गांव असून याचा फार पुरातन इतिहास उपलब्ध आहे. याचें जुनें नांव भानारा होतें. भंडारा तहसिलींतील तुमसर गांव हेंही बरेंच जुनें असून भंडाऱ्यांतील तीन तहसिलींत त्याचा समावेश होत नसला तरी चळवळीच्या दृष्टीनें भंडारा जिल्ह्यांत भंडारा व गोंदियाच्या बरोबरीनें तुमसरनेंही फार कार्य केलें आहे. इतकेंच नव्हे तर भंडारा तालुका कांग्रेस कमिटीचें आफिसही तुमसरला आहे. सबब या प्रकरणांत भंडारा व तुमसर या दोन्ही ठिकाणची हकीकत समाविष्ट केली आहे.

१९०७ सालीं या तालुक्यांत स्वदेशी चळवळ प्रथम करण्यांत आली. १९१५ च्या सुमारास राष्ट्रीय व प्रागतिक पक्षाच्या ज्या संयुक्त परिषदा होत त्यांत भंडारा तहसिलीनें बराच भाग घेतला. लोकमान्य टिळक यांपैकीं एका परिषदेंत हजर होते. होमरूल चळवळींतही या तालुक्यानें कामगिरी केली होती. १९२० नंतरच्या असहकारयुगांत पेंढरकर बंधु व छोटू पहेलवान यांनीं उशारी बाहेर न जाऊं देण्याची चळवळ केली त्यासंबंधीं त्यांना अटक करण्यांत आली पण पुढें त्यांस सोडून दिलें. बऱ्याच लोकांनीं पदव्या सोडल्या व ऑ. मॅजिस्ट्रेटी सोडली.

कर्मवीर बापूजी पाठक हे आपल्या प्रांतात वकिली सोडणारे पहिले वकील होत. त्यांच्या स्फूर्तीनें नागपूर कांग्रेसचे आधींच तुमसरला टिळक राष्ट्रीय विद्यालय सुरू झालें व माकडे प्रमुख, अध्यक्ष फत्तेचंद सेठ यांच्या चिकाटीनें तें अजून सुरू आहे. असहयोगाचा कार्यक्रम भंडारा तालुक्यांत किंबहुना जिल्ह्यांत अत्यंत नेटानें चालविण्यांत कर्मवीर बापूजी पाठकांनीं शिकस्त केली व आज प्रांतांतील प्रमुख कार्यकर्त्यांत त्यांची गणना होते. भंडाऱ्यासही एक राष्ट्रीय हायस्कूल व राष्ट्रीय

कन्याशाळा चालू होती पण हायस्कूल १९२३मध्यें बंद झालें. या सालीं मुळशी सत्याग्रहांत या तालुक्यातर्फे विनायकराव पेंढरकर, माधव मुरारी फडणवीस व इतर मंडळी गेली होती. त्याचप्रमाणें नागपुरांतील झेंडा सत्याग्रहातही दामले, लक्ष्मण गणेश, गोपीचंद पाटील, जयराम आणि इतर मंडळी गेली. या सुमारास कर्मवीर बापूजी पाठकांना भाषणाकरितां एक वर्षाची सजा झाली. २ फेब्रुवारी १९२७ ला म. गांधी तुमसरला गेले तेथें त्यांना मानपत्र व थैली (१८०० रु.) अर्पण करण्यांत आली. भंडाऱ्यास त्यांना सुमारें ३००० रुपये मिळाले. सायमन कमिशन बहिष्काराचे वेळीं तालुकाभर हरताळ पडला. १९२९ सालीं तुमसर म्यु. पा. नें राष्ट्रीय निशाण लावलें.

१९३० सालीं जानेवारी २६ ला स्वातंत्र्यदिन पाळण्यापासून चळवळीला सुरुवात झाली. मिठाचा कायदेभंग सुरू होतांच येथेंही बेकायदा मीठविक्री सुरू होऊन ठिकठिकाणीं युद्धमंडळें स्थापन झालीं. परदेशी कापडाचें पिकेटिंग, व्यापाऱ्यांकडून परदेशी कापडाचे गठ्ठे बांधून घेणें, वगैरे कार्यक्रमही जोरात सुरू झाला. या सुमारास भंडाऱ्यांतील जंगलाचे लिलाव होण्याची वेळ आली. या लिलांवावर पिकेटिंग करण्यास जाणाऱ्या स्वयंसेवकांना भंडाऱ्यासच पोलिसांनीं अडविलें व तेथें त्यांना चोप दिला. टिळक पुण्यतिथीच्या मुहूर्तानें चिचोलीचा जंगलसत्याग्रह जाहीर करण्यात येऊन दामले यांच्या नेतृत्वाखालीं दहा सैनिकांची एक तुकडी रवाना झाली. सर्व सत्याग्रहांचे प्रसंगीं हजारों प्रेक्षक उत्साहानें हजर असत. या सत्याग्रहात कर्मवीर पाठक, चतुर्भुज भाई जसानी व गोपीचंद पाटील यांनी पकडण्यात आलें. गणपतलाल पांडे यांच्या नेतृत्वाखालीं दुसरी तुकडी चिचोलीस रवाना झाली.

यानंतर चिचोली, पचारा, गोबरवाही, च्चाटा, कवलेवाडा, देवनारा, पिटेझूर, रोंधा, चांदपूर, चुल्हादडोह वगैरे ठिकाणीं एकाच वेळीं जंगलसत्याग्रह सुरू झाल्यानें पोलीस फारच कंटाळून गेले व त्यांनीं

सामुदायिक सत्याग्रह सुरू करण्यांत आल्याबरोबर सत्याग्रह्यांना पोलीस ठाण्याजवळच पकडण्याची प्रथा सुरू केली; तरीपण यामुळें काम बंद पडलें नाहीं. यानंतर भंडारा तुमसरच्या मंडळींवर १५७ कलमाखालीं नोटिसा बजावण्यांत आल्या. इतकेंच नव्हे तर अनेक ठिकाणीं जादा पोलीस बसवून खेडोपाडीं पोलीसचा जुलूम सुरू झाला. दंडवसूली व मारहाण होऊं लागली.

१९३० सालच्या चळवळींत भंडारा तालुक्यांतील वानरसेनेनें बरीच कामगिरी केली.

१९३२ सालीं पुनः चळवळ सुरू झाल्याबरोबर युद्धमंडळाचे सर्वाधिकारी प्रभाकरराव पेंढरकर व चिटणीस वासुदेव कोंडेवार याना १६ फेब्रुवारी १९३२ रोजीं पकडण्यांत आलें. त्यानंतर ल. बा. ऊर्फ नानाजी कोटी, दादाजी, जोशी, श्री. सुमित्राबाई, आनंदराव चक्कोले, तुकाराम पहेलवान, टिकाराम लांजेवार, सदाशिव शिर्पी, भय्यालाल मराठे, वि.बा. ठाकूर हे नऊ सर्वाधिकारी एकामागून एक जेलमध्यें रवाना झाले. टिळकविद्यालयाचे शिक्षकही गिरफ्तार झाले. त्यानंतर पोलिसांनीं येथील धरपकड बंद केली म्हणून नागपूरला स्वयंसेवकांच्या तुकड्या पाठविण्यांत आल्या.

हरिजन कार्यार्थ महात्माजी दौऱ्यावर असतांना १९३३ च्या नोव्हेंबरमध्यें त्यांना तुमसर येथें आणण्यात आलें. त्याचें जाहीर भाषण झाल्यावर त्यांना सुमारें हजार रुपयांची थैली हरिजन सेवासंघाच्या कार्यासाठीं देण्यांत आली. तसेंच भंडारा येथूनही त्याना दोन हजारांवर रकम अर्पण केली गेली. या दोन्ही प्रसंगीं दूरदूरचे खेडुत सुद्धां आले होते.

भंडारा तहसिलींत खादीभांडारातर्फे खादीचें दुकान नसले तरी ठिकठिकाणचे कार्यकर्ते व्यक्तिशः खादीप्रचाराचें काम करीत आहेत. सध्याच्या ग्रामोद्योग चळवळींत ही तहसील पूर्णपणें सहकार्य करीत असून तुमसरला बुधराम दीक्षीत हातकुटाई तांदुळाचें काम विशेष उत्साहानें करीत आहेत.

# प्रकरण दहावें

## गोंदिया तहसील

ही तहसील महत्त्वाची असून बरेच वर्षांपासून येथें राष्ट्रीय चळवळ चालू आहे. १९१९ मध्यें गोंदियास रायसाहेब टकर यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा परिषद भरली होती. त्या परिषदेंत तनखीवाले, अभ्यंकर साठे, गोपाळराव बापट व सेठ सूरजमल यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता.

टिळक स्वराज्यफंड, २३ सालचा झेंडा सत्याग्रह, इत्यादि प्रसंगोपात्त चळवळी, त्याचप्रमाणें कांग्रेस सभासद बनविणें व कांग्रेसचा विधायक कार्यक्रम पार पाडणें इत्यादि सर्व कामांत या तहसिलीनें मोठ्या अहमहमिकेनें भाग घेतला. अलीकडील कांग्रेस राजकारणांतील गोंदियाच्या जागृतीचें श्रेय मुख्यत्वेंकरून प्रो. जोगळेकर, सेठ चतुर्भुजभाई, सेठ सुखदेवजी आणि त्यांच्या साहाय्यक मित्रमंडळींस आहे.

१९३० सालीं इतर ठिकाणांप्रमाणें येथेंही स्वातंत्र्यदिन समारंभापासून चळवळीस सुरुवात झाली. नंतर मीठसत्याग्रह व जप्त वाङ्मय वाचनाचे कार्यक्रम सुरू झाले व त्यांत चतुर्भुजभाई गिरिधारीलाल, अवधबिहारीलाल इत्यादि मंडळींनीं भाग घेतला. नंतर येथें युद्धमंडळ स्थापन करण्यात आलें. २० मे रोजीं पं. शिवबालक ( हे नागपूरचे १६ वे युद्धाध्यक्ष होते ) यांच्या नेतृत्वाखाली दारुपिकेटिंग सुरू झालें व त्याचा दारूविक्रीवर तात्काळ परिणाम झाला. चिचोली सत्याग्रहानिमित्त चतुर्भुजभाईंना पकडण्यात आलें. परदेशी वस्त्र बहिष्काराचा परिणाम म्हणून सुमारें १ लाख ८ हजार रुपयांचे परदेशी कापडाचे गठ्ठे बांधण्यांत आले. २२ जुलैला राष्ट्रीय शाळेचा विद्यार्थी बृजलाल यानें वानरसेनेची एक तुकडी सत्याग्रहांत नेली.

स्त्रियाही प्रभातफेऱ्या, स्वदेशीप्रचार व पिकेटिंग यांत भाग घेत असत. राष्ट्रीय शाळांपैकीं ज. श्री. पटवर्धन व बोरा राष्ट्रीय शाळेचे धर्माजी, बृजलालसिंह, सालवर्डीचे अंतराम लोधी, राठोड, पोफळी, गोपाळरावजी, दिनाजी इ. यांनीं या वेळीं अभिनंदनीय कामगिरी केली. यामुळें सत्याग्रह कालांत या शाळा बंद झाल्या.

गिरिधारीलाल ( २ रे डिक्टेटर ) यांना १५ आगस्टला पकडण्यांत आलें व सुखदेव युद्धाध्यक्ष झाले. तेलीनाल्याच्या जंगलसत्याग्रहांत वेलजीभाई मेहेता व ८ स्वयंसेवक पकडले गेले. मुर्दोलीच्या सत्याग्रहाचें नेतृत्व गोपाळराव बापट यांच्याकडे होतें. चोरमारा सत्याग्रहाचें नेतृत्व बरजोरसिंग टाकूर यांच्याकडे होतें. पुनः मुर्दोली, सोनकुंड, बकीमेंडकी, घडेगांव, मंगेझरी इत्यादि ठिकाणीं सत्याग्रह झाले. रामलाल मंगलसिंह व ४५ स्वयंसेवक पकडले गेले. आगस्ट महिन्यांत (२५ ते २७) २० ठिकाणीं जंगलसत्याग्रह करण्यांत आला. पटवर्धन (ज. श्री.) यांना १ वर्षाची शिक्षा झाली. या सत्याग्रहांत १५० लोक पकडले गेले. नंतर केशवराव इंगळे पुढें आले. ३ सप्टेंबरला पुनः सत्याग्रह्यांना पकडण्यांत आलें.

४ थे अध्यक्ष प्रो. जोगळेकरांना नागपुरास प्रां. यु. मंडळाचे अध्यक्ष म्हणून जावें लागलें. इंगळे पकडले गेल्यावर बिहारीलाल शर्मा डिक्टेटर झाले. याचेनंतर धनीराम खत्री व नंतर राधाबाई पोफळी युद्धाध्यक्ष झाल्या. या तहसिलींतून जादा पोलिसकरितां दहा हजार रुपये वसूल करण्यांत आले. ६ आक्टोबरला कोराडीस जंगलसत्याग्रहांत तिम्या व जन्या या दोघा स्वयंसेवकास पोलिसांनीं भाल्यानें भोकसलें व त्यामुळें शेवटीं ते मेले. त्यांच्या कुटुंबाच्या मदतीकरितां एक फंड काढला होता.

कराची काँग्रेसला येथून बरेच प्रतिनिधी गेले. नंतर गोंदियास पं. सुंदरलाल यांचे अध्यक्षतेखालीं जिल्हा परिषद भरली व सौ. कार्नेलियाबाई साळवे यांच्या हस्तें स्वदेशी प्रदर्शन उघडण्यांत आलें.

१९३२ च्या दुसऱ्या चळवळींत पुनः कार्यास सुरवात होऊन सौ. राधाबाई पोफळी व सौ. आनंदीबाई जोगळेकर यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. १९३३ च्या कलकत्ता कांग्रेसला चतुर्भुजभाई गेले होते.

यापूर्वी सुरू झालेल्या हरिजन चळवळीकरितां येथें दोन तीन हजार रुपये फंड जमविण्यांत आला. मेहेतरांकरितां एक शाळा उघडण्यांत झाली. ही शाळा आचार्य विनोबाजी भावे यांच्या हस्तें उघडण्यांत आली. सिवनीमही एक शाळा उघडण्यांत आली. यानंतर वैयक्तिक सत्याग्रहाच्या वेळी पुनः पाचजणांना पकडण्यात आलें.

मुंबई कांग्रेसला येथून नियमाप्रमाणें पूर्ण प्रतिनिधिसंख्या गेली. तनखीवाले यांच्या उद्योगानें या तालुक्यांत शेतकऱ्यांची चळवळ विशेष उत्साहानें करण्यांत आली.

गोंदियामध्यें राजकारणाचे प्रवाह फार जोरानें चालू असतात. म्युनिसिपालिटी, डिस्ट्रिक्ट कौंसिल, कांग्रेस, राष्ट्रीयस्वयंसेवक संघ, इत्यादि अनेक चळवळी गोंदियास फार उत्साहानें चालतात. असें असलें तरी भिन्न पक्षोपपक्षांत विशेष तेढ दिसून येत नाहीं हें अभिनंदनीय आहे. रा. स्व. संघ व कांग्रेस कार्यकर्ते हे पुष्कळ वेळा सहकार्यानें काम करतात. १९३० सालीं तनखीवाले यांनीं स्वतःच्या अधिकारांतील लोकल बोर्डाच्या शाळांवर अध्यक्ष या नात्यानें राष्ट्रीय झेंडे लावण्याचा हुकम केला ही फारच मोठी गोष्ट झाली. व्यापाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें असें हें भंडारा जिल्ह्यातील प्रमुख गांव अनेक दृष्टींनीं फार पुढारलेलें असून कधीं काळीं भंडारा जिल्ह्याचें ते मुख्य शहर झाल्यास नवल नाहीं.

# प्रकरण अकरावें

## साकोली

ही तहसील थोडीशी मागसलेली आहे. १९२० च्या नागपुर कॉंग्रेसनंतर येथील वकील भाऊसाहेब टेंभेकर व नारायणराव आंबोकर यांनीं एक वर्षपर्यंत वकिली सोडली होती. या तहसिलीत दारूचे ठेकेदारांनीं ठेके घेतले नव्हते. चरखा सघाचें तेथेंच केन्द्र आहे.

१९२१ च्या मार्च महिन्यात सौंदड मुक्कामीं भवानीशंकर नियोगी यांचे अध्यक्षतेखालीं जिल्हा परिषद भरली होती. त्यानंतर एप्रिल महिन्यांत किन्ही येथें बापूजी पाठक यांचे अध्यक्षतेखालीं परगणा परिषद भाली. या सभेंत भाषण केल्यामुळें सरकारनें खटला चालवून त्यांना १ वर्षाची शिक्षा केली. त्याच परिषदेंत येथील मुकद्दम गणपत पाटील यांना बिगार न दिल्यामुळें तहसिलदारकडून दंड करण्यांत आला होता.

कॉंग्रेसचा संदेश लोकांना समजावून सागण्यात प्रमुख पुढाकार नानाजी कोतवाल, आंबोकर, टेंभेकर, दामले, पंधे यांनीं घेतला होता. १९३० सालीं जंगल सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली. या चळवळींत सरासरी ५० स्वयंसेवक तुरुंगांत गेले.

१९३३ मध्यें कायदेभंगाची पुनः चळवळ सुरू झाली त्या चळवळींत सरकारनें प्रमुख लोकांना तुरुंगांत टाकलें व बाकी लोकांना मारपीट करून सोडून दिलें. यामध्यें उमरावसिंग चव्हान, जैरामजी म्हाली व श्रावण महाजन प्रमुख आहेत. वैयक्तिक सत्याग्रहाच्या वेळेस कनेरी येथून २ तुकड्या कायदेभंग करण्यास गेल्या होत्या परंतु त्यांना मारपीट करून सोडून देण्यांत आलें. फक्त बापूजी पाठक व दोन स्वयंसेवक यांना शिक्षा झाली.

---

## प्रकरण बारावें

# चांदा तालुका

चांदा हें इतिहासप्रसिद्ध शहर असून त्याचे आसपास प्राचीन कालांतील अवशेष व ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थळें आहेत. भांदक ही पूर्वीची पाडुवंशी राजांची भद्रावती होय. १२४० पासून चांद्यास गोंड राज्य सुरू झालें. पुढें हें राज्य भोंसल्यांच्या राज्यात मोडूं लागलें. चांद्या-जवळचें पद्मपुर नांवाचे खेडें महाकवि भवभूतीचें जन्मस्थान होय असें म्हणतात.

चांद्यास १८९५ चे सुमारास रामभाऊ बोबडे वगैरे सुशिक्षित मंडळींच्या प्रयत्नानें सार्वजनिक जीवनास प्रथम सुरवात झाली. १९१४ पावेतो स्वदेशीच्या प्रचाराचें कार्य थोड्या फार प्रमाणात चालू होतें. १९१८ साली होमरूल लीगच्या दौऱ्याचे वेळीं लो० टिळकांचें फार मोठ्या प्रमाणावर स्वागत करण्यांत येऊन त्याना ५॥ हजाराची थैली अर्पण करण्यात आली. ह्याच वर्षी दे. भ. गंगाधरराव देशपांडे ह्यांचे अध्यक्षतेखालीं चांदा जिल्ह्याची पहिली राजकीय परिषद भरली.

नागपूर कांग्रेसनंतर श्री. बाबाजी पाटील, शेट लोभकरण, डॉ. शंकरराव, मारोतराव कन्नमवार, अब्दुल रज्जाक वगैरे मंडळींनीं कां. च्या नव्या कार्यक्रमास सुरवात केली. १९२२ मध्यें राष्ट्रीय सप्ताहांत ह्याच कार्यकर्त्यांना पकडण्यात येऊन कांहीं दिवसांनीं सोडण्यांत आलें. झिंगोबाजी पंचाळ ह्यांना मुळशी सत्याग्रहांत ६ म. ची शिक्षा झाली. झेंडा सत्याग्रहातही चांद्यानें बरीच आर्थिक मदत पोहोंचविली.

१९२३ ते १९२६ च्या स्वराज्य पक्षाच्या चळवळींत चांदा हें प्रतिसहकार पक्षाचें एक ठाणें असून नागपूरच्या त्या काळच्या राजकार-

णांत चांगानें बराच भाग घेतला होता. पण नागपुरास बॅ. अभ्यंकरांचा पक्ष बळावला तेव्हांपासून येथेंही पारडें फिरलें व दिवसेंदिवस कांग्रेसचें वजन वाढूं लागलें.

२६ जा. १९३० रोजीं बाबाजी पाटील ह्यांचे अध्यक्षतेखालीं टाऊन हॉलमधील सभेंत स्वातंत्र्याचा ठराव पास झाला.

ता. १०-४-३० रोजीं शेठ खुशालचंद ह्यांनीं मिठाच्या सत्याग्रहाला सुरुवात केली. १५ तारखेस पं. जवाहरलाल ह्यांच्या अटकेनिमित्त गांवांत पहिला कडकडीत हरताळ पडला. दुसरा हरताळ ६ मे रोजीं महात्माजींच्या अटकेनिमित्त पडून विदेशी कापड दुकानदारांनीं व्यापारी असोसिएशन स्थापन करून विदेशी कापड न बोलावण्याबद्दल प्रतिज्ञा केली. २९-५-३० ला 'भारत में अंग्रेजी राज' ह्या जप्त झालेल्या पुस्तकांतील उताऱ्यांच्या प्रती वाटून जाहीर सभेंत लोकांकडून त्या वाचून घेतल्या.

१ जूनपासून विदेशी कापडाच्या दुकानांवर स्त्रियांनीं पिकेटिंग सुरू केलें व एकदोन दिवसांत सुमारें ६५००० रु. चें कापड सीलबंद झालें.

नागपुराहून धारासन्यास गेलेल्या तुकडींत येथील जगदीशराव माळवे, राजेश्वरराव देशमुख, तात्याजी गव्हाणकर ह्यांचा समावेश करण्यांत आला होता. तळेगांवच्या जंगलसत्याग्रहासाठींही येथून एक टोळी पाठविण्यांत आली होती.

ता. १७ जुलैस सरकारनें जंगलच्या ठेक्यांचा लिलाव जाहीर केला होता त्यावर यशस्वी रीतीनें पिकेटिंग झालें. लिलावाच्या जागीं एकही ठेकेदार जाऊं शकला नाहीं. जमाव उधळून लावण्यासाठीं पोलिसांनीं लाठीमार केला तरीही गर्दी ओसरेना; तेव्हां गोळीबार होतो कीं काय अशी भीति निर्माण झाली पण अखेर तो प्रसंग कसातरी टळला. त्या प्रसंगाचा ठेकेदारांवर योग्य परिणाम होऊन त्यांनीं ठेके न घेण्याच्या प्रतिज्ञा केल्या. ह्यामुळें सरकारचें सुमारें १७ लाखांचें नुकसान झालें.

**जंगलसत्याग्रहाला सुरुवात**–ता. ८–८–३० रोजीं जानबाजी पंचाळ यांचे नेतृत्वाखालीं लोहारा येथील जंगलांत जंगल सत्याग्रह करण्यांत आला. नागपुरास गढवाल दिनाच्या दिवशीं सेठ खुशालचंद ह्यांच्या अटकेमुळें चळवळीस खूप जोर चढला व २४ ऑगस्टला तालुक्यांत सर्वत्र सामुदायिक जंगलसत्याग्रह करण्यांत आले. चांदास ह्या दिवशीं भयंकर लाठीमार झाला; व पकडण्यांत आलेल्या अल्पवयी स्वयंसेवकाना फटक्यांची शिक्षा देण्यांत आली.

इतर महत्त्वाच्या सत्याग्रहांची हकीकत खालीं दिली आहे.

**मूल–मरोडा**–बळवंतराव अप्पलवार व माणिकलाल मगनलाल ह्याचे नेतृत्वाखालीं २००० लोकांनीं गवत कापलें.

**बल्लारपूर**–नेतृत्व रसिकलाल प्रवासी. २००० लोकांनीं वेळू कापले.

**मारोडा**–नेतृत्व–विठ्ठल शिवराम. ५०० लोकांनीं गवत कापलें.

**कौंसिलची निवडणूक**–कृष्णराव जोशी यांनीं जोरदार पिकेटिंग केलें. १०–१५ मतदारांपेक्षा अधिक मतदार मतदान करूं शकले नाहींत.

जवाहर दिनानंतर मारोतराव कन्नमवार व बाबाजी पाटील यांस पकडण्यात आलें. कन्नमवारांना त्यांच्या तुरुंगवासाबरोबरच डी. सी. च्या हुकुमानें नोकरीवरून काढण्यांत आलें.

**दारू पिकेटिंग**–दारूच्या लिलावाचे दिवशीं गोविंदराव याज्ञिकाचे नेतृत्वाखाली पिकेटिंग झालें. एकही ठेकेदार बोली बोलण्यास फिरकला नाहीं.

**स्त्रियांची कामगिरी**–ह्या युद्धात सौ. गोपिकाबाई कन्नमवार, सौ. गोपिकाबाई फुलझेले, कु. कलावती, श्रीमती राजकाबाई, प्रमिलाबाई याज्ञिक व मिराबाई मंदुलवार यांनीं केलेली कामगिरी संस्मरणीय होती.

गांधी इर्विन करारानंतर निळकंठराव देशमुख यांचे अध्यक्ष-तेखाली चांदा जिल्हा राजकीय परिषद भरविण्यांत आली.

१९३२च्या फेब्रवारी महिन्यांत शेठ खुशालचंद ह्यांच्या गिरफदारीनें चळवळीला तोंड लागलें.

## गढवालदिन व १४४ कलम.

ता. १३ फेब्रुवारीला गढवालदिन साजरा करण्याचें ठरतांच १४४ कलम जारी करण्यांत आलें. शेठ महेशदासजी ह्यांच्यावर मिरवणूक न काढण्याबद्दल नोटीस बजावण्यांत आली. पोलिसांच्या कडेकोट बंदोबस्तांत मिरवणूक निघून २० स्वयंसेवकांना पकडण्यांत आलें. त्यांत ३ स्त्री स्वयंसेविकाही होत्या.

चळवळीचें वाढतें स्वरूप पाहून ता. २७ फेब्रुवारीला आर्डिनन्स जारी करण्यांत आला व गांवांत सार्वत्रिक धरपकड करण्यांत आली. ह्या धरपकडींत चांद्यांतील बहुतेक सर्व प्रमुख कार्यकर्ते पकडले गेले.

दिल्ली कांग्रेस व नागपूर राजकीय परिषदेला येथून अनुक्रमें देवतळे व फडके ह्यांना पाठविण्यांत आलें होतें. डोमप्पाजी नामपेल्लीवार ह्यांचे अध्यक्षतेखालीं चांदा जिल्हा राजकीय परिषद झाली.

ही दुसरी चळवळ ओसरतांच अस्पृश्यतानिवारणाचें कार्य हातीं घेण्यात आलें व आपल्या मगदुराप्रमाणें चांद्यानें इतरांच्या बरोबरीनें कामगिरी केली. ह्यांत गांधी-सेवा-मंडळानें विशेष कार्य केलें.

बॅ. अभ्यंकरांच्या असेंब्ली निवडणुकींत चांद्यानें पूर्वीचा दुर्लौकिक धुवून काढला व कांग्रेसचें आसन दृढ करून ठेवलें.

---

# प्रकरण तेरावें

## वरोडा तालुका

वरोरा तालुक्यांत भांदक, चिमूर, नागरी, चिकणी, नंदोरी, करंजी चांझुर्णी, नेरी, भिसी, मांढरी, हीं मोठीं गांवें आहेत. होमरूल लीग च्या चळवळींत येथील रामकृष्णपंत खटी, पुरुषोत्तमराव 'डे, कांकडे वकील, विष्णुपंत काळे, सेठ चुन्नीलाल फिरोदिया हे प्रामुख्यानें भोडत होते. येथें श्रीकिसन वगैरे तरुण मंडळी प्रभातफेरी काढूं लागली. सेठ चुन्नीलालजी कळकळीनें आस्थापूर्वक चळवळीला साह्य करीत होते. दे. घटवाई ह्यानीं वरोऱ्यांत जागृति केली. नागरी येथील महादेवराव हाडे ह्यानीही लोकजागृतीच्या कामांत पुष्कळ भाग घेतला.

या सुमारास येथील म्युनिसिपालिटीवर राष्ट्रीय निशाण फडकविण्यांत आलें. खास वरोरा येथें ४'१०००, माढेळी येथें १५००, चिमूर येथें २००० व नागरी येथें १००० रुपये किमतीच्या मालाचे गट्ठे सीलबंद करून ठेवण्यात आले होते. येथून तळेगाव जंगल सत्याग्रहाकरितां कोंडवाजी सोनार, बद्री जेठमल, सदाशिव देवाजी गायकवाड हे रवाना झाले. ह्यानीं बऱ्याच खेड्यापाड्यातून पायीं प्रवास केला.

८-८-३० ला बाबूराव घुडे याचे नेतृत्वाखालीं ५ स्वयंसेवकांनीं जंगलाचा कायदेभंग खैरगाव जंगलांत केला परंतु कोणालाहीं पकडण्यांत आलें नाहीं. सेठ चुन्नीलाल यांना त्यांच्या एका भाषणाबद्दल अटक करण्यात येऊन चांद्याच्या तुरुंगांत आणण्यात आलें. त्यांना ६ महिन्यांची स. म. व ६०० रु. दंड करण्यात आला.

तालुक्यांतील इतर ठिकाणीं धडाक्याचे जंगलसत्याग्रह झाले होते. जेना येथें सेठ गुलाबचंद गोठी याचे नेतृत्वाखालीं उद्धव सोनार,

हरिभाऊ जोशी, दामोधर म्हाली यांनीं खैरगांव येथील जंगलांत कायदे-भंग केला. पुढील गांवीं त्या त्या ठिकाणीं नमूद केलेल्या पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह झाला. वरांझ येथें सेठ जसराज गोठी यांनीं जंगलसत्याग्रह केला. चिमूर येथें कृष्णराव भोपे यांचे नेतृत्वाखालीं पांडुरंग पोतदार, उद्धव तुकाराम कुरेकार, गोपाळराव वारई, लक्ष्मणराव वारई व ७००–८०० स्वयंसेवक; सावरगांवः–विठोबा पाटील कोहळी; नेरीः–मारोतराव तुमपेल्लीवार, बाजीराव लक्ष्मण डोनूवाला, सयाजीराव मराठे व इतर ४–५शें स्वयंसेवक; नागरीः–महादेवराव हाडे यांचे नेतृत्वाखालीं उद्धव बाबाजी, बाजीराव तेली, नथ्थू सोनार, गंगाराम सावकार व इतर ४००–५०० मंडळीं यांनीं सत्याग्रह केला.

कायदेभंग झाल्यानंतर प्रमुख कार्यकर्त्यांची धरपकड सुरू झाली. सेठ जसराज गोठी याना भांदक मुक्कामीं पकडलें. ही बातमी ऐकतांच आसपासच्या खेड्यांतील शेंकडो लोक गोळा झाले. रात्रौ सेठ जसराज यांना चांद्याच्या तुरुंगांत आणण्यांत आलें. नागरीहून महादेवराव हाडे; सौ. मालतीबाई थत्ते वगैरे मंडळींना पकडून चांद्याच्या तुरुंगात आणण्यांत आलें. स्थानिक कार्यकर्ते जेलमध्यें गेल्यामुळे त्यानंतर नागपूराहून विष्णुपंत काळे वरोड्यास काम करावयास आले. ३–११–३० ला परदेशी मालाचे सीलबंद केलेले गठ्ठे उघडल्यामुळें काळे यांनीं पिकेटिंगला सुरुवात केली. चांद्याहून ६ स्वयंसेवक मागविण्यांत आले. एक आठवड्यात सर्व व्यापाऱ्यांनीं पुनः तडजोड केली.

१६-१०-३० ला जवाहर दिनानिमित्त भाषण केल्याबद्दल विष्णुपंत यांना १०८ कलमाखालीं अटक होऊन शिक्षा झाली. गांधी-इर्विन तहानंतर निळकंठराव देशमुख यांचे अध्यक्षतेखालीं शेतकरी परिषद भरली होती.

१९३२ मध्यें पुनः महादेवराव हाडे चांद्याला आले व राष्ट्रीय सप्ताहाच्या कार्यक्रमानिमित्त काढलेल्या मिरवणुकींत त्यास पकडण्यांत

आले व त्यांना ९ महिन्यांची शिक्षा होऊन ३०० रु. दंड झाला.
भगाळा येथील आनंदराव मगरे हे चांदा जिल्हा राजकीय
वेळीं चांद्याला गिरफदार झाले.

१९३३ नोव्हेंबरमध्यें म. गांधी ...निवा...
घर असतांना वरोरा येथें आले. त्यांचें सेठ चुन्नीलाल, विदर्भ,
वार, रामकृष्णपंत सावकार, दादाजी वाकरे वगैरे पुढाऱ्यांनीं
स्वागत केलें व १२१ रुपयांची थैली महात्माजींना अर्पण ...
बॅ. अभ्यंकर यांच्या असेंब्ली निवडणुकीतही या तालुक्यानें
मदत केली. वरोरा तालुक्यांत सध्या मारोतराव कन्नमवार, सेठ
लजी, सेठ गुलाबचंद गोठी, उत्तराज गोठी, भाऊराव डुब्ले,
वाकरे, रामचंद्र गुर्धावार, रामकृष्ण सावकार, आनंदराव घाणी,
गोविंदभाई वगैरे कार्यकर्ते अत्यंत आस्थापूर्वक कमिसचें काम
आहेत. १३।६।३९ ला राष्ट्रपति राजेंद्र बाबू वरोऱ्याला आले.
त्यांचें थाटाचें स्वागत झालें. त्यांचे हस्तें खादीभांडाराचें ...
होऊन राष्ट्रपतींना थैली अर्पण करण्यात आली.

---

## प्रकरण चवदावें

# गडचिरोली तालुका

गडचिरोली तालुक्यांत आरमोरी, चामुर्शी, वडसा वगैरे लहान मोठीं खेडीं आहेत. हा तालुका अत्यंत मागसलेला आहे. सन १९३० पर्यंत या तालुक्यांत राजकीय चळवळीचा मागमूस नव्हता.

तळेगाव जंगल सत्याग्रहाला चांद्याहून कृष्णराव जोगी यांचे नेतृत्वाखालीं जी तुकडी गेली ती या तालुक्यांतील प्रमुख गांवांतूनच गेल्यामुळें येथील कार्यकर्त्यांत चैतन्य उत्पन्न झालें. आरमोरी येथें जीवाभाई, रतीलाल भाटे, अमृतराव नेरल, गणपतराव शिंपी, हरीसुंदर ह्यांनीं प्रभातफेऱ्या द्वारें प्रचार करून विदेशी कापडाच्या व्यापाऱ्यांना मालाचे गठ्ठे सीलबंद करून ठेवावयास लावलें.

२४–८–३० ला आरमोरी येथें वरील मंडळींनीं ७००, ८०० लोकांसमवेत जंगलांत जाऊन लाकूड तोडलें. ह्या सर्वांना गिरफदार करण्यांत येऊन चांद्याच्या तुरुंगांत आणण्यांत आलें.

आरमोरी येथील कांग्रेस कार्यकर्त्यांना नारायणराव नेरल, सीतारामपंत ठेकेदार वगैरेंची आंतून सर्व प्रकारें मदत होत असे.

गडचिरोलीला उमरेडचे श्रीहरी भिसे यांनीं येऊन खळबळ केली व ता. १७–९–३० ला सामुदायिक जंगलसत्याग्रह घडवून आणला. ३००, ४०० लोकांनीं त्यांत भाग घेतला होता. केशवराव पंजारी, माधवराव गांडली वगैरे खास गडचिरोलीची मंडळी गिरफदार झाली. अशा प्रकारें कायदेभंगाच्या चळवळींत या तहसिलीनें आपल्या मगदुराप्रमाणें भाग घेतला.

---

## प्रकरण पंधरावें

# ब्रम्हपुरी तालुका

ब्रह्मपुरी तालुक्यांत सिंदेवाही, नागभीड, तळोधी, नवरगाव वगैरे लहानमोठीं बरींच गावें आहेत.

होमरूलची चळवळ सुरू झाल्यानंतर ब्रह्मपुरी येथील कुणबी समाजाचे पुढारी महाजन हे राजकीय चळवळींत लक्ष घालीत होते. चांद्याला सन १९१८ सालीं दे. भ. खाडिलकर यांचे अध्यक्षतेखालीं चांदा जिल्हा परिषद झाली. महाजन यांना एका भाषणाबद्दल शिक्षा झाली होती. सन १९३० सालापर्यंत या तालुक्यात विशेष अशी चळवळ झाली नाहीं.

उमरेडला ब्रह्मपुरी गडंगांतून दारू जात असल्यामुळें येथील गडंगांवर पिकेटिंग केल्याशिवाय उमरेडचें दारू गुत्त्यावरील पिकेटिंग यशस्वी होणार नाहीं म्हणून नागपूरचे दे० तिजारे व लोहकरे वकील जुलै १९३० मध्यें ब्रम्हपुरीला आले. त्या वेळीं त्यांना ब्रम्हपुरीला उतरायला देखील जागा मिळूं शकली नाहीं. पुढें जगन्नाथराव धनपूरकर, बाबूराव भट, वन्हाडपांडे वगैरे कार्यकर्त्यांनीं केलेल्या चळवळींमुळें एकहि ठेकेदार गडंगांवर जाऊं शकेना. याचा परिणाम म्हणून ११ स्वयंसेवकांना अटक करण्यांत आली परंतु पुराव्याच्या अभावीं खटला न करतां पोलिसांनीं ह्या सर्वांना सोडून दिलें.

ता. ८–८–३०ला येथून १० मैलावर असलेल्या 'ए' क्लास कूपमध्यें बाबूराव वन्हाडपांडे याचे नेतृत्वाखालीं ५ स्वयंसेवकांनीं गवत कापून कायदेभंग केला. ह्या सर्वांना अटक होऊन प्रत्येकी ५ महिन्यांची सजा देण्यात आली.

ता. २४-८-३० च्या सामुदायिक जंगलसत्याग्रहांत जगन्नाथराव मनपूरकर व बाबूराव भट यांनीं पुढारीपण घेऊन इतर लोकांबरोबर जंगलचा कायदा तोडला. ह्यांस कैद होऊन जेलची व दंडाची शिक्षा ठोठावण्यांत आली.

ह्या सर्व स्थानिक कार्यकर्त्यांच्या कैदेनंतर ब्रह्मपुरीला कांहींही कार्य होऊं शकलें नाहीं.

कांग्रेस उमेदवार वॅ. अभ्यंकर यांचा विजय व्हावा म्हणून डॉ. खाईकर, मारोतराव कन्नमवार, जगदीशराव साळवे यांनीं ब्रम्हपुरीस यशस्वी प्रचार केला.



## कांग्रेस रुग्णालय.

१९३०-३१ च्या सत्याग्रह आंदोलनांत डॉ. सोनक यांच्या परिश्रमानें स्थापन झालेल्या कांग्रेस रुग्णालय व स्वस्तिक शुश्रूषा पथकानें स्थानिक डाक्टरांच्या सहकार्यानें उत्कृष्ट काम केलें. डॅा. परांजपे यांच्या आधिपत्याखालीं डॉ. दळवी, डॉ. हरदास, डॉ. गयाप्रसाद, डॉ. देशमुख डॉ. प्रधान, डॉ. देव, डॉ. कुळकुर्णी वगैरेंनीं अडचण सोसून वेळीं अवेळीं संस्थेला प्रशंसनीय मदत केली.

१९३२ च्या जानेवारींत दुसऱ्या युद्धाचे सुरुवातीस सरकारच्या दोषारोपास पात्र होऊन एकदम सर्व संस्था गारद होऊं नये या धोरणानें संस्थेची कार्यकारी समिति फक्त अध्यक्ष डॉ. ल. वा. परांजपे व सेक्रेटरी डॅा. सोनक इतकीच मर्यादित असावी, हा ठराव ९ जानेवारीच्या सभेत निश्चित करण्यांत आला. हे जर सरकारच्या अवकृपेस बळी पडलें तर

त्यांची जागा दुसऱ्या दोघांनीं भरून काढावी हेंही निश्चित झालें. लवकरच कॉटन मार्केट मधील चाळींत एक दवाखाना उघडण्यांत आला. या रुग्णालयांतून स्वयंसेवक व त्यांचे नातलग व इतर गरीब मिळून १००० इसमांना उपचार करण्यांत आला.

१९३२ मे मध्यें इतवारी चौकांत भरलेल्या हिंदी, मराठी व वऱ्हाड प्रान्ताच्या संयुक्त परिषदेचे वेळीं याही पथकाची कसून तलाशी घेण्यांत आली, परंतु आक्षेपार्ह असें कांहीं सांपडलें नाहीं, कांहीं दिवसांनीं रुग्णालयावर पोलिसांनीं झडप घातली व व्यवस्थापक देशपांडे यांस अटक केली या वेळीं कागदपत्रही जप्त करण्यांत आले.

फंडाभावीं पुढें कांग्रेस रुग्णालय १५ दिवस बंद राहिलें पण डॉ खरे यांनीं दवाखान्यांत मोफत औषधें पुरविण्याचें आश्वासन दिल्यामुळें पुनः हें रुग्णालय सुरू झालें. या वर्षी ७०० इसमांस औषधोपचार करण्यांत आला. अम्बुलन्स मोटार नसल्यामुळें डॉ. सोनक यांनीं आपली गाडी विनामोबदल्यानें वापरण्यास दिल्यामुळें ही उणीव भरून निघाली.



# अहिंसा व असहकार

१० मार्च १९२० रोजीं म. गांधींनीं जें जाहीर पत्रक काढलें त्यांत त्यांनीं आपल्या कल्पनांचा व असहकारितेच्या चळवळींतील आपल्या योजनेचा समावेश केला होता. हें जाहीर पत्रक पुढीलप्रमाणें होतें–

" आपल्या मागण्या मान्य करण्यांत आल्या नाहींत तर आपल्याला काय करतां येईल याबद्दल दोन शब्द मी सांगणार आहे. युद्ध करणें, मग तें उघड असो या गुप्त असो, हा एक रानटी प्रकार आहे, हा उपाय अव्यवहार्य आहे. म्हणून त्यासंबंधानें विचारही करतां कामा नये; शिवाय हा उपाय नेहमींच अहितकारक असतो. दुसऱ्या उपायांनींही आपण आपल्या न्याय्य मागण्या संपादन करूं शकतों, ही गोष्ट मी प्रत्येकाला पटवूं शकलों तर वरील उपाय योजण्याचें कारणच पडणार नाहीं. हिंसेचा आपण केव्हांहि अवलंब करणार नाहीं असें व्रत जी व्यक्ति किंवा जें राष्ट्र घेईल ती व्यक्ति किंवा तें राष्ट्र एवढी मोठी शक्ति निर्माण करील कीं, तिच्यापुढें कोणीही टिकाव धरूं शकणार नाहीं. पण हिंसेच्या मार्गाबद्दल माझें आज असें म्हणणें आहे कीं उपयुक्ततेच्या दृष्टीनें विचार केला तरी तो मार्ग अगदीं निष्फळ आहे. या परिस्थितींत असहकारिता हा एकच उपाय आपल्याला शिल्लक राहिला आहे. जेव्हां तो हिंसेच्या स्पर्शानें दूषित झालेला नसतो तेव्हां हा उपाय अत्यंत शुद्ध व परिणामकारक असतो. ज्या वेळीं सहकार्य करणें हें अधःपाताचें द्योतक ठरतें, सहकार्य केल्यानें आपण ज्या धार्मिक भावना मनांत बाळगल्या त्यांच्यावर आघात होतो, व तसें करणें हें अपमानास्पदही आहे असें आढळून येतें त्या वेळीं असहकार करणें हेंच कर्तव्य ठरतें. आपले हक्क अन्यायानें दडपून घेतले जात आहेत,

दिसत असतांना आम्ही तें मुकाट्यानें सहन करावें अशी अपेक्षा इंग्लंडही करूं शकणार नाहीं. आणि हा हक्कांच्या अपहाराचा प्रश्न प्रजेला जगण्यामरण्याइतका महत्त्वाचा वाटतो. म्हणून समाजाच्या वरच्या थरांतील लोकांनीं व खालच्या थरांतील लोकांनींही या उपायाचा अवलंब करावा...... जे लोक असहकारितेचा अवलंब करणार नाहींत त्यांच्यावर बहिष्कार टाकावा, या गोष्टीलाहि मी संमती देऊं शकत नाहीं. असहकार ही स्वयंस्फूर्तीनें करण्याची गोष्ट आहे. लोकांच्या भावना किती उद्दीप्त झाल्या आहेत व त्यांच्यात किती असंतोष पसरला आहे हें दाखविण्याचा हा एक मार्ग आहे. लष्करांतील शिपायांनीं आपली नोकरी करण्याचें नाकारावें असा त्यांना सल्ला देणें हें अप्रासंगिक होईल तो अगदीं शेवटचा उपाय आहे; पहिला उपाय नव्हे. ज्या वेळीं व्हाइसराय स्टेट सेक्रेटरी व मुख्य प्रधान आमचें म्हणणें ऐकून घेणार नाहींत, त्या वेळीं या उपायाचा अवलंब करणें हें हक्कानेंच प्राप्त होईल. शिवाय असहकारितेचा प्रत्येक उपाय योजण्यापूर्वी आपण पुष्कळ विचार करणें जरूर आहे. अत्यंत कठीण प्रसंगीं सुद्धां आपल्याला आत्मसंयमन करतां येईल अशा दृष्टीनें आपण धीरे धीरे हा मार्ग आक्रमिला पाहिजे."



# भाग पांचवा



## प्रकरण पहिलें.



### कॉंग्रेसची पन्नास वर्षांतील उत्क्रांति

अनेक झऱ्यांपैकीं एखाद्या झऱ्याच्याच नशिबीं नदीचें स्वरूप मिळावें असें असतें आणि अनेक नद्यांपैकीं मोजक्या नद्यांच्या नशिबीं समुद्राची भेट लिहिली असते; तसेंच पन्नास वर्षांपूर्वीपासून निघालेल्या अनेक राजकारणी संस्थांपैकीं कांग्रेसलाच सतत टिकून राहण्याचें भाग्य लाधावें हा योगायोग आहे. पण एकदां हें सुदैव लाधल्यानंतर राजकारणाच्या या प्रचंड प्रवाहाला भिन्न पक्षांचे लहानगे प्रवाह येऊन मिळावे हें अपरिहार्य आहे.

कांग्रेस सुरू झाल्यापासून तिच्या अखिल भारतीय शाखेची उत्क्रांति कशी होत गेली याचें सविस्तर वर्णन करण्याची जबाबदारी अखिल भारतीय कांग्रेसच्या इतिहासलेखकावर आहे. पण कोणत्याही प्रांतांतील कांग्रेसचा इतिहास हा अखिल भारतीय चळवळीचें कमीअधिक स्पष्ट प्रतिबिंबच राहणार! सबब, आमच्या प्रांतांतील कांग्रेसची उत्क्रांति वर्णन करतांना अखिल भारतीय कांग्रेसच्या उत्क्रांतीचीही यानसाग पुरेशी कल्पना येईल. हिंदी असंतोषाच्या वाफेचा कोंडमारा होऊन स्फोट होऊं नये म्हणून तिला मन प्रदर्शनाचा वाव करून द्यावा या दूरदर्शी धोरणानें काहीं इंग्रज मुत्सद्द्यांच्याच प्रेरणेनें निघालेली कांग्रेस सुरवातीला अर्जविनंत्यारूप किंबहुना इंग्रजी राज्यशासनावर विश्वास ठेवणारी होती. नंतर तिला ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य हवेसें वाटूं लागलें. आणि आज ती निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार करीत आहे. इंग्लंडचा संबंध अपरिहार्य व देवदत्त मानण्यापासून इंग्रजी राज्यतंत्र सुधारणें शक्य नसेल तर तें मोडून संपूर्ण स्वातंत्र्याचे अधिकार घ्यावे असें वाटण्यापर्यंतची कांग्रेसची अवघ्या पन्नास वर्षांत मजल

मारली आहे, हें अखिल भारतीय काँग्रेसच्या पन्नास वर्षांतील उत्क्रांतीचें थोडक्यांत सार आहे.

निर्भेळ स्वातंत्र्याचें ध्येय आपण उशीरां मान्य केलें असलें तरी तें अधिक स्वाभाविक आहे. साम्राज्यांतर्गत स्वराज्याची कल्पना सुशिक्षितांची आहे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर नव्या शिक्षणामुळें आमच्यांत स्वदेशप्रेम व स्वातंत्र्य या कल्पना पुनः उद्भवल्या हें खरें असलें तरी आमची मूलभूत धमक व स्वावलंबन नव्या शिक्षणामुळें लोपल्यासारखें झालें. देशांतील अशिक्षित जनतेला निर्भेळ स्वातंत्र्य किंवा पारतंत्र्य या दोनच कल्पना स्पष्टपणें शक्य आहेत. साम्राज्यांतर्गत स्वराज्याचें गौडबंगाल त्यांना कधींच उमजलें नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. सुशिक्षित अशिक्षितांतील या फरकाबरोबरच आणखीही एक महत्त्वाचा फरक लक्षांत घेण्यासारखा आहे. पाश्चात्य संस्कृतींत मुरल्याशिवाय पाश्चात्य राज्यतंत्र आत्मसात् करतां येणार नाहीं अशी सुशिक्षितांची पक्की भावना असल्यामुळें सामाजिक सुधारणांचे बाबतींत त्यांची वृत्ति अत्यंत जहाल असे; उलट अशिक्षित लोक इंग्रजी संस्कृति मान्य केल्यास आपल्या राजकीय पारतंत्र्याला संस्कृतीच्या पारतंत्र्याची जास्त भर पडेल अशा समजानें व पूर्वसंस्कृतीच्या अभिमानानें प्रेरित होऊन सुधारणांचे बाबतींत ते स्थितिवादी अर्थात् मवाळ धोरण स्वीकारीत; पण या उलट सुलट मवाळ–जहालपणाचें कारण मात्र एकच आहे.

सुशिक्षितांच्या पद्धतीनें नागपुरास राजकीय चळवळ करणाऱ्या संस्था गोरक्षण व लोकसभा यांच्या रूपानें १८८६ सालीं प्रथम स्थापन झाल्या व काँग्रेसला प्रतिनिधि सुद्धां जाऊं लागले. इंग्रजी शिक्षण व विचारसरणीचा प्रचार या प्रांतांत उशीरां झाला तरी काँग्रेसच्या स्थापनेच्या दुसऱ्याच वर्षापासून म्हणजे पहिल्याच प्रतिनिधि-काँग्रेसपासून नागपूर प्रान्तानें तिच्या चळवळींत भाग घेण्यास सुरवात केली.

१८९१ सालीं काँग्रेसची ७ वी बैठक नागपूरला भरली. नागपूरला ज्या ज्या वेळीं काँग्रेसचीं अधिवेशनें झालीं त्या त्या वेळीं काँग्रेसच्या धोरणाशीं जिव्हाळ्याचा संबंध असलेल्या राष्ट्रीय महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार झाला आहे. हा निव्वळ योगायोग असला तरी नागपूर प्रान्ताच्या इतिहासाच्या दृष्टीनें या गोष्टीला महत्त्व आहे.

जंगलविषयक कायद्यांचा जुलमी अंमल नाहींसा करण्याची विनंति करणारा ठरावही पहिल्यानें नागपूरच्या बैठकींतच पास झाला हा योगायोग मोठा गमतीचा आहे.

१९०६ सालच्या पूर्वीच कॉंग्रेसमध्यें दोन पक्ष उत्पन्न होण्याचीं पूर्वचिन्हें स्पष्टपणें दिसूं लागलीं होतीं. सरकाराभिमुख चळवळीला कंटाळलेला एक नवीन राष्ट्रीय पक्ष बंगालच्या फाळणीनंतर लवकरच अस्तित्वांत आला. लाल, बाळ, पाल, व अरविंद हे या पक्षाचे अध्वर्यु होते. इतर प्रांतापेक्षां महाराष्ट्रांत व बंगाल्यात या पक्षाच्या अनुयायांची संख्या जास्त होती. कोणत्याही परिस्थितीचा देशाच्या राजकीय चळवळीकरितां फायदा घेण्याची टिळकांची असाधारण हातोटी ही बंगमहाराष्ट्रीय युति घडवून आणण्यास कारणभूत झाली. "असन्तोष हा प्रगतीचा जनक आहे" या सूत्राचा उच्चार बंगालचे अनभिषिक्त सम्राट सुरेन्द्रनाथ बानर्जी यांनी केला पण "हिंदुस्थानांतील प्रचंड असन्तोषाचे जनक" म्हणवून घेण्याचें भाग्य मात्र लोकमान्यांनांच लाभलें!

यानंतर नागपूर हा नवीन राष्ट्रीय पक्षाचा बालेकिल्ला मानला जाऊं लागला. १९०५-०६ पर्यन्त दरबारी चळवळ करणाऱ्या प्रागतिकांना जो प्रान्त पूर्णपणें आपल्या मुठींत असल्याबद्दल अभिमान वाटत होता तोच नागपूर प्रान्त बंगालच्या फाळणीनंतर राष्ट्रीय पक्षाचा बालेकिल्ला झाला. बऱ्याच उशीरां इंग्रजी अमलाखालीं आलेल्या या बोलूनचालून मागासलेल्या प्रान्ताच्या मानी स्वभावाला दरबारी पद्धतीचें पांगुळगाड्याचें राजकारण पसन्त नव्हतें हेंच याचें कारण होय. प्रागतिकांचें राजकारण येथें फार दिवस तगलें नाहीं हें उघड आहे.

१९०६ सालच्या कलकत्ता कांग्रेसमध्यें जहाल पक्षाची सरशी झाली असें जरी म्हणतां आलें नाहीं तरी त्या पक्षाचा विरस झाला नाहीं एवढें खास. तोंपर्यंत प्रागतिकांना असें वाटत होतें कीं नागपूर प्रान्तात या नवीन पक्षाचा स्पर्श झाला नसल्यामुळें कॉंग्रेस भरविण्यास नागपूर हें सुरक्षित ठिकाण आहे. उलटपक्षीं ज्यांना नवीन पक्षाचे आवडते पुढारी लोकमान्य टिळक हेच अध्यक्ष हवे होते त्या डॉ. मुंजे प्रभृतींनांही या प्रान्तांत आपलेंच बल अधिक आहे अशी खात्री वाटत होती. दोन्ही पक्षांनीं आपलें बलाबल अजमावून पाहण्याचें ठरविलें व परिणाम व्हावयाचा तोच झाला! जहाल पक्ष प्रबल ठरला.

वरीलप्रमाणें जरी या प्रान्तात जहाल राजकारणाचें प्राबल्य होतें तरी प्रत्यक्ष कॉंग्रेस व इतर संस्थांत मात्र प्रागतिक पक्ष व बलवान होता. याचें कारण मवाळपक्षाच्या मार्गावर लोकांचा विश्वास होता हें नसून जहालपक्षानें कॉंग्रेसशी फटकून वागण्याचा केलेला निश्चय होय. कॉंग्रेसपासून अलिप्त रहाण्याचें धोरण बंगाल्यांतील सुप्रसिद्ध देशभक्त पं. मोतीलाल घोषप्रभृति पुढाऱ्यांना व महाराष्ट्रांतील श्री. केळकर, महादेव राजाराम बोडस इत्यादि पुढाऱ्यांना मान्य नव्हतें. नागपूर प्रांतांतील जहाल पुढारी मात्र कॉंग्रेसच्या ध्येयावर सही करण्यास तयार नव्हते व राष्ट्रीय पक्षानें आपला स्वतंत्र सुभा उभारावा असेंच त्यांचें मत होतें. १९१५ पर्यन्त तरी या प्रान्तात व सर्वच हिन्दुस्थानांत कॉंग्रेसच्या राजकारणाची सूत्रें प्रागतिक पक्षाच्याच हातीं होतीं.

१९१५ च्या सुमारास लोकमान्यांनीं होमरूल लीगची चळवळ सुरू केली त्या वेळीं नागपूर प्रान्तानें त्यांना आपल्या परंपरेला साजेल असेंच मदत केली. १९०७ च्या सुमारास स्थापन झालेले कै. दादासाहेब खापर्डे, डॉ. मुंजे प्रभृतींचें राष्ट्रीयमंडळ या वेळीं अत्यंत सुसंघटित झालें होतें. १९०७ सालीं या मंडळानें सबंध प्रान्तांत प्रचंड लोकजागृतीचें कार्य केलें. कै. श्री. अच्युतराव कोल्हटकर यांचेवर झालेला राजद्रोहाचा खटला या प्रान्तातील अशा प्रकारचा पहिलाच खटला होय. १९१६ सालच्या लखनौ कॉंग्रेसमध्यें जहाल पक्ष कॉंग्रेसला मिळाल्यानंतर या प्रान्तांत जहाल पक्षाची सत्ता अगदीं पूर्णपणें प्रस्थापित झाली. होमरूलच्याविरुद्धहि कै. दे. भ. नारायणराव वैद्य इ. कांहीं देशभक्तांवर राजद्रोहाचे खटले भरले गेले! होमरूलच्या नादानें प्रान्ताचा कोनाकोपरा अगदीं दुमदुमून गेला होता. नागपूरनें 'महाराष्ट्र' लोकप्रियतेच्या शिखरावर पोंचलें होतें. १९०८ पासून १९२० पर्यन्तचा काळ हा या प्रान्तांतील राष्ट्रीय मंडळाच्या कर्तबगारीचा उज्ज्वल काळ होय.

१९२० च्या ऑगस्टमध्यें लोकमान्य दिवंगत झाले व असहकारितेच्या धोरणाचा जन्म झाला. लोकमान्य निवर्तले तरी त्यांचा पक्ष अत्यन्त सुसंघटित व बलवान होता. त्यांच्या कर्तबगारीबद्दल, त्यागाबद्दल, व व्यवहारांतील पण ओजस्वी तत्त्वज्ञानाबद्दल सबंध महाराष्ट्राला आदर होता. असहकारितेचें तत्त्वज्ञान अत्यन्तिक

व विजातीय आहे असें या पक्षांतील कांहीं पुढाऱ्यांच्या मनानें घेतलें व कलकत्ता येथील खास कॉंग्रेसमध्यें ( सप्टें. १९२० ) असहकारितेच्या ठरावाला एकजुटीनें विरोध करण्याचा त्यांनीं चंग बांधला व त्याप्रमाणें कलकत्त्याला जाऊन विरोध केलाही.

१९२० च्या नाताळांतील नागपूरची कॉंग्रेस अनेक दृष्टींनीं अपूर्व झाली. राष्ट्रपुरुषानें कर्म करण्याकरिता धारण केलेलें विराट शरीर म्हणजेच कॉंग्रेस ही गोष्ट लोकांच्या प्रत्ययास आली. एवढी मोठी कॉंग्रेस त्यापूर्वी व त्यानंतर कधींही झाली नाहीं. असहकारितेचें थें लचूं नये म्हणून खटपट करण्याच्या बुद्धीनें ज्यांनीं कलकत्त्यापर्यन्त सैयान बांधलें त्यांच्याच शहरांत असहकारितेच्या तत्त्वाचा विजय झाला! दास, पाल व लाल यांनीं म. गांधींना पूर्णपणें मदत करण्याचा निश्चय जाहीर केला. कॉंग्रेसचें धोरण निश्चित होऊन त्याला बंगालच्या पूर्ण पाठिंबा मिळाला ही गोष्ट हिन्दी राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाची घडून आली. कॉंग्रेसचें ध्येय उज्वलतर बनविणारा ठरावही नागपूरलाच पास झाला. आणि तोंपर्यंत वसाहतींच्या-दर्जाच्या ' धवल स्वराज्या ' ची उपासना करणारी कॉंग्रेस आतां "शुद्ध स्वराज्या" ची पूजक बनली. कॉंग्रेसच्या घटनेंतही याच बैठकींत आमुलाग्र बदल होऊन ती सुव्यसुटीत व प्रातिनिधिक करण्यांत आली. सारांश, कॉंग्रेसचें ध्येय, धोरण व घटना यांत नागपूरच्या बैठकींत क्रान्तिकारक बदल झाला.

१९२० पर्यन्त या प्रान्तांतील राजकारणाची सूत्रें हलविणारे पुढारी जरी नवीन धोरणाच्या विरुद्ध असले तरी असहकारितेच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यांत हा प्रान्त मुळींच मागें राहिला नाहीं. कौन्सिलांचा, कोर्टांचा, शाळांचा व पदव्यांचा बहिष्कार यशस्वी करण्याकरिता त्यानें प्रयत्नांची शिकस्त केली! जुन्या राष्ट्रीय पक्षाच्या वकिलांनीं सुद्धां वकीली सोडली व कौन्सिलांवर बहिष्कार घातला. कौन्सिलच्या बहिष्काराला या प्रान्तातर्फे यश दुसऱ्या कोणत्याही प्रान्ताला आलें नाहीं. या काळांत जुने पुढारी मागें पडून नागपूर कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष दे. भ. शेट जमनालाल बजाज, श्री. बाबासाहेब देशमुख पं. सुन्दरलाल, महात्मा भगवानदीन वै. गणपतराव टिकेकर, कर्मवीर पाठक, चतुर्भुज भाई, पूनमचंद रांका इ. पुढाऱ्यांची कारकीर्द सुरू झाली.

१९२३ सालीं झालेला झेंडा सत्याग्रह हा हिन्दुस्थानांतील पहिलाच यशस्वी अखिलभारतीय स्वरूपाचा सामुदायिक सत्याग्रह होता व तो सुरू करण्याचा मान सुदैवानें नागपूरलाच मिळाला !

१९२३ सालींच स्वराज्यपक्षाची स्थापना झाली. या प्रान्तांतील जुना राष्ट्रीय पक्ष आधींपासूनच बहिष्कारत्रयीच्या विरुद्ध होता. त्यांतल्यात्यांत कौन्सिल बहिष्कार तर त्याला अगदींच अमान्य होता. त्यामुळें त्यापक्षानें स्वराज्यपक्षाच्या संस्थापनेला मदत केली व डॉ. मुंजे हे प्रान्तिक शाखेचे अध्यक्ष झाले. स्वराज्य पक्षाच्या सरोस विरोधाच्या कार्यक्रमालाही या प्रान्ताइतकें यश कोठेंच आलें नाहीं. १९२० सालीं कौन्सिल बहिष्काराच्यावेळीं कै. पं. मोतीलाल नेहरू यांनीं "शाबास मध्यप्रान्ता !" म्हणून या प्रांताचें अभिनंदन केलें होतें. त्याच कै. पं. नेहरूंनीं १९२३ सालीं जास्तींतजास्त जागा काबीज केल्याबद्दल आमची पुन्हां पाठ थोपटली. "कौन्सिलें मोडण्याच्या" कार्यक्रमाला या प्रान्तांत अपूर्व यश आलें ! स्वराज्यपक्षाच्या विलक्षण शक्तीचे अद्‌भुत खेळ ज्याप्रमाणें या प्रान्तांत दिसून आले त्याचप्रमाणें त्याच्या क्षयाची कारणेंही पहिल्यानें याच प्रान्तांत उघडकीस आलीं. श्री. श्री. व. ताम्यांच्या फितुरीनें स्वराज्यपक्षाच्या किल्ल्याला सुरुंग लावला. स्वराज्यपक्षाची कीर्ति दिगंत पसरवणारीं सत्कृत्यें ज्या आमच्या प्रान्तांत झालीं त्याच प्रान्तांत त्याच्या नांवाला कायम कलंक लावणाऱ्या घटनाही दुर्दैवानें झाल्या.

मात्र यांतूनही चांगलें निघालेंच. राष्ट्रीय मंडळाचीं दोन शकलें होऊन कै. दादासाहेब खापर्डे, बॅ. अभ्यंकर व डॉ. खरे या तिघांच्या तेजस्वी व तत्वनिष्ठ शाखेनें भगीरथ प्रयत्न करून नागपूरच्या राजकारणाला लागणारी कीड थोपविली. डॉ. खऱ्यांना त्या वेळीं नागपुरास येऊन थोडीच वर्षे झाली होतीं पण यावेळेपावेतों ते बॅ. अभ्यंकरांचे अत्यंत विश्वसनीय सहाय्यक झाले होते; किंबहुना डॉ. खऱ्यांच्या पाठिंब्यामुळेंच बॅ. अभ्यंकर राष्ट्रीय मंडळांतून फुटून निघण्याचा त्यावेळीं निश्चय करूं शकले. तेव्हांपासून येथपर्यंत बॅ. अभ्यंकरांना डॉ. खऱ्यांचें तसेंच साहाय्य राहिलें व आज तर ते बॅरिस्टरांच्या मागें प्रांतिक काँग्रेस कमिटीचे कर्णधार बनल्याचें सर्वांना माहीत आहेच.

१९२६ ते आजपर्यंत काँग्रेस कमिट्यांचें कार्यावर व राष्ट्रीय चळवळींवर अभ्यंकरांच्या व्यक्तित्वाची छाप स्पष्टपणें उमटली आहे. मध्यंतरीं १९२७ ते १९२८-२९ पर्यन्तचा काळ हा सेनापति आवारींच्या उत्कर्षाचा काळ होऊन गेला. १९२७ सालीं नागपूरला " शस्त्रसत्याग्रह " झाला; पण हा सत्याग्रह सत्याग्रहाच्या मूलभूत सिद्धान्तांविरुद्ध असल्यामुळे म. गांधींनीं त्याबद्दल आपली नापसन्ती अत्यन्त असंदिग्ध भाषेंत व्यक्त केली. त्यानंतर तो थांबला. श्री. रामभाऊ रुईकर, ग. दि. ढवळे, तिजारे, बी. सांबमूर्ति, शेठ पूनमचंदरांका हे जनरल आवारींचे मुख्य सहाय्यक होते.

यानंतरचा काळ म्हणजे १९३० व १९३२ च्या सत्याग्रहाचा काळ होय. १९३० ते १९३५ पर्यंतचा काळ म्हणजे अभ्यंकरांच्या परमोत्कर्षाचा काळ होता. या काळांत नागपूर प्रान्तानें जें नाव गाजविलें त्याची आठवण इतकी ताजी आहे कीं त्याचें वर्णन करण्याचें कारण नाहीं.

आपला प्रान्त हा मर्द मराठ्यांचा प्रान्त आहे असा त्याचा लौकिक आहे. त्याच्या नांवाला शोभण्यासारखीच त्याची परंपरा आहे आणि त्या परंपरेला अनुरूप असाच पराक्रम १९०७, १९१७, १९२०, १९२३, १९२७, व १९३०–१९३५ सालीं त्यानें केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. काँग्रेसची सेवा करण्यांत, तिची प्रतिष्ठा वाढविण्यांत व तिच्या कर्तृत्वांत भर घालण्यांत या प्रान्तानें आपल्या शक्तीप्रमाणें शिकस्तीचा प्रयत्न केला असें विनयपूर्ण व क्षम्य अभिमानानें खचित म्हणतां येईल.

# प्रकरण २ रें.



## राष्ट्रीय शिक्षण

आमच्या अमलाखालील लोकांच्या "मनांचें संपूर्ण इंग्रजीकरण" हा या देशांतील सरकारी शिक्षणपद्धतीचा प्रत्यक्ष अगर प्रकट हेतु होता. असें असलें तरी या शिक्षणापासून सुरवातीस पुष्कळ फायदा झाला. पण अराष्ट्रीय व निर्हेतुक शिक्षण पद्धतीचे दुष्परिणाम लवकरच दृष्टोत्पत्तीस येऊं लागले व राष्ट्रीयत्वाच्या भावनेची जोपासना करण्याकरितां निराळ्या प्रकारच्या शिक्षणाची आवश्यकता भासूं लागली.

सुरवातीला निरनिराळ्या प्रांतांतील स्वदेशाभिमानी पुढाऱ्यांनीं सरकारी धर्तीचें शिक्षण देणाऱ्या निमसरकारी शाळा स्थापिल्या. पण शिक्षण पद्धतींतही बदल केल्यावांचून राष्ट्रीयत्वाच्या भावनेचा विकास होणें शक्य नाहीं असें दिसून आल्यामुळें तारीख ११ मार्च १९०६ रोजीं यंत्रशास्त्राला शिक्षणासही स्वदेशीचें तत्व लागू करणारी, राष्ट्रीयपद्धतीनें व राष्ट्रीयनियंत्रणाखालीं शिक्षण देण्याचा प्रयत्न करणारी बिनसरकारी बंगीय राष्ट्रीय परिषद प्रथम स्थापन झाली.

बंगालच्या फाळणीच्याविरुद्ध देशांत राष्ट्रीयत्वाच्या भावनेची व चळवळीची जी एक प्रचंड लाट उसळली तिच्यांतूनच स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ही तीन अमूल्य रत्नें बाहेर पडलीं. राष्ट्रीय शिक्षणाचा पहिला पद्धतशीर व चळवळीचा प्रयोग निरनिराळ्या प्रांतांत याच सुमारास झाला. महाराष्ट्रांतही गु. कै. अण्णासाहेब विजापूरकर यांनीं ११ जून १९०६ रोजीं समर्थ विद्यालयाची स्थापना करून राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम केला.

यांतील राष्ट्रीय शिक्षणाचा प्रत्यक्ष प्रयोग झाला नाहीं पण देशांतील सर्वांना चळवळीचा परिणाम विद्यार्थ्यांवरही झाल्याशिवाय राहिला नाहीं. स्वदेशीच्या

प्रतिज्ञेवर सह्या मिळविणें वंदेमातरम्चा जयघोष करणें राष्ट्रीय पदें गाणें, सभा व मिरवणूकींत भाग घेणें इत्यादि सर्व कामे इतर प्रांतांतील विद्यार्थ्यांप्रमाणेंच नागपुरातील विद्यार्थ्यांही मोठ्या हौसेनें करूं लागले. १९०७ सालीं विद्यार्थ्यांनीं सार्वजनिक चळवळींत पडूं नये असा सरकारी हुकूम निघाला व शाळा कॉलेज्यांचे अधिकारी त्या हुकमाची कसोशीनें अम्मल बजावणी करूं लागले. त्यामुळें विद्यार्थ्यांना दुष्ट अवसान आलें. श्रीयुत पांडुरंगपंत खानखोजे व रामलाल वाजपेयी इत्यादि विद्यार्थ्यांच्या प्रयत्नानें शिवाजीसमाज, स्वदेशभक्त मंडळ वगैरे संस्था स्थापन होऊन आर्यबांधिका नांवाचें एक स्वदेशी वस्तू-भांडार काढण्यांत आलें. यावेळीं विद्यार्थ्यांत सुरू झालेली ही चळवळ १९०८ सालीं लोकमान्यांच्या शिक्षेमुळें ज्यास्त जोरांत आली. यावेळीं ज्या विद्यार्थ्यांनीं पुढाकार घेतला त्यांत श्री. केशव बाळाराम हेडगेवार, कै. नारायणराव पंदरपरकर व विद्यार्थी मंडळाचे चिटणीस श्री. भवानी शंकर नियोगी यांची गणना केली पाहिजे. सिटी स्कूल व मॉरिस कॉलेज यांनीं या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतल्यामुळें शाळाधिकारी व व विद्यार्थी यांच्यांत एकप्रकारचें वितुष्ट आलें. याचा परिणाम असा झाला कीं, खेळाकरितां आकारण्यांत आलेली जादा फी देण्याचें नाकारलें हें निमित्त करून श्री. नारायण जगन्नाथ बढे (कै. दे. भ. बापूराव बढे) व रामभाऊ श्रोती यांस बडतर्फ करण्यांत आलें, व विद्यार्थ्यांनीं संप पुकारला. हा संप बरेच दिवस चालून अखेरीस कै. दामोदरपंत खरे व कै. बिपिन कृष्ण बोस यांच्या मध्यस्थीनें तो बंद झाला. सुरत कांग्रेसच्या पूर्वी व नंतर नुकत्याच स्थापन झालेल्या नवीन राष्ट्रीय पक्षाचे अध्वर्यू बाबू अरविंद घोष व बाबू शामसुंदर चक्रवर्ती यांनीं नागपूरास भेट दिली. त्यांच्या ओजस्वी भाषणांचा विद्यार्थ्यांच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. हेंच भाषण छापण्याबद्दल श्री. अच्युतराव कोल्हटकर यांना शिक्षा झाली होती. ही लाट १९०९ चे सुमारास ओसरली.

१९०९ नंतर देशांतील राजकीय चळवळीला ओहोटी लागली. ती १९१४ सालीं लो. टिळक सुटून येईपर्यंत तशीच होती.

लोकमान्य सुटून आल्यानंतर सर्वांना पुन्हां हुरूप वाटूं लागला. होमरूलचें वारें विद्यार्थ्यांच्या मनांत फिरून शिरलें.

१९१७ सालीं या प्रांतांत रिस्ले सर्क्युलरच्या जारीनें अंमल सुरू झाला. शिक्षक हेराचें काम करूं लागले. या सर्क्युलरानें कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थ्यांच्या बाबतींतही अपवाद केला नव्हता. त्यामुळें एकच खळबळ उडून गेली. ठिकठिकाणीं निरनिराळ्या संस्थांतील विद्यार्थ्यांच्या सभा भरूं लागल्या. नागपुरांतील विद्यार्थ्यांची एक विराट सभा होऊन विद्यार्थ्यांच्या हक्कांची पायमल्ली करणाऱ्या या जुल्मी सर्क्युलराला विरोध करण्याचा ठराव पास झाला. वरील सभेत स्थापन झालेल्या विद्यार्थी मंडळाचें अध्यक्षपद कै० ब्यारिस्टर अभ्यंकर यांस देण्यांत आलें व श्रीयुत वामन रामचंद्र धर्माधिकारी हे चिटणीस नेमले गेले. रिस्ले सर्क्युलरला विरोध करण्याकरितां या मंडळानें सबंध प्रांतभर प्रचंड चळवळ केली. विद्यार्थ्यांचा उत्साह व आवेश अवर्णनीय होता. मुसलमान विद्यार्थ्यांनांही चळवळींत भाग घेतला होता. विद्यार्थ्यांची चळवळ दडपून टाकण्याच्या इरादानें शिक्षण संस्थांच्या अधिकाऱ्यांनीं त्यांच्या पुढाऱ्यांना बडतर्फ केलें, तरी विद्यार्थी वर्ग यत्किंचितही डगमगला नाहीं. बडतर्फ केलेल्या विद्यार्थ्यांत मॉरिस कॉलेजचे धारकर, वझले व जे. एस्. देशपांडे व सिटीस्कूलचे श्री. गोपाळ मुकुंद हुद्दार इत्यादि प्रमुख होते. विशेष प्रामुख्यानें चळवळींत भाग घेणाऱ्या विद्यार्थ्यांत श्री. रामचंद्र जनार्दन गोखले, श्री. डी. भागवत व पुराणिक प्रभृति विद्यार्थ्यांची गणना होते. याच सुमारास काँग्रेस-संमेलन व होमरूलच्या दौऱ्याच्या निमित्तानें लोकमान्य टिळक या प्रांतांत आल्यामुळें विद्यार्थ्यांच्या उत्साहाला सीमा राहिली नाहीं. अधिकाऱ्यांनींही शासन करण्याच्या बुद्धीनें शाळा कॉलेजें तात्पुरतीं बंद केलीं. पुढें कांहीं महिन्यांनीं शिक्षण-संस्था पुन्हां सुरूं झाल्या व विद्यार्थ्यांवरील सगळे निर्बंध आपोआप त्याग गेले.

१९२० सालीं दुर्दैवानें लो. टिळक दिवंगत झाले त्यावेळीं नागपुरच्या विद्यार्थ्यांनीं तीन दिवसांचा हरताळ पाळून त्यांच्या विषयींची आपली अढळ श्रद्धा व्यक्त केली. राष्ट्रांत ज्या ज्या वेळीं राष्ट्रीय चळवळींची लाट उसळते त्यावेळीं विद्यार्थ्यांच्या चळवळीला भरती येते असा आज पर्यंतचा अनुभव आहे. त्याप्रमाणें १९२० सालीं कलकत्ता येथें भरलेल्या काँग्रेसच्या खास बैठकीनंतर पुन्हा विद्यार्थ्यांची चळवळ सुरू झाली. वरील खास काँग्रेसमध्यें बहिष्कार प्रस्तावाचा जो ठराव पास झाला त्यांतील शाळा कॉलेजांचा बहिष्कार अमलांत आणण्याकरितां

नागपूर येथें १९२० च्या नाताळांत होणाऱ्या अधिवेशनाच्यावेळीं एक अखिल भारतीय विद्यार्थी परिषद भरविण्याविषयीं नागपूर येथील विद्यार्थ्यांत चळवळ सुरू झाली. या परिषदेचे अध्यक्ष कै० दे० भ० लाला लजपतराय व स्वागताध्यक्ष श्री. रामचंद्र जनार्दन गोखले हे होते. ही परिषद फार यशस्वी झाली. सरकारी व निमसरकारी शाळा कॉलेजें सोडण्याचा ठराव प्रचंड बहुमताने पास झाला. जे विद्यार्थी आपआपल्या शिक्षण संस्थांवर बहिष्कार घालतील त्यांच्या शिक्षणाची सोय करण्यासाठीं शक्य तेथें राष्ट्रीयसंस्था स्थापन करण्या अशी शिफारस ठरावाच्या उत्तरार्धांत होती. या प्रांतातील सरकारी व निमसरकारी शाळा हा हा म्हणतां ओस पडल्या. आणि सबंध प्रांतात ४० वर राष्ट्रीय शाळा निघाल्या. यांत प्राथमिक शाळा, मिडल्स्कूलें व हायस्कूलें होतीं. शिवाय नागपूर येथे श्री० शिवदास कृष्ण बारलिंगे व त्रिंबक केशव लक्ष्मण दप्तरी यांच्या प्रयत्नाने एक कॅलेजही स्थापन झालें. पुढे लौकरच सदर कॉलेज नागपूर येथील टिळक विद्यालयाच्या हवालीं करण्यांत आलें. या प्रांतात राष्ट्रीय शिक्षणाचा पहिला महत्वाचा प्रयत्न याचवेळीं झाला.

परंतु या चळवळीला राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ हे नांव देण्यापेक्षां शैक्षणिक बहिष्काराच्या चळवळीनें नांव देणें अन्वर्थक होईल. कारण कीं, तिचा मुख्यभर सरकारी व निमसरकारी शाळांच्या बहिष्कारावरच होता. अर्थातच इतरत्र शिक्षणाची सोय व्हावी अगर न व्हावी. मागचा पुढचा कांहीएक विचार न करिता सरकारी शिक्षण संस्थांचा त्याग करण्यावरच भर देण्यांत आला. शैक्षणिक बहिष्कार हा बहिष्कार प्रयोगाचेंच एक महत्वाचें अंग असल्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाच्या विधायक बाजूला साहजिकच गौणत्व आलें. व देशाच्या एकंदर परिस्थितीचा विचार केला असतां तसें होणें अपरिहार्यच नव्हे तर आवश्यकही होतें. सारांश सरकारनिरपेक्ष शिक्षण हीच त्यावेळीं राष्ट्रीय शिक्षणाची सुटसुटीत व्याख्या करण्यांत आली. म्हणून मुख्यतः सरकारी सत्ता-मत्ता व मान्यता यांपासून पूर्णपणें स्वतंत्र अशा संस्था स्थापना करण्याचा प्रयत्न सबंध प्रांतभर झाला.

तारीख १८ नोव्हेंबर १९२० रोजीं तुमसर येथें श्री. आ. म. माकडे यांनीं स्थापन केलेलें 'टिळक राष्ट्रीय विद्यालय' ही या प्रांतातील पहिली राष्ट्रीय

शिक्षणसंस्था होय. ता. २-३-१९२१ रोजीं स्थापन झालेलें नागपूरचें टिळक विद्यालय ही विद्यार्थी व शिक्षकांच्या संख्येच्या दृष्टीनें सबंध हिंदुस्थानांत सर्वांत मोठी असहयोगी संस्था होती. श्री. दे. भ. शेट जमनालालजी बजाज हे शैक्षणिक बहिष्काराला प्रतिकूल नसले तरी राष्ट्रीय शाळा काढण्याला फारसे अनुकूल नव्हते तरी त्यांनीं नाहीं म्हणतां म्हणतां नागपूरचें टिळक विद्यालय व इतर राष्ट्रीय संस्थांना इतर सर्वांपेक्षा जास्त मदत सढळ हातानें केली. टिळक विद्यालयाच्या स्थापनेला त्यांचीही मदत झाली. ज्यांच्या वक्तृत्वानें प्रभावित होऊन नागपूरच्या विद्यार्थ्यांनीं आपआपल्या शिक्षण संस्थांवर बहिष्कार घातला त्या अलाहाबादच्या सुप्रसिद्ध पंडित सुंदरलालजींनीं महात्मा भगवानदीनजी यांच्या मदतीनें ही संस्था स्थापिली. सुरवातीला तिच्यांत सुमारें बाराशें विद्यार्थी व पन्नास शिक्षक होते. विद्यालयांच्या मुख्य दोन शाखा होत्या. शहर शाखा व धंतोली शाखा. याखेरीज एक उर्दू शाखाही होती. उर्दू शाखेच्या हायस्कूलांत सुमारें अडीचशें विद्यार्थी व सात शिक्षक होते. नागपूर प्रमाणेंच वरोडा, भंडारा इत्यादि अनेक ठिकाणीं स्थापन झालेल्या राष्ट्रीय शाळांत उर्दू शाखा होत्या. यावरून शैक्षणिक असहयोगाच्या चळवळींत मुसलमान विद्यार्थीही मागें राहिले नाहींत हें दिसून येतें. खुद्द नागपुरांत टिळक विद्यालयाखेरीज भेदूचे श्री. यादवराव देशमुख व श्री. मुरलीधर विष्णु ( मामा ) पुराणिक प्रभृति तरुणांच्या प्रयत्नानें संत केजाजी विद्यालय नांवाचें एक असहयोगी मिडल स्कूल काढण्यांत आलें. त्याचप्रमाणें इतवारींत कै० श्री. नारायणराव पंढरपूरकर व श्री. रामभाऊ गोखले यांनीं एक राष्ट्रीय मिडल स्कूल स्थापलें, व श्री पंढरपूरकर यांनीं मुलींच्या शिक्षणाची बिनसरकारी सोय करण्याच्या हेतूनें एक हिंदू मुलींची शाळा ( हल्लींच्या दादीबाई देशमुख हिंदु मुलींच्या शाळेची मूळ संस्था ) आणि श्री. ग. ग. निजारे मारकंडवार प्रभृतींनीं एक राष्ट्रीय कन्या शाळा स्थापन केली. प्रांतांत निरनिराळ्या ठिकाणीं स्थापन झालेल्या असहयोगी संस्थांत श्री. केशवराव यावल्कर, कृ. गो. ( मामा ) समाजिगवार, हरीभाऊ पत्तरकिले. श्री. ल. पांडरीगांडे. यांनीं १९२४ पर्यंत चालविलेली भंडारा येथील राष्ट्रीय शाळा शिक्षणाच्या दृष्टीनें बरेच वरच्या दर्जाची होती. सबंध प्रांतांत खालील प्रमाणें राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या असल्याचें आढळतें. नागपूर नगरः— २ हायस्कूलें, २ मिडलस्कूलें, १ बोर्डिंग,

विद्यार्थ्यांची संख्या १५००, नागपूर तालुकाः— बोरी १ शाळा विद्यार्थी १००. रामटेक तालुकाः— २ शाळा विद्यार्थी संख्या ८५. उमरेडः— १ शाळा विद्यार्थी संख्या ७५. काटोल तालुकाः— १ काटोल हायस्कूल १ कोंढाळी, विद्यार्थी संख्या ३००. सावनेर तालुकाः— १ सावनेर हायस्कूल, १ मोहपा, १ पाटणसावंगी, १ खापा, १ केळवद विद्यार्थी संख्या ३३०. वर्धा तालुकाः— वर्धा नगर येथे १९२४ पर्यंत राष्ट्रीय शाळा नव्हती. पुढे १९२४ साली मारवाडी विद्यालय राष्ट्रीय झाले व त्याचें रूपांतर राष्ट्रीय विद्यामंदिरांत झालें. १ नागझरी, १ सोनेगांव, आवाजी, १ कोळवण, १ अण्णाभिरापूर १ मुरडगांव, १ सिंदी १ सेल, १ हिंगणें मुलांची संख्या ३००, हिंगणघाट तालुका— १, हिंगणघाट नगर मुलांची संख्या १६०, हिंगणघाट तालुका १, गिरड मु संख्या ८०, वरोडा तालुकाः— २ वरोडा नगर, १ हायस्कूल, १ मिडलस्कूल, १ भिसी, १ चिंचघाट, भंडारा तालुकाः—६ भंडारा नगर, १ हायस्कूल, १ उर्दू स्कूल, १ प्रायमरी शाळा विद्यार्थी संख्या ४२५. (मोहाली १, सिहोरा १, तुमसर १, तिरोडा,) साकोली तालुकाः— ६ शाळा विद्यार्थी संख्या ३६१, गोंदिया तालुकाः— ८ शाळा विद्यार्थी संख्या ५१९ (भंडारा जिल्हा एकूण शाळा २० विद्यार्थी १३०५) याशिवाय नागपूर येथें महात्मा भगवानदीन यांनीं स्थापन केलेल्या असहयोग आश्रमांत प्रांतांतील जवळ जवळ २५० विद्यार्थी दाखल झाले व त्यांनीं प्रांतभर प्रचाराचें व रचनात्मक कार्य केलें.

वरील संस्थांचा जन्म असहयोगाच्या चळवळींतून झाला असल्यामुळें त्यांचें ध्येय व धोरण प्राधान्येंकरून शैक्षणीक नसून राजकीय होतें. प्रत्येक गांवांतील असहयोगी विद्यालय म्हणजे तेथील राजकारणाचे मुख्य केंद्र बनलें. सामान्य लोकांतील उत्साह व आवेश कमी झाल्यानंतर राष्ट्रीय चळवळीचा जोम व तेज कायम ठेवण्याचें महत् कार्य मुख्यतः राष्ट्रीय शाळांनींच केलें ही गोष्ट सर्वांना मान्य झालेली आहे.

बारडोली येथील तहकूबीच्या ठरावानंतर काँग्रेसच्या विधायक कार्यक्रमाकडे विशेष लक्ष देण्यांत आलें. व राष्ट्रीय शिक्षण संस्थाही आपआपलें आसन स्थिर करण्याच्या उद्योगास लागल्या. २८ एप्रिल १९२१ रोजीं कै. श्रीयुत गणपतरावजी

उपाय सुचविण्यासाठीं श्री. जाजुजी, विनोबाजी, कानेटकर, टिकेकर प्रभृतींची एक कमेटी मार्चच्या पहिल्या आठवड्यांत नेमली. सदरहू कमेटीनें सर्व प्रांतात दौरा करून राष्ट्रीय शाळांची पहाणी केली व आपला अहवाल आणि सूचना व योजने बरोबरच शिक्षणाच्या मूलभूत तत्वांचे विवेचन करून तीं तत्वें प्रांतातील प्रचलित परिस्थितींत अमलांत आणण्याचे उपाय सुचविणारा एक निबंधही सादर केला. कानेटकर कमिटीचा अहवाल राष्ट्रीय शिक्षणाच्या स्थित्यन्तराच्या दृष्टीनें वाचनीय आहे. कानेटकर कमिटीच्या दौऱ्याच्यावेळीं खालील राष्ट्रीय शाळा चालू होत्याः— १ नागपूर (शहर व धन्तोली शाखा) २ गोन्दिया, ३ तिरोडा, ४ तुमसर, ५ सिन्दी, ६ हिंगणघाट, ७ वरोडा, ८ वर्धा. या सर्व ठिकाणीं निरनिराळे सद्‌गृहस्थ राष्ट्रीय शाळांना मोठ्या आपुलकीच्या भावनेनें मदत करीत असत पण त्या सर्वांचीं नांवें उपलब्ध नाहींत.

नागपूर, तुमसर व गोन्दिया येथील विद्यालयें खेरीज करून प्रान्तांतील बहुतेक राष्ट्रीय संस्था १९२५ च्या सुमारास बन्द पडल्या. वर्धा येथील सत्यप्रकाशमाच्या कांहीं मंडळींनीं चालविलेलें राष्ट्रीय विद्यामन्दिरही पुढे बन्द करण्यांत आलें. व चालकांच्या पराकाष्टेच्या त्यागानें व अनुकरणीय चिकाटीनें चालत असलेली गोन्दियाची राष्ट्रीय शाळा १९३०-३२ च्या राष्ट्रीय चळवळींत दडपशाही मुळें बन्द पडली.

१९२२ सालीं सेनापति बापट यांनीं सुरू केलेल्या मुळशीपेट्याच्या सत्याग्रहांत नागपूर येथील टिळक विद्यालयांतील विद्यार्थ्यांनीं बराच भाग घेतला. सर्वत्र शिक्षक व विद्यार्थ्यांनीं सभा, मिरवणुकींत वगैरे भाग घेऊन आपली सहानुभूति दाखविली. श्री० माधवराव कानेटकर, तिजारे, खंडेश्वर, पटवर्धन, यशवन्तराव जोशी, दाते, हे शिक्षक व श्री० निळू दाते, चिनू केळकर, धामणकर, दळवी, वैद्य, र. वि. व दि. वि. क्षिरसागर हे विद्यार्थी आणि त्यांचप्रमाणें सन्त केजाजी विद्यालयाचे श्री० सु. वि (मामा) पुराणिक यांनीं मुळशीला जाऊन सत्याग्रहात भाग घेतला व त्यांना शिक्षा झाल्या. याशिवाय कांहीं विद्यार्थ्यांना पकडून सोडून देण्यांत आलें होतें.

मुळशीपेट्याच्या सत्याग्रहानन्तर या प्रान्तांत पुढें अखिल भारतीय चळवळीच्या रूपानें प्रसिद्धीस आलेला झेंडा सत्याग्रह सुरू झाला. या सत्याग्रहाला राष्ट्रीय शिक्षण संस्थांनीं सक्रीय सहानुभूति दाखविली. श्री० तिजारे, अंबुलकर या नागपूर टिळक विद्यालयांतील शिक्षकानीं आणि प्रान्तांतील इतर विद्यालयांतील कांहीं व्यक्तींनी जरी त्यांत प्रामुख्यानें भाग घेऊन शिक्षा भोगल्या तरी एकंदरीत राष्ट्रीय शिक्षणसंस्थांनीं या सत्याग्रहांत विशेष उत्साहानें प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं हें कबूल केलेंच पाहिजे. याचें मुख्य कारण यावेळची राष्ट्रीय शिक्षण संस्थांची अत्यन्त विपन्न स्थिति हेंच होय. यानंतरची जी कांहीं वर्षें गेली त्यामध्यें राजकीय चळवळीच्या दृष्टीनें उल्लेखनीय असें कांहींच घडलें नाहीं पण १९२८ साली सायमन बहिष्काराच्या चळवळीमुळें राष्ट्रीय संस्थांना पुन्हा अवसान आलें व सायमन-बहिष्काराच्या चळवळीनें यशाचें श्रेय त्यांनाच आहे हे उघड आहे.

याच सुमारास श्री० देशमुख एम्. एल्. जयवन्त व बैरामजी प्रभृति तरुणांच्या प्रयत्नानें या प्रांतात दे० भ० सुभाषबाबू यांच्या प्रोत्साहनानें 'युवकसंघा'च्या चळवळीला सुरवात झाली. श्री० रामभाऊ रुईकर हे प्रांतिक युवक संघाचे पहिले अध्यक्ष होते. या चळवळीमुळें विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं सार्वजनिक कार्यात पडण्याची हौस पुन्हां उत्पन्न झाली. परन्तु दुर्दैवानें युवकसंघांत तीव्र मतभेद उत्पन्न होऊन दोन तट पडले. एकापक्षानें दे० भ० सुभाषचंद्रबाबू यांच्या अध्यक्षतेखाली आपली परिषद भरविली. नंतर पं० जवाहरलाल नेहरू यांनी दोन्हीं पक्षाचें म्हणणें ऐकून आपला निवाडा दिला. त्याप्रमाणें युवकसंघाची पुन्हां निवडणूक होऊन श्री० नीळकंठ मुरार घटवाई हे अध्यक्ष झाले. या नवीन निवडणुकीनंतर श्रीमती सौ० कमलादेवी चट्टोपाध्याय यांच्या अध्यक्षतेखाली दुसरी 'युवक परिषद' झाली. वीर वामनराव जोशी हे तिचे स्वागताध्यक्ष होते.

मंडळाच्या विद्यमानें निघालेली तरुण व तरुणींची प्रचंड मिश्र मिरवणूक नागपूर च्या राजकीय इतिहासांत अपूर्व होती. युवक संघांत श्री० स. वि. रानडे, मुंजे भय्या देशपांडे प्रभृति कांहीं विद्यार्थी श्री० घटवाई यांचे मुख्य मदतनीस होते.

सप्टेंबर २२ व २३, १९२८ ला महाराष्ट्र राष्ट्रीय शिक्षण परिषदेचें सहावें अधिवेशन नागपूर येथें श्री० दे. श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्ष. तेखालीं झालें. श्री० शेठ जमनालालजी स्वागताध्यक्ष होते. ही राष्ट्रीय -शिक्षण परिषद फारच यशस्वी झाली आचार्य विनोबाजी, आचार्य हवग, श्री० श्रीकृष्णदास जाजू, अप्पासाहेब पटवर्धन इ० सुमारें ३० प्रतिनिधी परठिकाणाहून आले होते व श्रीमती सौ० रमाबाई तांबे, सौ० इन्दिराबाई नियोगी, सौ० सुशिलाबाई कोठीवान, सौ० सुशिलाबाई मोहनी प्रभृति भगिनींनींही परिषदेत भाग घेतला होता. राष्ट्रीय शिक्षकांच्या निराश झालेल्या अंतःकरणांत या परिष. देमुळें नवीन उत्साह उत्पन्न झाला.

मुलींच्या राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग वर्धा येथें सत्याग्रहाश्रमाच्या विद्यमानें झाला. जून १९२८ मध्ये दे० शेठ जमनालालजी यांनी एक कन्याशाळा काढली. १९३१ सालीं साबरमती येथील सत्याग्रहाश्रममोडल्यावर तेथील मुली आणि स्त्रिया वर्धा येथें आल्या. तेव्हां ४९३१ सालीं वर्धाला लहान मुली व प्रौढ स्त्रिया यांच्या शिक्षणाची सोय एकत्र करावी किंवा वेगळी करावी या प्रश्नाचा विचार होऊन सत्याग्रहाश्रमानेच मुलींच्या शिक्षणाची सोय करावी असें ठरलें. महिलाश्रम व एक 'कन्याश्रम' सुरू करण्यांत आला. सदहू 'कन्याश्रम' दोन वर्षे चालला व पुढें सत्याग्रहाश्रमानें जबाबदारी घेण्याचें नाकारलें म्हणून नोव्हें० १९३५ मध्यें तो बन्द करण्यांत आला. नोव्हें० मध्ये 'महिलाश्रमा' ची पुनर्घटना होऊन त्यांत प्रौढ स्त्रियांबरोबर मुलांच्या शिक्षणाची व्यवस्थाही करण्यांत आली. ही नवीन योजना ता. १ नोव्हें० पासून अमलांत आली.

१९३० सालीं नागपूर प्रान्त विद्यार्थ्यांनीं दाखविलेली वीरवृत्ति या प्रांताच्याच नव्हे तर सबंध भारतवर्षाच्या गेल्या दशकाच्या इतिहासांत अपूर्व होती यांत शंका नाहीं.

१९३१ च्या शान्ततेच्या काळांत राष्ट्रीय शिक्षणाचे अभिमानी च भाष्यकार श्री. हरिभाऊ मोहनी यांच्या प्रयत्नानें व श्री. शेठ जमनलालजींच्या मदतीनें विद्वद्रत्न भाऊजी दफ्तरी यांच्या नेतृत्वाखालीं एक "स्वराज्य विद्यालय" स्थापन करण्यांत आलें. आपला सर्व वेळ देशसेवेला देऊं इच्छिणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देऊन ' राज्यशास्त्र ' ' घटनाशास्त्र ' " राष्ट्रीय चळवळ " " सत्याग्रह, " " तुलनात्मक धर्मशास्त्र " " खेड्यांचें अर्थशास्त्र, " " जगांतील प्रचलित वाद व चळवळी " इ. विषयांचें यथातथ्य व पद्धतशीर ज्ञान देण्याच्या उद्देशानें हे वर्ग चालविण्यांत येत असत व १९३२ साली विद्यालयावर घाव येईपर्यन्त ते व्यवस्थित चाललेही होते. सर्दहूवर्ग विद्यालयाच्या " टिळक ज्ञान मन्दिरांत " भरत असत.

पूर्वीच्या अनुभवांवरुन सरकारनें १९३२ च्या चळवळीच्या सुरवातीलाच राष्ट्रीयशाळा बेकायदेशीर ठरविल्या. नागपूर येथील टिळक विद्यालयाच्या शहर व धन्तोली येथील इमारतींवर पोलिसांनीं हल्ला करुन सुमारें रु. १०००० किंमतीची मालमत्ता जप्त केली. ती सर्व पुढें लिलांव करण्यांत आली. अर्थातच तीं विद्यालयाला केव्हांच परत मिळाली नाहीं. सबंध हिन्दुस्थानांत अशा प्रकारचें दुसरें उदाहरण ऐकिवात नाहीं.

राष्ट्रीय शिक्षणाचें स्पष्ट दर्शन अजून व्हावयाचें असलें व राष्ट्रीय शाळांच्या उत्कर्षाचा काळ निघून गेला असा भास होत असला तरी राष्ट्रीय शिक्षणसंस्थांच्या कामगिरीनें या प्रान्ताच्या व संबंध हिन्दुस्थानच्या राष्ट्रीय कर्तृत्वांत व लोकैक्यांत महत्वाची भर पडली असाच निर्णय भावी इतिहासकाराला द्यावा लागेल.

---

# प्रकरण तिसरें

## प्रांतांतील खादी प्रचार

**पूर्वेतिहासः**—१८५३ मध्यें भोंसला राज्य खालसा होईपावेतों आमचा प्रांत वस्त्र दृष्ट्या स्वावलंबी होता. १८६७ सालीं येथील रेसिडेंटनें असें नमूद केलें आहे कीं नागपूर शहरांत ४१६२ लोक कापडाच्या धंद्यांत असून १००८ लोक सूत काढीत असत. २६७ जण रंगाचें काम करीत. पुढें गिरण्यांमुळें ही परिस्थिती बदलली तरी विणण्याचें काम चाले, मात्र सूत गिरण्यांचें वापरण्यांत येऊं लागलें. हरिजन जाडें भरडें कापड विशेषेंकरून तयार करीत असत. त्या जुन्याकाळीं शंभर रुपये किंमतीचे शेले बनत. ब्रह्मपुरीस दोरवाव उमरेड, पवनी व भिवापूर येथें पातळें तयार होत. चांद्यास चौंट तयार होई. त्यावेळीं आमच्या प्रांताला पुरेल इतकाच नव्हे तर बाहेर धाडतां येईल इतका कपडा तयार होत असे. याच्या बरोबरच रेशीम, कोसा यांचेंही काम नागपूर व चांदा येथें होई.

या वैभवशाली धंद्याला यंत्रयुगापुढें मान वांकविणे भाग पडून शेवटीं आम्हीं त्या गांवचे होतों कीं नाहीं इतपत त्याची हलाखी झाली. पुढें १९२० सालापासून महात्मा गांधींच्या चिकाटीमुळें या धंद्याच्या पुनरुज्जीवनाला आरंभ होऊन आज पुनः हातसुताच्या व हातमागाच्या धंद्यांचें समाधानकारक रीतीनें पुनरुज्जीवन होत आहे.

नागपूर व वर्धा जिल्ह्यांत भरपूर कापस होतो. चांदा जिल्ह्याच्या कांहीं भागांत उत्तम प्रकारचा 'जडी' कापूस होतो. १९२० सालीही चांदा व भंडारा यां जिल्ह्यांतील महार जातींतील कांतण्यानें विणण्याचें कसब अजीबात मेलेलें नव्हतें, त्यामुळें खादीचा पुनरारंभ करणें जड गेलें नाहीं. त्या काळांतहि किन्ही व लाखनी येथील सफाईदार खादीचें नांव प्रांतभर गाजलें, किन्हीचें काम श्री. नानाजी

कोतवाल व श्री. दामले यांच्या खटपटीनें व प्रेरणेने झालें. श्री. शंकरराव वेळे तेथील काम चालवीत होते.

१९२४ सालीं जूनमध्यें मध्यप्रांत खादीमंडळ स्थापन करण्यांत आलें. व वर्ध्यास प्रथम भांडार उघडलें, व या भांडारानें वर्धा जिल्ह्यांत कांतणें, विणणें याचा प्रचार करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला. १९२५ सालीं अखिल भारतीय चरखासंघ स्थापन झाला व खादीमंडळ त्यांत विलीन झालें. महाराष्ट्र चरखा संघाचें काम श्री. दास्तानें यांजकडे आलें व त्यांनी खादीबद्दल लोकांत प्रेम उत्पन्न करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला. १९२६ च्या मे महिन्यांत चांद्यास खादी कार्यालय उघडण्यांत आलें. तोंपावेतों नागपुरास खादी भांडार नव्हतें पण कै. गणपतरावजी टिकेकर यांनी स्वतःचें भांडवल गुंतवून व अविश्रांत मेहनत करून येथील पहिले खादीभांडार यशस्वी केलें व नागपुरांत खादी रुजविली यांचें फळ म्हणूनच आज येथें तीन भांडारें आहेत. वाढत्या कार्याला भांडवल कमी पडूं लागल्यामुळें १९२७ मध्यें म. गांधींनी खादीकरितां दौरा काढला व खादी कार्याला सुमारें पन्नासहजार रुपयांची मदत मिळविली. याच वर्षी श्री. अवस्थी यांनी चांदा जिल्ह्याची पाहणी करून उत्पत्ति केंद्रास लायक जागा शोधण्याचा प्रयत्न केला व त्यांना सावलीचा शोध लागला. सावलीचे केंद्र कार्य थोड्यावेळांत अत्यंत पुढें सरसावलें व आज तेथील खादी देशभर प्रसिद्ध आहे. श्री. जाजूजी व आचार्य विनोबाजी यांच्यामतें या केंद्रांतून एक लाख रुपयांपावेतोंची खादी निर्माण होणें शक्य आहे. १९२८ च्या मार्चमध्यें महाराष्ट्र चरखासंघाचें मुख्य ऑफिस वर्धा येथें आणण्यांत आलें. या परिवर्तनाबद्दल श्री. जाजूजी यांनी केलेली खटपट व त्यांची हिशेबी व्यवस्था यांना श्रेय दिलें पाहिजे.

१९३० च्या सत्याग्रहामध्यें खादी व वस्त्रस्वावलंबन कार्याला जी विलक्षण चालना मिळाली, त्यामुळें कातलेलें सूत विणून घेण्याचा प्रश्न उद्भवला, पुष्कळ प्रयत्न करूनहीं स्थानिक रीतीनें विणण्याची व्यवस्था होऊं शकली नाहीं; म्हणून सावली येथें असें सूत विणून देण्याचें महाराष्ट्र चरखा संघानें ठरविलें. महाराष्ट्र संघानें व्यापिलेला महाराष्ट्र व थेट मुंबई, गुजराथ येथील सूतही सावली येथें विणण्यास येऊं लागलें.

चरखा संघाच्या प्रत्यक्ष कामासाठीं व स्वतंत्रपणें खादी प्रचाराचें कार्य करण्यासाठीं लागणारें शास्त्रीय शिक्षण देण्याची सोय सावली येथें १९३० पासून करण्यांत आली आहे. ह्या सर्व माहितीवरून मराठी मध्यप्रांताचे खादी कार्यातील स्थान किती मोठें आहे तें लक्षांत येईल. इतकें यश मिळाल्यावर खादी तयार करणारांना पोटभर मजुरी मिळावी म्हणून खादीची किंमत थोडीशी वाढवून खादी कार्यकर्त्यांच्या परिस्थितीला सुधारण्याच्या प्रयत्नास महात्मा गांधींनी सुरवात करावी हें स्वाभाविक आहे. यापुढें आमच्या प्रांतातच नव्हे तर अखिलदेशांत खादीला फार उज्ज्वल भवितव्य आहे असें भविष्य करण्यास कांहीं हरकत नाहीं.

---

# प्रकरण चवथें



## वर्ध्याचा सत्याग्रहाश्रम

१९२० च्या नागपूर काँग्रेस नंतर श्री. जमनालालजी यांनी म. गांधीजवळ इच्छा प्रगट केली कीं साबरमती सत्याग्रहाश्रमाची एक शाखा मध्यप्रांतांत वर्धा येथें असावी. महात्माजींनीं त्याची विनंति मान्य केली, व १९२१ च्या जानेवारीच्या मकर संक्रांतीला साबरमती आश्रमचे व्यवस्थापक श्री. मगनलाल गांधी, श्री. विनोबाजी व श्री. रमणिकलाल भाई अशी मंडळी त्यासाठीं वर्ध्याला आली. श्री. रमणिकलाल भाई वर्ध्यालाच राहिले. त्यांच्याबरोबर २–३ विद्यार्थीहि आले होते.

**स्थापना:**—वर्धा आश्रमाची विधिपुरःसर स्थापना १९२१ च्या गुढी–पाडव्याला झाली.

**उद्देश व साधनें:**—अविरोधी सेवा हा आश्रमाचा उद्देश असून त्या, सेवेची लायकी प्राप्त करून घेण्यासाठीं विशिष्ट व्रतांचें पालन होणें जरूर आहे अशी त्याची श्रद्धा आहे. ही व्रतें, हल्लीं प्रार्थनेत रोज म्हटल्या जाणाऱ्या खालील अनुष्टुप् छंदांत ही श्लोकरूपात संकलित केली आहेत:—

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य असंग्रह ।
शरीर–श्रम अस्वाद सर्वत्र भय–वर्जन ॥
सर्व–धर्मी समानत्व स्वदेशी स्पर्श–भावना ।
हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रत–निश्चयें ॥

**स्थळ:**—वर्धा आश्रमाची सुरवात सध्यां ग्रामोद्योगसंघ आहे तेथें झाली. नंतर तो संघाच्या जागेत गेला. १९२२ सालीं त्याच्यासाठीं स्वतंत्र इमारती बांधण्यांत आल्या. त्यानंतर कन्याश्रमाला त्या इमारती दिल्यामुळें तो जवळच्या नालवाडी गांवाच्या हरिजन वस्त्यांत नेण्यांत आला व सध्यां तो तेथेंच आहे.

विनोबाजी चाहते हैं कि ग्रामदान की ६८

**प्रवृत्तिः**—१९२१ पासून १९२९ 'पर्यंत आश्रमनें बाहेरची कोणचीहि प्रवृत्ति घेतली नव्हती. मित्रमंडळींच्या आग्रहानें १९२४ ते १९२७ च्या दरम्यान 'महाराष्ट्र-धर्म' नांवाचें मासिक व पुढें साप्ताहिक चालविलें जात होतें. त्याच प्रमाणें नागझरी व रोहिणी ह्या दोन गांवीं ग्रामसंघटनेचें थोडेंबहुत काम कांहीं मंडळी करीत होती. परंतु हें काम गांधीसेवासंघातर्फे खादीबोर्डाच्या सहाय्यानें चाललेलें होतें. कातणें, पिंजणें विणणें, इत्यादींचें शिक्षण व प्रयोग व शरीर परिश्रम मताच्या दृष्टीनें इतर कामें करणें यावरच विशेष भर देण्यांत आला होता.

**तालुक्यांतलें कामः**—१९२९ सालीं आश्रमांतील मंडळी आतां दरीचशी तयार झाली आहेत, त्यांना आतां बाहेर काम करावयास पाहिजे अशी कल्पना येऊन तिचा अंमलहि लागलाच सुरू झाला. श्री. बाबाजी मोघे ह्यांना तालुक्यांत फिरतीवर पाठविण्यांत आलें. वर्धा तालुक्यांत २०९ खेडीं आहेत, त्यापैकीं ५० खेड्यांचे गट करण्यांत आले. १५ दिवसांतून हीं सर्व हिंडून यावयाचीं असत. खेड्यांतून फिरतांना मुख्यतः कातण्याचा पिंजण्याचा व इतर गांधीविचाराचा प्रचार करावयाचा असे. ह्यापुढें प्रत्येक कार्यकर्त्याच्या मदतीला एक आणखी मदतनीस देण्यांत आला. ह्याप्रमाणें १२ मंडळी तालुक्यांत फिरत असत १९२८ ते १९३० सालीं आश्रमनें केलेली कामगिरी ही वर्धा तालुक्याच्या वृत्तांतांत आली आहेच.

गांधी अर्विन तह झाल्यानंतर पुन्हां नित्यक्रम सुरू झाला. पण थोड्याच दिवसांत १९३२ ची चळवळ आली. ह्या चळवळीत श्री. विनोबाजी, गोपाळराव काळे, द्वारकानाथजी व इतर दोघां आश्रमच्या मंडळीस खानदेशांतच अटक करण्यांत येऊन तेथेंच शिक्षा देण्यांत आल्या. यांच्याच्या मंडळींनीं वर्धा तालुक्याच्या चळवळींत संपूर्ण भाग घेतला. व त्या सर्वांना अटक होऊन ६-६ महिन्यांच्या शिक्षा झाल्या. ह्यावेळीं आश्रमच्या व कांग्रेसच्या लोकांच्या मेहनतीनें वर्धा तालुक्यांतील ६०० स्त्रीपुरुष जेलमध्यें गेले. एकट्या नागझरी नांवाच्या १००० वस्तीच्या गांवातले २८ पुरुष व १२ स्त्रिया जेलमध्यें गल्या.

१९३२ सालीं आश्रमची बहुतेक मंडळी पकडली गेल्यानंतर ५–६ विद्यार्थी व एक दोन प्रौढ मंडळी आश्रमचि चळवळ चालवीत होती. पण सरकारला तें सहन न होऊन ता. २ जून रोजीं आश्रमची जागा व इमारती सरकारनें आपल्या ताब्यांत घेतल्या. व मंडळींनीं जागा ताब्यांत देण्याचें नाकारल्यामुळें त्यांची रवानगी जेलकडे झाली. अशा प्रकारें १९३२ सालीं आश्रमांतील थोरांपासून लहान मंडळींपर्यंत सर्वांना जेलयात्रा घडली.

पुढें म. गांधींच्या उपवासामुळे मंडळींना १९३२–३३ सालीं हरिजन चळवळीकडे जास्त लक्ष द्यावें लागलें. वर्धा तालुक्यात हा उपवास होण्याच्या आधींच १९३१ सालीं अस्पृश्यता निवारणाची एक मोहीम काढण्यांत आली होती व तालुक्यांतली २५–३० देवळें व ३००–४०० विहिरी हरिजनांना खुल्या करण्यांत आल्या होत्या. १९३२-३३ च्या हरिजन चळवळीनंतर वैयक्तिक सत्याग्रह आला. त्यावेळीं प्रचारक मंडळी पैकीं पुष्कळशी मंडळी जेलमध्यें गेली. त्यानंतर फलकरयाची कॉंग्रेस, विदेशी वस्त्र बहिष्कार मंडळ ह्या चळवळींत प्रचारकांना पडावें लागलें, त्यामुळें स्वस्थतेनें त्यांना खेड्याच्या कामाकडे लक्ष देण्यास फुरसत झाली नाहीं. तरी पण १९३३ ते १९३४ च्या दरम्यान मंडळींनीं आपापलीं आसनें तालुक्यांत स्थिर केलीं.

१९३४ सालीं पाटण्याला चळवळ थांबविण्याचा ठराव झाल्यानंतर तालुक्याच्या कामात स्थिरता आली असे म्हणतां येईल. सध्या १२ केन्द्रांत मंडळी रहात असून खेड्यांच्या दृष्टीनें त्याचें काम चाललें आहे.

| केंद्र | कार्यकर्त्यांचें नांव | विशिष्ट काम |
|---|---|---|
| १ नालवाडी | श्री. वाळुंजकरजी | चर्मालय |
| २ देवळी | गोपाळराव काळे | प्रचारक व आश्रमांतील विद्यार्थ्यांचें शिक्षण |
| ३ भिवापुर | ( सध्यां मनुष्य नाहीं ) | खादी मुख्यतः वस्त्र स्वावलंबन |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | सुरगांव | दल्लुचंद | हरिजन कार्य व गांवसफाई |
| ५ | सावंगी | मनोहरजी दिवाण | |
| ६ | कोलामपूर | ( सध्या माणूस गेला आहे. ) | मागासलेल्या जातींचो संघ |
| ७ | रिधी | जानराव तिगांवकर | |
| ८ | कोलोना | हरिभाऊ मुळे | |
| ९ | पवनूर | शंकरराव चौधरी | |
| १० | मानोली | रामदास भाई | |
| ११ | पवनार | लक्ष्मणराव कोटि | |
| १२ | भानखेड | गणपतराव जाधव | |
| १३ | नागझरी | ( माणूस नसल्यामुळें बंद. गांवचे लोक काम पाहतात. ) | |

तालुक्याचे काम आश्रमच्या वतीनें चालतें असले तरी त्यासाठीं आश्रमांतल्याच मंडळींचे ग्रामसेवामंडळ नांवाचें मंडळ स्थापण्यांत आलें असून त्यांच्या मार्फत हें काम होत आहे. ह्या मंडळाचे सध्यांचे श्री. गोपाळराव काळे अध्यक्ष असून श्री. राधाकृष्णजी बजाज हे चिटणीस आहेत. ७ जणांचें कार्यकारी मंडळ आहे.

# प्रकरण पांचवें

## प्रांतांतील हरिजन चळवळ.

इंग्रजी अंमलानंतर अस्पृश्यतेची तीव्रता आपोआप कमी होऊं लागली व. पूर्वीचे समाजसुधारकही या दिशेनें काम करीत. प्रत्यक्ष निवारण जरी झालें नसलें तरी तत्वतः अस्पृश्यतानिवारणाचें तत्व मान्य असणारी मंडळी वाढीवरच होती. पण अशा सामान्य प्रयत्नानें अस्पृश्यतेसारखा देशांत रोमरोमीं मुरलेला दोष नाहीसा होणें शक्य नव्हतें. १९२० सालीं म. गांधींनीं या प्रश्नाला प्रथम जोरानें तोंड फोडलें व त्यांचे अनुयायी तेव्हांपासून आपल्यापरी शक्य तें कार्य करूं लागले. वर्ध्यांचे श्री लक्ष्मीनारायण मंदिर अस्पृश्यांना खुलें करण्यांत सेठ. जमनलालजींनी फार धैर्य दाखविलें. राष्ट्रीय शाळाही हरिजनांच्या मुलामुलींना दाखल करून घेऊन या कामी मदत करीत. नागपूरच्या टिळक विद्यालयास एका दान-शूरानें १०००० रु. देतांना अस्पृश्यांना न घेण्याची अट घातली होती. परंतु त्यांनीं त्या पैशाचा लोभ केला नाहीं. कैलास व्यास यांनीं मृत्युपत्रांत पाचहजार रुपये हरिजनांकरितां दिले. अशाप्रकारें थोड्याफार प्रमाणांत १९२० ते ३० पावेतों कमी अधिक चळवळ चालू राहिली.

गोलमेज परिषदेतून महात्मा गांधी परत आल्यावर १९३२ सालीं मात्र या चळवळीस विशेष जोर आला. हें साल अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळींत अत्यंत महत्वाचें गणलें जाईल. ब्रिटिश प्रधानांनीं जातीय निवाड्यांत अस्पृश्यांना विभक्त-मतदार संघ दिले आणि २१ कोटि हिंदूंतून ४ कोटी अस्पृश्यांना कायमचें दुरा-वण्याचा डाव टाकला. १९३१ च्या दुसऱ्या वर्तुळ परिषदेंत अल्पसंख्यांकांचा प्रश्न समोर मांडला गेला त्यावेळी महात्माजींनीं आपल्या भाषणाच्या अखेर असें स्पष्ट बजावलें होतें कीं, " अस्पृश्यांना जर विभक्त मतदार संघ देण्यांत आला तर मी माझ्या प्राणांची बाजी लावून त्याचा विरोध करीन, " व प्रतिज्ञेप्रमाणें त्यांना शेवटीं प्राणांतिक उपोषण करावें लागलें. हिंदी लोकांनीं [illegible] आपसांत सोडविल्यास जातीय निर्णय बदलण्यांत येईल असें मुख्य

आश्वासन दिलें असल्यामुळें प्रश्न काय तो आपसांतलाच होता. महात्माजींनीं उपवासास आरंभ करताच देशांत सर्वत्र एकच खळबळ माजून या कार्याला तावडतोब विशेष जोरानें प्रारंभ झाला.

या प्रसंगीं नागपुरांतील विद्यार्थ्यांनीं एक आठवडाभर अभ्यास बाजूस सारून ३००, ३५० विद्यार्थी एक आठवडा खेड्यांतून प्रचारास गेले. विद्यार्थ्यांचा उत्साह त्यांच्या पूर्वापार लौकिकास साजेसाच होता. सुमारें एक लाख हरिजनांनीं संयुक्त मतदार पत्रिकेवर सह्या करून संमति दिली. एका आठवड्याच्या आत प्रांतांत किती जागृति झाली त्याची कल्पना खालीं दिलेल्या कोष्टकावरून सहज येईल

| जिल्हा. | प्रचारकांची संख्या. | गावें. | कार्य. |
|---|---|---|---|
| नागपूर | १३५ | २०५ | १९ देवळें, १३ विहिरी, १ धर्म शाळा व नागपूर डि. कौ. व काटोल म्यु. च्या सर्व विहिरी खुल्या झाल्या. |
| वर्धा | ६५ | १२५ | २१ देवळें. ११५ विहिरी, व देवळी म्यु. च्या सर्व विहिरी खुल्या झाल्या. |
| भंडारा | ५० | १५० | गोंदिया लो. बो. व म्यु. च्या सर्व विहिरी. |
| चांदा | १५ | ... | ... ... ... |
| एकंदर. | २६५ | ४८० | |

येरवड्याच्या प्रसिद्ध करारानंतर अर्थातच प्रायोपवेशन कमेटीचें कार्य उरलें नाहीं, तेव्हां या कमेटीनें चालविलेल्या आंदोलनानें सर्वत्र झालेल्या जागृतीचा फायदा घेऊन पुढें कार्य करण्याचे अधिकार डॉ० खरे यांना देण्यात आले.

नागपूर प्रांतांत हरिजन सेवा संघाची शाखा स्थापन होऊन डॉ० ना. भा. खरे हे अध्यक्ष नेमले गेले १९३३–३४ ह्या एकाच वर्षांत २५ प्रचारकांनी एकंदर ९०० गांवांतून सभा केल्या व २५ मॅजिक लॅटर्न लेक्चर्स दिलीं; ह्यावरून ही लाट बहुजन समाजापर्यंत नेण्याची कशी खटपट करण्यांत आली हे दिसून येईल.

परिषदाः— खालील कोष्टकांत दिलेल्या परिषदांपैकी पहिल्या पांच संघानें भरविल्या व शेवटल्याना नुसती मदत केली. दलित महिला परिषदेने य.साठीं एक कमेटीही नेमली होती.

| अनुक्रम नं. | परिषदेचें नांव | ठिकाण | अध्यक्ष |
|---|---|---|---|
| १ | नागपुर जि. हरिजन परिषद | मोहपा | सौ. अनुसूयाबाई काळे |
| २ | सावनेर ता. ,, ,, | सावनेर | श्री. के. ल. दप्तरी |
| ३ | पारासिवनी परगणा ,, | पारासिवनी | ,, ,, ,, |
| ४ | काटोल तालुका ,, | काटोल | ,, विनोबा भावे |
| ५ | दलित महिला परिषद मध्यप्रांत-वऱ्हाड | नागपूर | कु. विरेंद्राबाई (हरीजन) |
| ६ | मध्यप्रांत वऱ्हाड हरिजन विद्यार्थी परिषद | ,, | मि रोडन |
| ७ | दक्षिण महिला परिषद | ,, | श्री टी. एल. साखरे |
| ८ | महार ,, | पालोरा जि. भंडारा | |

प्रचार कार्यांत अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ हा भाग अत्यंत महत्वाचा होता. व त्याबाबतची सर्व जबाबदारी श्री. विद्वद्रत्न श्री. के. ल. दप्तरी ह्यांनी उत्तम रीतीनें पार पाडली. "अस्पृश्यता कशी जाईल" व "मंदिर प्रवेश बिलाचें खरें स्वरूप" ह्या दोन् पत्रकांत अस्पृश्यता निवारणाची बाजू त्यांनी शास्त्रशुद्ध रीतीनें मांडली आहे. येरवड्यास महात्माजींनाही त्यांच्या व्यासंगाची बहुमोल मदत झाली.

१९३३ सालीं मंदिर प्रवेश बिलानें देशभर मोठी खळबळ उडवून दिली होती. कायदे कौंसिलांतून हा प्रश्न उद्‌भवण्याचा पहिलाच प्रसंग नव्हता, परंतु एवढा प्रचंड निरोध त्यापूर्वी कधींच उत्पन्न झाला नव्हता.

अस्पृश्यता नाहींशी करण्याच्या उद्देशानें सर हरिसिंग गौर ह्यांनी असेंब्लीत १९२१ सालीं प्रथमच एक बिल आणलें. १९३० सालीं बॅ मुकुंदराव जयकर Hindu Untouchability Castes Act नांवाचें बिल असेंब्लींत आणणार होते; परंतु वेळेवर हजर न राहतां आल्यामुळें तें तसेंच राहिलें सर षण्मुखं चेट्टी ह्यांनी अशाच स्वरूपाचा एक ठराव १९३२ सालीं केला होता; पुढें ते अध्यक्ष झाल्यामुळें तो ठराव खालसा झाला. मद्रास कायदे कौंसिलांतही अशा सारखेच ठराव आणण्याचे प्रयत्न केले गेले; परंतु सरकारनें त्यांस परवानगी दिली नाही.

ता. २१ मार्च १९३३ रोजी श्री. सी. एस. रंगाअय्यर यांनी हिंदु-मंदिर प्रवेश अपात्रता निवारक बिल नांवाचा एक ठराव असेंब्लींत आणला याचवेळी श्री. राजा यांनीही Untouchability Abolition bill नांवाचा ठराव सादर केला. दोन्ही ठराव लोकमत आजमावण्यासाठी प्रसिद्ध करण्यांत आले.

अस्पृश्यता निवारणाच्या विरुद्ध असलेल्या मंडळींना विरोध करावयास हा एक उत्कृष्ट संधि मिळाली. सर्वत्र सनातन्यांनी संघटित रीतीनें या बिलावर हल्ला चढविला. वर्णाश्रम स्व. संघाची संघटना होऊन दाक्षिण सर्वत्र

मिकाराचे रीतसर हल्ले सुरू झाले. लोकांत असा गैरसमज पसरविण्यांत आला कीं अस्पृश्यांना मंदिरांत घुसण्याची कायदेशीर परवानगी मिळणार असून त्यांना कोणी अडथळा केल्यास ती व्यक्ति शिक्षेस पात्र होईल.

वस्तुतः बिलाचें स्वरूप अगदीं भिन्न होतें. "पन्नास लोकांच्या सह्यानिशीं अर्ज आल्यास मठाधिपतींनीं सर्व हिंदूंचीं मतें घेऊन मताधिक्यानुसार मंदिरें उघडावें किंवा बंद करावें" हा बिलाच्या थोडक्यात मथितार्थ; पण रूढिवादी सनातनी पंडितांनीं वस्तुस्थितीचा विपर्यास केला आणि अखेर १९३४ सालीं स्वतः अध्यर्गारांनीच क्षुब्ध लोकमत पाहून ठराव परत घेतला.

## महात्माजींचा दुसरा उपवास.

ता. ८ मे ते २९ मे ( १९३३ ) पर्यंत २१ दिवसांचा उपवास करण्याचें महात्माजींनीं ठरवितांच पुन्हां या कामाला जोराची चालना मिळाली.

ह्या उपवासांत सरकारनें महात्माजींना सोडून दिलें; परंतु वैयक्तिक सत्याग्रहांत पुन्हा ते पकडले गेले. व. तुरुंगांत हरिजन कार्य करण्याबाबत सरकारकडून निर्बंध घातले गेल्यामुळें महात्माजींच्या तिसऱ्या उपवासास सुरुवात झाली. ता० २३ ऑगस्ट रोजीं प्रकृति अतिशय बिघडल्यामुळें अखेर त्यांची सुटका झाली. लगेच नोव्हेंबर मध्यें त्यांनीं पैसा गोळा करण्यासाठीं दौरा काढला. साबरमतीचा आश्रम मोडल्यामुळें महात्माजींचें वास्तव्य वर्धेस होतें. त्यामुळें नागपूर प्रांताचा पुनच दौऱ्यास आरंभ झाला. ह्या दौऱ्याचें वर्णन हरिजनकारांनीच केलें आहे त्यावरून हे काम आपल्या प्रांतानें किती उचलून धरलें होतें ह्याची कल्पना येईल

हरिजनमध्यें पुढील लेख आहे.

"नागपूर प्रांतातला कार्यक्रम इतका भरगच्च आंखण्यांत आला होता कीं महात्माजींना जेवायला व विश्रांतीला देखील वेळ मिळत नसे. लोकांचा उत्साह अपूर्व होता आणि त्यांनीं पैसेही सढळ हातांनीं दिले. नागपूरच्या चिटणीस पार्कांतील सभेचा देखावा पाहून तर आम्ही चकीतच झालो.

युनिव्हर्सिटीतील विद्यार्थ्यांच्या सभेचा उल्लेख केल्याशिवाय आमच्याने राहवत नाहीं; त्यांनी ७०१ रु० ची थैली अर्पण करून महात्माजींच्या तैलचित्राचें अनावरणही केलें.

'काटोल, (येथे एका गरीब माणसाने महात्माजींना एक कवडी अर्पण केली तिची लिलावांत १०१ रु० किंमत आली) रामटेक, सावनेर भंडारा, गोंदिया चांदा व सावली इ० ठिकाणच्या कार्यक्रमांत सारखा वाढता उत्साह दिसत होता".

हरिजन सेवक संघाच्या मदतीने प्रांतात दहा दिवस आणि रात्रीच्या शाळा व १ बोर्डिंग चालविलें जातें. त्यांचा तक्ता खालीं दिलेलाच आहे. ह्या शाळांनी प्रत्येकीनें आपल्या परी उत्तम काम केलें असलें तरी कांहीं ठिकाणचें विशेष उल्लेख केल्यास इतरांना ते नाउमेदकारक होणार नाहींत.

**सावली:**— श्री. ल. के. देशपांडे व श्री. ना. रा. सोवनी ह्यांनीं अनुक्रमें हरिजन विणकरांची संघटना व सफाई हीं केलेलीं कामें उत्कृष्ट नमुने म्हणून दाखवितां येतील. चरखा संघाचे श्री. रा. वा. गोसावी ह्यांनींही ह्या कामीं पुष्कळ मदत केली.

**मुक्ति विद्यालय-सिवनी:**— श्री. जगन्नाथपंत पटवर्धन ह्यांच्या देखरेखीखाली ही शाळा चालविली जाते. बक्षरस्वावलंबनाचा प्रयोग हा ह्या शाळेचा विशेष असून गोंदियाकरितां हें भूषणावह आहे.

**हरिजन पाठशाला हंसापुरी नागपूर:**— श्री. अजाबराव पायघन हे शाळेशिवाय चांभारांची सामाजिक संघटना करीत असतात. चांभारांच्या सर्वांगीण उन्नतीकरितां ह्यांनी श्री. भजनदासजी "यांचे अध्यक्षतेखालीं एक हरिजनोन्नति मंडळ" नांवाची संस्था स्थापन केली आहे.

**रामटेक:**— येथील शाळा, संघाचे एक उत्साही सेवक कै. गंगारामजी कटवमवार ह्यांच्या प्रयत्नांनी सुरू झाली. श्री. गंगारामजी ह्यांच्या निधनामुळें ह्या तहसिलीतल्या कार्याचें अपरिमित नुकसान झालें आहे.

**पारसिवनी**:—श्री. चिंतामणराव तिडके ह्यांची चिकाटी प्रशंसनीय आहे. गेल्या दहादपांपासून गावकऱ्यांच्या क्रोधाला ते शांतपणें तोंड देत आहेत. १९३२ सालीं पारसिवनीच्या सार्वजनिक विहिरी उघडल्या तेव्हांपासून तर बहिष्कारापासून तों मारामारीपर्यंत सारे बरेवाईट प्रसंग आले तरी हरिजन कार्यावरच्या अढळ श्रद्धेमुळें त्यांनीं पारसिवनी परगण्यात चिकाटीनें कार्य चालू ठेवलें आहे.

**पथरई**:—येथील शाळा श्री. स. वि. रानडे ह्यांनीं आपल्या एकट्याच्या बळावर स्थापन केली व पुढें त्या शाळेस हरिजन संघानें मदत केली. श्री. रानडे ह्यांची संघाचे चिटणिसाचे जागी नेमणूक झाल्यामुळें येथील कार्य श्री. मा. न. दीक्षित हे चालवीत आहेत.

**हिंगणघाट**:—येथ खेड्यांतून हरिजनांना औषधें वाटण्यात येतात व, हिंगणघाट येथें हरिजन बोर्डिंग चालविण्यात येतें. त्यात ८ विद्यार्थी आहेत.

प्रांतिक हरिजन चळवळीचें थोडक्यात व त्रोटक आलोचन केलें आहे महात्माजींच्या प्रेरणेनें जरी इतक्या जोरानें ही चळवळ हातीं घेतली गेली असली तरी सामाजिक विषमता एकाएकीं नष्ट होणें दुरापास्त आहे हजारों वर्षांपासून चालत आलेली स्त्री बदलण्यासाठीं अनेक वर्षांची एकाग्रतेनें केलेली तपश्चर्या व अनेक समाजसुधारकांना 'आत्मवत् सर्वभूतेषु' हा सेवाभाव ह्यांची अत्यंत आवश्यकता आहे.

---

पुढें दोन्ही समाज आपापलें संघटन करण्यास सज्ज झाले व पं० रामचंद्र शर्मा आर्यसमाजी व मौलाना खलीलसाहेब यांनी या प्रांतांत येऊन आपापल्या समाजांत जागृति केली. यामुळें धर्म भावना प्रदीप्त झाल्या व धुसपुसीचें वातावरण कायम राहिलें. १९२७ मध्यें मुसलमानांनी एक मिरवणूक ( १९२३ च्या दंग्यांत मेलेल्यांच्या स्मृतिनिमित्त ) काढली व कुराण निघून पुनः दंगा झाला, तो फार भयंकर झाला. १९२३ च्या दंग्याची स्मृति जणुं काय नवा दंगा करूनचें पाळण्यांत आली. या नंतर आज पावेतों येथें दंगा झाला नाहीं, पण हिंदु मुसलमान समाज कमी अधिक फटकूनच वागत आले असें म्हणण्यास हरकत नाहीं. १९१६ सालीं ज्या उमेदीनें एकी करण्याचा प्रयत्न करण्यांत आला त्या प्रमाणांत मुसलमान समाज अजूनही काँग्रेसमध्यें शिरलेला नाहीं.

अशी परिस्थिती असली तरी आमच्या प्रांतांत कधींतरी हिंदु-मुसलमानांचें ऐक्य होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. वाटेल तसे दंगे झाले तरी ज्यांनीं कांग्रेसनिष्ठा सोडली नाहीं असे मोजके कां होईना पण कांहीं मुसलमान बांधव आज कांग्रेसमध्यें निष्ठेनें काम करीत आहेत ही गोष्ट आशा बाळगण्यास पुरेशी आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

# प्रकरण सहावें



## प्रांतांतील हिंदु मुसलमानांचे परस्पर संबंध

१ भोसल्यांच्या राज्यांत आमच्या प्रांतांतील मुसलमानी प्रजा पूर्णपणें सुखी होती; इतकेंच नव्हे तर त्यांना भोसला राज्यांत अनेक विश्वासाच्या जागाहि देण्यांत येत. भोसला सैन्यांत अरबी सैन्य सर्वांत विश्वसनीय समजलें जात असे. १९०४ पावेतों हिंदुमुसलमानांच्या वैमनस्याचा येथें स्फोट झाल्याचें दिसून येत नाहीं. १९०४ मध्यें कांहीं मुसलमानांनीं भोसल्यांना मशीदीवरून वाद्यें वाजवीत मिरवणूक नेण्यासंबंधीं प्रथम विरोध केला; पण पुढें सर केंडॉक यांनीं मशीदीवरून सरसकट वाद्यें वाजवीत नेण्यास बंदी करून फक्त भोसलेराजे व जगन्नाथाचा रथ यांनाच मोकळीक ठेविली. यानंतर बरींच वर्षे शांततेंत गेलीं. १९१० मध्यें येथें मुस्लीम लीगचें अधिवेशन होऊन मुसलमान समाजांत जागृति करण्याचा प्रथम प्रयत्न करण्यांत आला. यानंतर तावडतोब प्रत्यक्ष वैमनस्य सुरू झालें नसलें तरी निदान चढाओढीच्या विकारवशतेला सुरवात झाली असण्याचा संभव आहे. १९१६ सालीं मुसलमानांच्या प्रमाणाबाहेरील मागण्या मान्य करूनही लखनौ कांग्रेसनें परस्परांतील ऐक्य साधण्याचा प्रयत्न केला; पण पुढें लवकरच दोन्ही समाज पुनः फांकले. १९२२ च्या सुमारास या प्रांतांतही दुहीचें वारें जोरानें वाहूं लागलें आणि ठिकठिकाणीं होणारे दंगे ( उ० मोपल्यांचे बंड ) आणि जातिनिष्ठ संस्थांचें कार्य यामुळें ती वाढूं लागली. १९२५ सालीं आर्वीस हिंदु मुसलमानांचा भयंकर दंगा झाला. त्यापूर्वी १९२३–२४ सालीं नागपूर व कामठीस गणपती-उत्सवावरून बारीक सारिक मारामाऱ्या झाल्या. या प्रसंगी पं. मोतीलाल नेहरू व मौ. अबुल कलाम आजाद यांनीं मुद्दाम नागपुरास येऊन हिंदुमुसल्मानांचें ऐक्य करण्याचा प्रयत्न केला. परंतु परस्परांतील साशंकतेनें वातावरण पूर्णपणें नष्ट झालें नाहीं.

पुढें दोन्ही समाज आपापलें संघटन करण्यास सज्ज झाले व पं० रामचंद्र शर्मा आर्यसमाजी व मौलाना खलीलसाहेब यांनीं या प्रांतांत येऊन आपापल्या समाजांत जागृति केली; यामुळें धर्म भावना प्रदीप्त झाल्या व धुसपुसीचें वातावरण कायम राहिलें. १९२७ मध्यें मुसलमानांनीं एक मिरवणूक ( १९२३ च्या दंग्यांत मेलेल्यांच्या स्मृतिनिमित्त ) काढली व कुरापत निघून पुनः दंगा झाला, तो फार भयंकर झाला. १९२३ च्या दंग्याची स्मृति जणुं काय नवा दंगा करूनचें पाळण्यांत आली. या नंतर आज पावेतों येथें दंगा झाला नाहीं, पण हिंदु मुसलमान समाज कमी अधिक फटकूनच वागत आले असें म्हणण्यास हरकत नाहीं. १९१६ सालीं ज्या उमेदीनें एकी करण्याचा प्रयत्न करण्यांत आला त्या प्रमाणांत मुसलमान समाज अजूनही कॉंग्रेसमध्यें शिरलेला नाहीं.

अशी परिस्थिती असली तरी आमच्या प्रांतांत कधींतरी हिंदु-मुसलमानांचे ऐक्य होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. वाटेल तसे दंगे झाले तरी ज्यांनीं कांग्रेसनिष्ठा सोडली नाहीं असे मोजके कां होईना पण कांहीं मुसलमान बांधव आज कांग्रेसमध्यें निष्ठेनें काम करीत आहेत ही गोष्ट आशा बाळगण्यास पुरेशी आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

---

# परिशिष्ट १ लें.

सन १८८९ मुंबई येथील कांग्रेसला गेलेले आपल्या प्रांतातील काय प्रतिनिधी.

ता. २८-१०-८९ रोजी सार्वजनिक " लोकसभे "
च्या सभेंत निवडलेले.

| रजल्हा नागपूर | नांव |
|---|---|
| ,, | श्री. गंगाधरराव माधवराव चिटनवीस |
| ,, | ,, सेठ रामचंद्र |
| ,, | ,, बापूरावदादा एम्. ए. |
| ,, | ,, गोपाळराव भिडे |
| ,, | ,, गोविन्द मेघश्याम बडकस |
| ,, | ,, सदाशिव गणपतराव सुभेदार |
| ,, | ,, केशव गोपाळ तामडन बी. ए. |
| ,, | ,, दिवाकर जनार्दन वर्डे |
| ,, | ,, बाळकृष्ण जयराम रत्नपारखी |
| ,, | ,, रामभाऊ रघुनाथ बोबडे |

ता. २४-१० रोजी सार्वजनिक सभेंत निवडलेले.

| | |
|---|---|
| ,, | श्री. सदाशिव जयराम देहाडराय बी. ए. |
| ,, | ,, लक्ष्मण गणेश सोनक ( काटोल ) |
| ,, | ,, बालमुकुन्द रामचंद्र |
| ,, | ,, विष्णु पंडित |
| ,, | ,, विठ्ठल बाळकृष्ण दाते एल. सी. ई. |

,,    ,, गोपाळ रामकृष्ण वऱ्हाडपांडे
,,    ,, सेठ नारायणदास पार्थीसाढ
,,    ,, सेठ रामनारायण
,,    ,, लक्ष्मण प्रभाकर पांचखेडे
,,    ,, रामकृष्णपुरी पदमपुरी
,,    ,, बापूखेम पाटील

ता. २३-१० रोजीं लोक सभेच्या मनेजिंग कमेटीच्या सभेंत निवडलेले.

,,    श्री. भगीरथ प्रसाद बी. ए.
,,    ,, नारायण स्वामी नायडू
,,    ,, तात्या बाळकृष्ण क्षीरसागर बी. ए.
,,    ,, राजाराम दीक्षित
,,    ,, पंडित ए. कृष्णाजी अय्यर

ता १८-१० रोजी सार्वजनिक सभेंत निवडलेले

,,    श्री. रघुनाथ नारायण

(मालगुजारी असोसियशन ता. २१-१२-८९)

,,    श्री. श्यामराव कृष्णाजी
,,    ,, लक्ष्मणराव राजेश्वर चिटनवीस
,,    ,, कृष्णराव नारायण देशमुख
,,    ,, तुकाराम काशीनाथ
,,    ,, रामचंद्र गणेश नारळे
,,    ,, गोपाळ अण्याजी
,,    ,, गणपतराव गोपाळराव घटाटे
,,    ,, राघोबा रसीराम (सावनेर)
,,    ,, गोविन्दराव देशमुख (काटोल)

## ता० ८-१२-८९ रोजी सार्वजनिक सभेंत निवडलेले

जिल्हा वर्धा श्री. हरी वामन केळकर वकील

,, ,, केशव महादेव कावळे

,, ,, जयकृष्ण रामचंद्र

,, ,, शिवराव चिंतामण देशमुख ( कारंजा )

,, ,, पुरषोत्तम विठ्ठल गोळे

,, ,, नारायण श्रीपत इंगोळे ( टाकळी )

,, ,, प्रल्हाद भास्कर देशपांडे ( सिंदी )

,, ,, बाळकृष्ण पांडुरंग कल्याणी

,, ,, यादव पांडुरंग कल्याणी

,, ,, बळीराम चव्हाजी इंगोळे ( टाकळी )

,, ,, तुकाराम पाटील ( आष्टा )

,, ,, गणपतराव काशीनाथ ( टाकळी )

,, ,, दामोदर निळकंठ खरे वकील

,, ,, बळवंत केशव भवाळकर

,, ,, पुरषोत्तम आत्माराम पाळकर

,, ,, निळकंठ दामोदर टालाटुले ( सिंदी )

,, श्री. वासुदेव विनायक परांजपे

,, ,, दत्तो विनायक गोखले

,, ,, अमृतराव माधवराव मेघे

,, ,, रामकृष्ण पुनाजी भाट

,, ,, आपलोमन पाटील

,, ,, मारोती रामचंद्र वाकरे

,, ,, एम. गुप्ता व्हॅरीस्टर

,, ,, रामकृष्ण रामचंद्र बंदे

,, ,, महादेव सदाशिव सोमण वकील ( आर्वी )

,, ,, लक्ष्मण गोविन्द देऊसकर ,, ,,

,, श्री. गणपतराव माधोजी ,,

,, ,, दादा पटेल ,,

,, ,, वासुदेव कृष्णाजी अभ्यंकर ( धनोडी )

,, ,, गणपतराव केशव देशमुख ( वाढोना )

**ता. १०-११-८९. सार्वजनिक सभेत निवडलेले.**

भंडारा जिल्हा-श्री. गोविन्द बळवंत वकील

,, ,, विश्वनाथ नीळकंठ पंडित ( वकील )

,, ,, सखाराम सीताराम बझलवार ,,

## राष्ट्रीय सभेचे सभासद

रा. ब. डॉ. लक्ष्मीनारायण सन १९१६ पासून २० पर्यंत.
श्री. एम् के. पाध्ये. ,, ,, २० ,,
डॉ. हरीसिंह गौर ,, ,, २० ,,
श्री. राधेशाम घाडीर ( सन १९१६ )
,, एम्. के. वालिंगे ( सन १९१९ )
,, एन्. आर. अळेकर ( सन १९१९ )
,, एम्. व्ही. केळकर (काटोल) ( सन १९१९ )
,, वी. आर. देशमुख ( चांदा ) १९१९, २०, १०, २१, १२,
डॉ. वी. एम्. मुंजे १९१६-२७
श्री. आर. व्ही. अभ्यंकर १९२०,
,, व्ही. एम. जमातदार १९२०
,, समीउल्लाखा सन १९२१,२२,२४
सेठ जमनालाल बजाज सन १९२१,२३,२५,
नरकेसरी मोरोपंत अभ्यंकर सन १९२१,२२,२४,२५,२८ ते ३४
डॉ. चोळकर ( सन १९२१ )
,, परांजपे ( सन १९२१ )
,, एन. बी. खरे सन १९२२,२८,३४

| | |
|---|---|
| श्री. ऑ. पी. देव | सन १९२२, |
| ,, एम्. बी. देशपांडे | सन १९२२, |
| ,, एम्. जे. कानेटकर | सन १९२३, |
| श्री. एन्. एम्. घटवाई | सन १९२२ २९ ते ३४ |
| श्री. भैयालाल सखीदास | सन १९२३, २४ |
| श्री. अप्पाजी तिजारे | सन १९२३, ते २५, |
| श्री. अब्दुल रजाक | सन १९२३ |
| कर्मवीर आर. आर. पाटक | सन १९२३, ते २५ |
| श्री. गोविंदराव घरडे | सन १९२४, २५, २७ |
| श्री. गोविंदराव पांडे | सन १९२५, ते ३७ |
| श्री गोपाळराव ओगले | सन १९२५, २७ |
| श्री. गोविंन्दराव देशमुख | सन १९२६, |
| श्री. तुकारामपन्त केदार | सन १९२६, २७ |
| श्री. नारायणराव भागवत | सन १९२६, |
| डॉ. वामनराव पांचखेडे | सन १९२६, |
| श्री. गोविंदराव प्रधान | सन १९२७, |
| ,, माधवराव चौडके | सन १९२७ |
| ,, खुशालचंदजी खजानची | सन १९२८ ते ३४ |
| ,, नीळकंठराव देशमुख | सन १९२८, ३३ |
| महात्मा भगवानदीन | सन १९२८ |
| ,, एस. बी. पळसुले | ,, १९२८ |
| ,, पी. के. साळवे | ,, १९३० ते ३३ |
| सौ. अनुसयाबाई काळे | ,, ३० ते ३३ |
| ,, चतुर्भुजभाई | ,, ३० ते ३४ |
| ,, ए. श्री. पटवर्धन | ,, १९३४ |
| ,, शिवराज चुडीवाले | सन १९३४ |

सन १९३५ पासून या प्रान्ताला ३ सदस्य देण्यांत आले.

डॉ. एन. बी. खेर

सेठ जमनालाल बजाज

श्री. चतुर्भुजभाई.

# प्रान्तिक कॉंग्रेस कमेटी व पदाधिकारी



पांच रुपये वर्गणी दिली असतां वरील कमेटीचे सभासद होतां येत असल्याचा नियम असल्यामुळें १९२० पर्यंत सर गंगाधरराव, सर बी. के. बोस प्रभृति मवाळ पुढाऱ्यांपासून तों राष्ट्रीय मंडळातील व तत्सम राष्ट्रीय वृत्तीचे सुशिक्षित नागरिक सभासद होते. स्थल संकोचास्तव त्यांची नांवे देणें अशक्य आहे.

### १९२०–२१

अध्यक्षः— श्री. महादेव कृष्ण पाध्ये.
सेक्रेटरीः— ,, एम्. भवानीशंकर नियोगी.
डॉ. बा. शि. मुंजे
,, चोळकर.
खजानचीः- श्री· डब्ल्यू. आर. पुराणिक.

### १९२१–२२

अध्यक्षः— श्री. बळवंतराव देशमुख
उपाध्यक्षः- ,, गणपतराव पोंद
सेठ जमनालाल बजाज
श्री. नीळकंठराव सदाफळे
,, गोपाळराव ओगले
सेक्रेटरीः— ,, डॉ. बा. शि. मुंजे

### १९२२–२३

अध्यक्षः— डॉ. बा. शि. मुंजे

उपाध्यक्षः— श्री. गोविंदराव देशमुख
डॉ. जी. व्ही. देशमुख
श्री. देवराव परेख
" आर. एल. असीरकर
जन. सेक्रेटरी नारायण काशीनाथ वैद्य
जॉइंट " डॉ. हेडगेवार
श्री. आर. जी. गोखले
खजीनदार " मेंडलेकर

१९२३–२४

अध्यक्षः— सेठ जमनालाल बजाज
उपाध्यक्षः— भवानी शंकर नियोगी
वामनराव घोरपडे
श्री. रघुनाथराव पाठक
" गणपतराव जोशी.
जनरलसेक्रेटरीः— श्री. माधवराव कानेटकर
जाईंट " श्री. सत्यदेव
" घटवाई
खजानची श्री. एस्. बी. धांदे

१९२३–२४

२१-११-२३ रोजीं सेठ जमनालाल बजाज यांना आपल्या मताची माणसें पाहिजेत म्हणून प्रो. काँग्रेस कमेटीवर खालीं अधिकारी दिलेले निवडण्यांत आले.

अध्यक्षः—सेठ जमनालाल बजाज
उपाध्यक्षः— महात्मा भगवानदिनजी

,, श्री. गणपतरावजी टिकेकर
,, ,, सैयद अब्दुल अलीम
,, ,, रघुनाथराव पाठक
जनरल सेक्रेटरी श्री. नीलकंठराव देशमुख
जॉइंट सेक्रेटरी ,, पंढरीनाथ अंबुलकर
,, ,, आबिदअली शिराजी
खजानजी सेठ पूनमचंद रांका

१९२४–२५

अध्यक्ष कर्मवीर बापूजी पाठक
उपाध्यक्ष श्री. मनोहरपन्त देशपांडे
सेक्रेटरी ,, वामनराव घोरपडे
जा. सेक्रेटरी ,, आर. आर. तिजारे
खजानजी ,, गोपाळराव ओगले

१९२५–२६

अध्यक्ष डॉ. मुंजे
उपाध्यक्ष श्री. गोविंदराव पांडे
सेक्रेटरी ,, हरी कृष्ण जोशी
खजीनदार ,, गोपाळराव ओगले

२६–२७

अध्यक्ष डॉ. मुंजे
उपाध्यक्ष श्री. गोविन्दराव चरंडे
सेक्रेटरीः— ,, हरी कृष्ण जोशी

जॉ.सेक्रेटरी ,, डॉ. नामदेव यशवंत धोपटे
खजीनदार:- ,, गोपाळराव ओगले.

१९२७-२८

अध्यक्ष:— डॉ. मुंजे
उपाध्यक्ष:— श्री. गोविंदराव चरडे
सेक्रेटरी:— ,, हरी कृष्ण जोशी
जॉ. सेक्रेटरी:— डॉ. धोपटे
खजीनदार:— श्री. गोपाळराव ओगले

या वर्षांत योच्या विरुद्ध एक नवीन प्रां. कॉंग्रेस कमेटी निवडण्यांत आली, व त्यास ऑलइंडिया कॉंग्रेस कमेटीनें मंजुरी दिली.
अध्यक्ष:— श्री. मोरोपन्त अभ्यंकर
उपाध्यक्ष:— महात्मा भगवानदीनजी
जन० सेक्रेटरी:- श्री. पूनमचंदजी रांका
दु० सेक्रेटरी:- ,, एन्. एम्. घटवाई
कोषाध्यक्ष:- सेठ जमनालाल बजाज
ही कमेटी जून सन १९३० पर्यन्त अस्तित्वांत होती.

१९३१

अध्यक्ष:— श्री. मारोपन्त अभ्यंकर
उपाध्यक्ष:— महात्मा भगवानदीनजी
सेक्रेटरी:— श्री. शंकर त्रिंबक धर्माधिकारी
,, ,, एकनाथ श्रीपाद पटवर्धन
खजीनदार:— सेठ पूनमचंद रांका
ही कमेटी सन १९३४ पर्यंत अस्तित्वांत होती.

१९३४

अध्यक्षः- श्री. मोरोपन्त अभ्यंकर

उपाध्यक्षः- डॉ. एन. बी. खरे

सेक्रटरीः- श्री. एकनाथ श्रीपाद पटवर्धन

" माधवराव कानेटकर

खजीनदारः- श्री. गणपतराव टिकेकर

२ जानेवारी सन १९३५ रोजीं नरकेसरी श्री. मोरोपन्त अभ्यंकर यांच्या निधनामुळें पुढील कमेटी निवडण्यांत आली.

अध्यक्ष डॉ. एन्. बी. खरे

उपाध्यक्ष श्री नीलकंठराव ( बाबासाहेब ) देशमुख

सेक्रटरी श्री. एकनाथ श्रीपाद पटवर्धन

" माधवराव कानेटकर

खजीनदारः- श्री. गणपतराव टिकेकर ( निधन ता. १२-१२-३५ )

# नागपूर शहर

* एकापेक्षां जास्त वेळां शिक्षा झालेले

| पूर्ण नांव | पत्ता | गुन्ह्याचे कलम | शिक्षा |
| --- | --- | --- | --- |
| श्री. बॅ. मोरेश्वर वासुदेव अभ्यंकर* | धंतोली | १२४ अ | २ व. स. म. १५०० रु दंड |
| ,, डॉ. ना. भा. खरे | ,, | १०८ | १ व. स. म. |
| ,, पूनमचंदजी रांका* | महाल | १०८ इ. पी. को. १०८ क्रि. प्रो. कोड | ,, २०००रु. दंड |
| ,, शं. त्र्यं. धर्माधिकारी* | टिळक विद्यालय | १०८ इ. | ,, |
| ,, बाबासाहेब देशमुख* | ,, | ,, | ,, |
| ,, नारायणराव वैद्य* | शुक्रवारी | ,, | ,, |
| ,, माधव जनार्दन कानेटकर* | सिताबर्डी | पिकेटींग आ.नं.४ से.४,५ | १ व. स. म. |
| ,, एकनाथ श्रीपत पटवर्धन* | टिळक विद्यालय | ११७–१४३ | १ व. स. म. |
| ,, महादेव गंगाधर दातार* | आर्वी | १४३ | ६ म. स. म. |
| ,, गजानन दिवाकर दवळे | इतवारी | २६ जी, ११७ | ४ म. ३०० रु. दंड |
| ,, छगनलालजी भरूका* | धनतोली | १४३, १८८ ११७ | ६ म. स. म. १ म साधी १ न. स. म. |

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. पी. के. माळवे | सदर | पिकेटींग आर्डिनन्स | ६ म. स. म. ७५ रु. दंड |
| ,, पी. एम. नायडू* | धनतोली | आर्डिनन्स से. ४ | ४ म. स. म. ५० रु. दंड |
| ,, सौ. अनसूयाबाई काळे | ,, | पिकेटींग आर्डिनन्स | ४ म. साधीकैद २०० रु. दंड |
| ,, भय्याजी महलकुंडे* | टिळक विद्यालय | सिटाचा कायदा | ९ म. स. म. |
| ,, आप्पाजी गांधी* | ,, | १४४, १८८ | ६ स. म. १ म. साधी |
| ,, विद्वद्रत्न केशवराव दतरी | स्वराज्य विद्यालय | दिल्ली काँग्रेस | ,, |
| ,, प्रि. भय्याजी पांढरीपांडे | महाल | १०८ | १ व. साधी |
| ,, मामा कमाविसदार | ,, | १०८ | ,, ,, |
| ,, यादवराव देशमुख | गणेशपेठ | १०८ | १ वर्ष |
| ,, रुईकर वकील* | | १०८ आय. पी. सी | ,, |
| ,, युगलचंद लखानची* | चांदा | १४४, १८८ | ६स.म.१ म.साधी २००रु.दं. |
| ,, आप्पाजी रामचंद्र तिजारे* | टिळक विद्यालय | ११७ व २६ डी | ६ म. स. म. मुळशी झेंडा |
| ,, श्री. ना. श्री. हरकरे | ,, | ११७ | १ वर्ष स. म. |
| ,, दी. मा. वाचासुंदर* | इतवारी | पिकेटिंग ऑर्डि. नं. ४ | ९ म. १०० रु. दंड |
| ,, स. वि. रानडे* | नागपूर | ११७ | ८ म. |
| ,, ल. के. देशपांडे | ,, | ,, | ६ म. |
| ,, ना. रा. सोनी | धनतोली | १४५ पिकेटिंग ऑर्डि. | ३ ,, |
| ,, गो. कृ. वाघमारे | ,, | ,, | ६ ,, |
| ,, वा. ल. खटी | सितावर्डी | ,, | ३ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. म. व. ढोळके | इतवारी | पिकेटींग | ३ म. |
| ,, जा. मा. वाचासुंदर* | ,, | ,, | ६ ,, २०० रु. दंड |
| ,, शं. सि. काळीकर | ,, | ,, | ६ ,, |
| ,, दगमवार एन्. एम्. वकील | ,, | ,, | ३ ,, |
| ,, र. गो. शेंडी* | आर्वी | ,, | ३ ,, |
| ,, द. कृ. मोहनी* | महाल | ,, | १ ,, |
| ,, ज. गो. गोखले | | ,, | ,, |
| ,, डॉ. वा. शि. वाखले | अंबाझरी | ,, | ५ ,, ३०० रु. दंड |
| ,, नारायण हरी पोळकर | टिळक विद्यालय | ,, | ३ ,, |
| ,, श्यामराव डोमाजी लोखंडे | ,, | ,, | ३ ,, |
| प्रो. बी. जी. कोठारे | ,, | ,, | ३ ,, |
| श्री. वसंत बाळकृष्ण वखले | धनतोली | ,, | १ व. |
| प्रो. म. व. जोगळेकर* | गोंदिया | ११७ | १ म. २०० रु. |
| श्री. गजानन दंडिगे* | सितावर्डी | पिकेटिंग | १ व. |
| ,, गो. श्री. हरकरे* | महाल | ,, | ,, |
| ,, ग. दे. पांडे | ,, | ,, | ६ म. |
| ,, रामभाऊ कोलनाडे* | सदर | ,, | ६ ,, |
| ,, दत्तात्रय पांडुरंग वैद्य | महाल | ,, | ३ ,, |
| ,, कालीचरण चौरसिया सराफ* | सितावर्डी | ,, | ६ ,, ५०० दं. ४ म. १००० |

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. मु. वि. पुराणिक* | नागपूर शहर | ११७ | १ व. स. म. |
| ,, कुंदनलाल हलवाई | ,, | | ६ म. स. म. ५० रु. दंड |
| ,, भिवाजी म्हाली* | ,, | | ६ म. स. म. |
| ,, भोलासिंग कामार* | ,, | | ६ म. स. स. ५० रु. दंड |
| ,, रामाजी पानवाला | ,, | पिकेटिंग आर्डिनन्स | ६ म. स. म. |
| ,, अंबादास मुंजे | ,, | ,, | ६ म. स. म. |
| ,, गोविंदा ठाकरे | ,, | ,, | ५ म. स. म. |
| ,, पॅरेलाल अग्रवाल* | ,, | १४३, १८८ | ६ म. स. म. १ म. सा. |
| ,, नवीनचंद बनिया* | ,, | ,, | ,, |
| ,, नारायण रामचंद्र | ,, | ,, | ,, |
| ,, कृष्णा नागोराव | ,, | ,, | ,, |
| ,, प्रेमशंकर महादेव | ,, | ,, | ,, |
| ,, बलभद्र रामचंद्र | ,, | ,, | ,, |
| ,, बळिराम गोविंदराव ममके | ,, | ,, | ,, |
| ,, बाळाजी गोविंदराव नानोटी | ,, | ,, | ,, |
| ,, रामचंद्र गोविंदा | ,, | ,, | ,, |
| ,, बाबूराव देवाजी | ,, | ,, | ,, |
| ,, महादेव मारोती घुमडे | ,, | ,, | ,, |
| ,, गोविंद केशव | ,, | ,, | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. मारोती धोंडबा | नागपूर | १४३, १८८ | ६ स. म. व १ म. सा. |
| ,, रामभाऊ सोनबा | ,, | ,, | ,, |
| ,, माधोराव जयराम | ,, | ,, | ,, |
| ,, चन्दिलाल गणुसींग | ,, | ,, | ,, |
| ,, मंगळसिंग लक्ष्मणसिंग | ,, | ,, | ,, |
| ,, पुंडलीक बाजीराव | ,, | ,, | ,, |
| ,, माधव गोपाळ | ,, | ,, | ,, |
| ,, रामचंद्र बलिराम | ,, | १४४, १८८ आ. पी. सी. | ,, |
| ,, लक्ष्मण बालाजी | ,, | ,, | ,, |
| ,, शिवनारायण गुप्ता | ,, | ,, | ,, |
| ,, बद्री प्रसाद | ,, | ,, | ,, |
| ,, व्यंकटलाल | ,, | ,, | ,, |
| ,, नामदेव | ,, | ,, | ,, |
| ,, मारोती | ,, | क. ४ आ. ९ | ६ म. स. म. |
| ,, नारायण | ,, | ,, | ,, |
| ,, खंडू बाडी | ,, | ,, | ,, |
| ,, श्री. वजिर अली* | ,, | ,, | ,, |
| ,, मोतीशाव* | हिंगणा | ,, | १ व. स. म. |
| ,,मोतीराम बाबूसिंग रजपूत | गुमगांव | ,, | ६ म. स. म. दंड ३०० रु. |
| | | ११७, १४३, २६४ | १ व. ४ म. |

## × एकापेक्षां ज्यास्त वेळां शिक्षा झालेले

| पूर्ण नांव | पत्ता | गुन्ह्याचे कलम | शिक्षा |
|---|---|---|---|
| महात्मा भगवानदीन × | स. नं. ७ चिं. पार्क | १२४ अ | ५ २ व स. म. |
| राजाभाऊ आंगरे × | ,, | क. ४ आ. प. | २ व स. म. ३०० रु. |
| जनार्दन नारायण देशपांडे | ,, | ,, | ३ म. स. म. |
| बंलाराम मारोती कोथळे × | ,, | ,, | ११ ,, |
| मुरलीधर लक्ष्मण दिक्षित | ,, | ,, | ४ ,, |
| कृष्णा नागोराव मुंजे | ,, | ,, | ६ ,, |
| विठ्ठल लक्ष्मण भोंजाराव × | ,, | ,, | ६ ,, |
| गोपाळ बाजीराव मुजुमदार | मंडाल नागपूर | ,, | ४ ,, |
| महादेव गंगाधर परांडे | स. नं. ६ ,, | ,, | ४ ,, |
| कृष्णा लक्ष्मण कोळी | ,, | ,, | ४ ,, |
| पुरुषोत्तम अंबादास अंबेकर | ,, | ,, | ६ ,, |
| नानाजी मार्के | ,, | ,, | |
| शंकर कळमकर | १ ,, | ,, | |
| भास्कर श्रीकृष्ण जोशी | २ ,, | ,, | ६ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| | [illegible] ,, १० | ,, | |
| ए. व्ही राव | ७ ,, | क. ४ आ. ५ | ३ म. स. म. २५ रु. दंड |
| लक्ष्मराव फाटक | ९ ,, | ,, | ६ ,, |
| शंकर काळा | ६ ,, | ,, | |
| वाशीमकर | ६ ,, | ,, | |
| मंगलसिंग लक्ष्मणसिंग | ११।११ ,, | ,, | ७ ,, |
| विठोबा यादव गोमासे | १ ,, | ,, | ३ ,, ५० रु. दंड |
| रामचंद्र पांडुरंग वाढई | १ ,, | ,, | ३ ,, ,, |
| चंद्रभान नागो फटिंग | १ ,, | ,, | ३ ,, ,, |
| पंचम कलार | १ ,, | ,, | ३ ,, ,, |
| तुळशीराम नानू गवळी | १ ,, | ,, | ३ ,, ,, |
| लक्ष्मण सालेवार | १ ,, | ,, | ३ ,, ,, |
| गोविंद सिताराम शिंपी | १ ,, | ,, | ६ ,, |
| लक्ष्मण बोडसे | १ ,, | ,, | |
| पी. डी. मराठे | १ ,, | ,, | १ व ६ म. स. म. |
| ए. वाय कुळकर्णी | २ ,, | ,, | ६ म. स. म. |
| बाळाजी विठ्ठल देशपांडे | २ ,, | ,, | ६ ,, |
| किसन तात्याजी | २ ,, | ,, | १० ,, ५० रु. दंड |
| गंगाराम राघोबा | २ ,, | ,, | ६ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| पांडुरंग रामा | स. नं. २ | क. ४ आ. ५ | ६ स. म. ५० दंड |
| मारोती तुकाराम | २ ,, | ,, | ६ ,, |
| गोविंद बाजीराव वाघ × | २ ,, | ,, | ९ ,, ५० रु. दंड |
| बुधु भिकाजी मरकाम | २ ,, | ,, | ४॥ ,, |
| जागोबा कोठारे | २ ,, | ,, | ६ ,, ,, |
| डोमा पैकू × | २ ,, | ,, | १ व. ४ ,, |
| महादेव सखाराम × | २ ,, | ,, | १ व. ,, ,, |
| तानबा वा॥ बापुजी बूरड | स. ७ नालसाहेब | ,, | ६ ,, |
| मूलचंद वा॥ गणपत लोधी × | इं. सदानपुरा | ,, | ६ ,, |
| काळू वा॥ मुलनंदन कहार | स. नं १६ ,, | ,, | ० ,, |
| चुन्नीलाल वा॥ गोपीचंद कहार × | १६ ,, | ,, | ६॥ ,, |
| बिहारी वा॥ भैयाचंद कहार | १६ ,, | ,, | ६ ,, |
| निरंजन वा॥ छोटेलाल कहार | १६ ,, | ,, | ६ ,, |
| जिवाजी वा॥ विठोबा तेली मोडघरे | १६ ,, | ,, | ६ ,, |
| चिंतामन वा॥ जिनबाजी तेली मोडघरे | १६ ,, | ,, | ३ ,, |
| जानबा वा॥ किसनजी तेली बोरीकर | १६ ,, | ,, | ६ ,, |
| मुकुंदा पहेलवान वा॥ गोपीनाथ तेली सावरकार | १६ ,, | ,, | ६ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| शंकर वा॥ विठोबा तेली सावरकार ✕ | हंसापुरी स. १६ | क ४ आ. ५ | ३ मं. स. म. |
| गेंदलाल वा॥ महादेव सावते बेलगडे | ,, | ,, | ६ ,, |
| गजानंद वा॥ जागोबा तेली ✕ | ,, | ,, | ० ,, |
| शामराव वा॥ गणपतराव तेली खोडे ✕ | ,, | ,, | १ ,, |
| कालू वा॥ मोदा कहार | ,, | ,, | ६ ,, |
| भीठाईलाल वा॥ धमु कहार | ,, | ,, | |
| उमेद वा॥ धंसीया कहार ✕ | ,, | ,, | ३ ,, |
| चुन्नीलाल वा॥ अयोध्या | ,, | ,, | ३ ,, |
| सुधू वा॥ अयोध्या ब्राम्हण | ,, | ,, | ३ ,, |
| मदन वा॥ बाबूलाल सोनार | ,, | ,, | ३ ,, |
| चीना वा॥ सोनबा कहार | भोईपुरा | ,, | ६ ,, |
| हीरा वा॥ डोमन कहार | ,, | ,, | ६ ,, |
| चंपालाल वा॥ राधाकिसन मारवाडी | नालसाहेब स. १६ | ,, | ६ ,, |
| जगमोहन परदेशी | हंसापुरी स. नं. १६ | ,, | ६ ,, |
| फुंनी परदेशी | ,, | ,, | ६ ,, |
| बापुजी रामजी डांगरी ✕ | हंसापुरी स. न. १७ | ,, | ६॥ ,, |
| दामस्या लक्ष्मण डांगरी | ,, | ,, | |
| विठाबा वा॥ लहानु सेनी | ,, | ,, | ६ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. रामदास | नागपूर | क. ११४ | ६ म. स. म. |
| ,, शंकरराव वैद्य | ,, | ,, | ,, |
| ,, जनार्दन गोरे | ,, | क. ४ आ. ५ | ,, |
| ,, मारोती | ,, | ,, | ,, |
| ,, कुंजीलाल तेलंग | ,, | ,, | ,, |
| ,, जयराम रतनसा | ,, | ,, | ,, |
| ,, दिनकर गणेश नातु | सीताबर्डी | ,, | ,, |
| ,, गोडबोले | ,, | ,, | ,, |
| ,, गंगाधर श्रीधर साठे | धनतोली | ,, | ,, |
| ,, त्रिंबक विष्णु गाडगीळ | सीताबर्डी | ,, | ,, |
| ,, रघुनाथ व्यंकटेश हुनरगिरिकर | ,, | ,, | ,, |
| ,, रामचंद्र मंगेश सोमपूरकर | ,, | ,, | ,, |
| ,, भास्कर नारायण माचवे | टिळक विद्यालय | ,, | ,, |
| ,, सीतल गोवर्धन | सीताबर्डी | ,, | ,, |
| ,, शंकर हरी कुणबी | ,, | ,, | ,, |
| ,, राजाराम विष्णु कल्हारकर | ,, | ,, | ,, |
| ,, रामकृष्ण वासुदेव हुमेदार | ,, | पिकेटिंग | ,, |
| ,, के. एन. राऊत | टिळक विद्यालय | मिठाचा कायदा | ,, |
| ,, के. क्षिरसागर | ,, | ,, | ,, |

